॥ श्री ॥

# निळोबाचा गाथा.

हा गाथा

## ह. भ. प. विष्णु नरसिंह जोग

यानी विषयवार निवडून तयार केला, तो

पुणें येथें,



'चित्रशाळा' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

शके १८२९.

78

1907

किंमत एक रुपया.

॥ श्रीपांडुरंग प्रसन्न ॥

कलियुगामध्यें ज्ञानेश्वर महाराज, नामदेव, कबीर, नाथ महाराज, तुकाराम महाराज आदिकरून बहुत संत अवतीर्ण झाले. आणि शास्त्र-संस्काररहित मंदबुद्धीजीवांना, प्राकृत भाषेमध्यें अनेक ग्रंथ करून कर्मे, उपासना आणि ज्ञान यांची ओळख करून दिली आणि सन्मार्गास लाविलें. अशा या संतवर्गापैकींच साधु निळोबा हे होत. हे नगर जिल्ह्यापैकीं पारनेर तालुक्यांत पिंपळनेर गांव आहे तेथील कुळकर्णी होते. हे जातीचे आश्वलायन शाखेचे ब्राह्मण. रामेश्वरभट, गंगाराम मवाळ, संताजी जगनाडे, तुकाराम महाराजांचे धाकटे बंधु कान्होबा इत्यादि जे तुकाराम महाराजांचे चवदा टाळकरी होते त्यांपैकीं निळोबा हे एक होत. यांच्या जन्मतिथीसंबंधाची कांहीं खात्रीलायक बातमी मिळत नाहीं. यांची पुण्यतिथी फाल्गुन शुद्ध प्रतिपदा आहे. ते दिवशीं पिंपळनेर गांवीं मोठा उत्साव होतो. एकेवेळीं निळोबा हे तुकाराम महाराजांस म्हणाले कीं, आपण मजवर अनुग्रह करावा. त्यावेळीं 'मी तुमच्यावर अनुग्रह केल्यावांचून निजधामास जाणार नाहीं.' असें तुकाराम महाराजांनीं त्यास सांगितलें; पण दुर्दैवानें तसा योग घडून न येतां तुकाराम महाराज निजधामास गेले. हें वर्तमान निळोबांना देहूस आल्यावर समजलें. त्याच्यायोगान निळोबांचें हृदय तुकाराम महाराजांच्या विरहदुःखाने अतिशय दुःखी झाले; आणि आपल्यावर अनुग्रह न करितां आपले गुरु निजधामास गेले, आतां आपलें जगणें व्यर्थ आहे, सद्गुरु तुकाराम महाराज हे पुन्हा येऊन जर मला भेट देतील व जर मजवर अनुग्रह करतील तरच मी अन्नपाणी ग्रहण करीन अशा निश्चयानें निळोबा हे बेचाळीस दिवस इंद्रायणीतिरी पडून राहिले. त्यांचें समाधान करण्याकरितां साक्षात् पांडुरगांनीं येऊन त्यांना हालविलें आणि म्हणाले कीं "मी कोण आहें, तूं मजकडे पहा." त्यावेळीं निळोबांची स्थिति म्हटली म्हणजे अगदीं प्राणमात्र उरले होते. तथापि आपले गुरु तुकाराम महाराज हेच आपल्यास भेट देण्याकरितां आले आहे असें समजून निळोबांनीं डोळे उघडून पाहिलें तों साक्षात् पांडुरं-

गाची मूर्ति पुढें उभी आहे, असें दिसलें. त्यावेळीं निळोबा म्हणाले " देवा तूं कां येथें आलास ? मी हें निर्वाण तुझ्याकरितां मांडिलें नाहीं. तूं आलास तसा जा, तुझी मला गरज नाहीं. " हें निळोबांचें वचन ऐकतांच देव अंतर्धान पावले. इकडे वैकुंठामध्यें आपली भेट घेण्याविषयींचा निळोबारायाचा दृढ निश्चय तुकाराम महाराजांनीं जाणून ते अतित्वरेनं दर्शन देण्याकरितां निळोबारायांच्या जवळ आले. आणि त्यांना हालवून सावध केलें. डोळे उघडून निळोबाराय पहातात तों ज्यांच्या भेटीकरितां आपण इतके दिवस अन्नपाणी टाकून निजध्यास करित होतो ते सद्गुरु तुकाराम महाराज साक्षात् पुढें दिसले. त्यावेळीं निळोबाच्या ठिकाणीं अष्टसात्वीकभाव उत्पन्न होऊन परमानंदाच्या भरांत त्यांनीं सद्गुरु तुकाराम महाराजांस साष्टांग नमस्कार केला व म्हणाले कीं, आपण मला आश्वासन दिल्याप्रमाणें अनुग्रह न देतां निजधमास गेलात, आतां आपण मज दीनावर कृपा करावी. हें ऐकतांच सद्गुरु तुकाराम महाराजांनीं निळोबारायांचे मस्तकावर हात ठेवून पूर्ण अनुग्रह दिला; व जड मूढांचा उद्धार होण्याकरितां तूं कवित्व कर, अशी आज्ञा करून सद्गुरु तुकाराम महाराज अंतर्धान पावले. पुढें तुकाराम महाराजांच्या पश्चात् त्यांचे गादीवर अर्थात् निळोबा बसले. निळोबाचे शिष्य शंकर स्वामी हे मोगलाईंतील शिऊर गांवचे राहणारे होत. हे परम अधिकारी असल्यामुळें यांच्यावर निळोबांनीं पूर्ण अनुग्रह केला. म्हणून निळोबाच्या पश्चात् त्यांच्या गादीवर हेच बसले. शंकर स्वामीचे शिष्य मल्हाप्पा आप्पा. हे जातीचे लिंगाईत वाणी असून वाशी गांवाचे राहाणारे होते; हा गांव मोगलाईत आहे. मल्हाप्पा आप्पा परम वैराग्यशील आणि उपासनानिष्ठ असल्यामुळें शंकर स्वामीचे मागून त्यांच्या गादीवर हेच आले. येथपर्यंत अधिकारपरत्वें करून शिष्यपरंपरा चालत आली; व ती पुढें मल्हाप्पाचेच वंशामध्यें राहिली. पूर्वी पंढरपुरामध्यें भजनी फड यांचाच एक होता, व आतां जे फड हयात आहेत ते सर्व ह्याच्या शाखा असून ह्यांच्या टाळधऱ्यांनीं ह्यांच्या परवानगीनें स्थापिले आहेत. म्हणूनच हल्लीं पंढरीमध्यें वासकरांच्या फडास मुख्य समजतात. या प्रमाणें हा निळोबाचें पुढील शिष्यपरंपरेचा प्रकार झाला.

निळोबांना सद्गुरु तुकाराम महाराजांची कवित्व करण्याची आज्ञा झाली; हाच गुरुप्रसाद झाल्यामुळें निळोबांना तुकाराम महाराजाप्रमाणें प्रासादिक कवित्वस्फूर्ति होऊन त्यांनीं पुष्कळ अभंग केले; पण तुकाराम महाराजांच्या कवित्वांत व ह्यांच्या कवित्वांत फरक इतकाच आहे कीं, तुकाराम-महाराजांचे कांहीं अभंग गूढ असून समजण्यास कठीण आहेत. पण तसे यांचे मात्र नाहींत. निळोबाच्या अभंगाची भाषा अगदीं सुलभ असून ती जवळ जवळ हल्लींच्या प्रचलित महाराष्ट्र भाषेशीं जुळणारी आहे. मात्र इतके आहे कीं, तुकाराम महाराजांच्या काव्यांत जसें सौंदर्य आहे तसें यांच्या काव्यात नाहीं. तथापि विचारस्वारस्य " गुरूसे चेला सवाई " या म्हणीप्रमाणें निळोबाच्या काव्यांत आहे.

निळोबाचे अभंग निरनिराळ्या विषयांवर आहेत, पण हल्लीं जे त्यांचे गाथे उपलब्ध आहेत त्यांतून विषयवारीनें अभंग दिलेले नाहींत. ती उणीव दूर व्हावी म्हणून आम्हीं त्यांच्या अभंगांचें विषयवारीनें वर्गीकरण करून हा गाथा छापिला आहे. या गाथ्याचा वाचकांना एक मोठा फायदा आहे तो हा कीं, हे विषयवारी अभंग वाचतांना त्यांच्या भूमिकेचें वाचकांना ज्ञान होऊन सर्व अभंगाचे अर्थ सहाजिक रीतीनें कळतील. या गाथ्यांत जितक्या विषयांचे अभंग आहेत तितक्या विषयांचा अनुक्रम आम्हीं खालीं दिल्याप्रमाणें आहे:—

प्रथम चांगदेव चरित्र, नंतर पंढरीमहात्म व पांडुरंगाचें वर्णन, हरीचें वर्णन, भगवंताचें षड्गुणवर्णन व देवाची स्तुति, करुणापर अभंग व देवापाशीं मागणें, आपल्या स्थितीसंबधानें देवापाशीं उद्गार व जनांपाशीं उद्गार, मनास उपदेश, जनांस उपदेश, नामपर अभंग, कीर्तनपर अभंग, देवाशीं प्रेमाचें भांडण, देव-भक्तांचा संवाद, हरी हा भक्तांच्या अंकित राहून त्यांचें कार्य किती प्रेमानें व दक्षतेनें करतो, देव व भक्त यांची एकरूपता, संतांचें वर्णन, सद्गुरु तुकोबारायाचें वर्णन, संतकृपेनें प्राप्त झालेल्या स्थितीसंबंधानें जगापाशीं काढलेले उद्गार व संतांपाशीं काढलेले उद्गार, ढोंगी संत, गवळणी, बाळक्रीडा, कृष्णचरित्र, काला, चेंडूफळी, कोलकाठी, खेळांचीं रूपकें, सुरकांडी, टिपऱ्या, हुतुतू, आरती ज्ञानेश्वरांची, आळंदीची व पंढरीची तुल्यता, अलंकापुराचें वर्णन, ज्ञानपर, संतांपाशीं करुणा भाकणें, इतक्या विषयांचे अभंग आहेत.

यांतील भोळ्या भाविक जनांस विचार करण्यासारिखे करुणापर व देवापाशीं मागणें, नामपर, कीर्तनपर, या विषयांवरचे अभंग आहेत. कारण, या अभंगांतून देवापाशीं कवि काकुळती कशी करावी, व आपणांस जें इष्ट आहे. तें देवापाशीं किती विनयानें मागावें, व प्रभूच्या नांवावर परम श्रद्धा ठेवून तें नाम निशिदिनीं कसें घ्यावें, व त्याच प्रमाणें निरपेक्ष बुद्धीनें हरिकीर्तन करावें, म्हणजे हरी कृतार्थ करितो, हें चांगल्या तऱ्हेनें निळोबानें सांगितलें आहे. त्या प्रमाणें भोळ्या भाविक जनांनीं तें आपल्या आचरणांत आणावें, म्हणजे तें त्यांना श्रेयस्कर होईल. तसेंच संतवर्णनाचे जे अभंग आहेत, त्यांतून खऱ्या संतांचीं लक्षणें काय, व ते कशा अधिकाराचे असतात हें सांगितलें आहे; त्यांचाही भोळ्या भाविक जनांनीं लक्षपूर्वक विचार करून ते ध्यानांत ठेवावे. कारण ढोंगी संत आपलें व बायकापोरांचें पोट भरण्याकरितां साधुपणाचें लक्षण एकही अंगीं नसतां—केवळ संतपणाचा बाह्य वेष घेऊन,—जगास फसवितात; परंतु खरे संत निरपेक्ष बुद्धीनें पारमार्थिक ज्ञानादिदानाचा व्यवहार करतात. तसेंच ढोंगी संत भोळ्या भाविक जनांच्या बायका व पैका लुबाडतात. त्या योगानें आपण नरकांत जाऊन अनेक भाविकजनांना नरकांत नेतात. अशा प्रकारचा हा ढोंग्यांचा व्यवहार ढोंगी संतांच्या अभंगामध्यें वर्णन केला आहे, तोही भाविकजनांनीं चांगला लक्षांत ठेवावा.

हरिभक्तिपरायण विष्णु नरसिंह जोग.

# अनुक्रमणिका.


DBA00004070MAR

# निळोबाचा गाथा.

## निळोबाकृत चांगदेव चरित्र.

१. नमो ज्ञानेश्वरा नमो ज्ञानेश्वरा । निवृत्ति उदारा सोपान देवा ॥१॥ मुक्ताबाई नमो त्रिभुवनपावनी । आद्यत्रय जननी देवांचिये ॥ २ ॥ जगदोद्धारालागीं धरिले अवतार । मिरविला बडिवार सिद्धाईचा ॥ ३ ॥ निळा शरणांगत म्हणुनी आपुला । संता निरविला देउनी हातीं ॥ ४ ॥

२ ॐ नमो सिद्धासी नमस्कार केला । ग्रंथारंभ झाला ज्याचे कृपें ॥ १ ॥ त्याचिये कृपेचें अद्भुत सामर्थ्य । दावी सिद्धपंथ चालावया ॥ २ ॥ चालविला ग्रंथ ज्ञानदेवाभेटी । आले उठाउठी चांगदेव॥ ३ ॥ चांगदेव जन्म विद्येचाआयास । आणि योगाभ्यास मूळकथा ॥ ४ ॥ कथा हे विचित्र करितां श्रवण । पुण्यपरायण होती श्रोते ॥ ५ ॥ नारायण डोहो पुण्यक्षेत्र ग्राम । वस्ती गृहास्थाश्रम मुधोपंत ॥ ६ ॥ ग्रामलेखन वृत्ति यजुर्वेदीं ब्राम्हण । पंचमहायज्ञ कुळशील ॥ ७ ॥ धर्मपत्नी झाली गर्भातें धरिता। गर्भाधान रीती संस्कारें ॥ ८ ॥ आणूनी कुळगुरु केलें पुंसवन । आले मरुद्गण उदरासी ॥ ९ ॥ होतां नवमास प्रसूतीचा काळ । उपजला बाळ कुळदीप ॥ १० ॥ स्वरूपें सुंदर सभार लक्षणीं । देखतां लोचनीं मनोहर ॥ ११ ॥ अनुलोभन केलें सीमंतनयन । जातीकर्म विधाननामकरण ॥ १२ ॥ बहुताचि चांगलें चांगा म्हणउनी । जानिता जननी नाम ठेवी ॥ १३ ॥ निष्क्रमण आणि अन्नप्राशन झालें । पुढें आरंभिलें चौलोपनयन ॥ १४ ॥ व्रतबंध दीक्षा अनुग्रह गायत्री । संध्या वेदमंत्रीं संपादिली ॥ १५ ॥ प्रज्ञाशीळ बुद्धी गुरुमुखें ऐकता । संध्या तीन आवृत्ती पाठ होय ॥ १६ ॥ सांगतां नलगे गुरूसी आयास । त्रिकांड ग्रंथांस संपादिलें ॥ १७ ॥ चारी वेद साही शास्त्रें आभ्यासिलीं । अर्थ विचारिलीं स्वानुभवें

॥ १८ ॥ उपवेद आणि उपशास्त्रें घोकिलीं । पुराणें अवगमिलीं अष्टादश ॥ १९ ॥ व्रतें उद्यापनें कथानके वोवसे । अध्यात्में इतिहासें निपुण जाहला ॥ २० ॥ क्षुल्लकादिकमंत्र क्षुल्लकादिक विद्या । अभ्यासिल्या सध्या चमत्कृता ॥ २१ ॥ चौदा विद्या आणि चौसष्टीही कळा । अध्ययनीं आगळा दुजा नाहीं ॥ २२ ॥ अतीथि ब्राम्हण येती दर्शनासी । वंदुनी चांगयासी करिती पूजा ॥ २३ ॥ म्हणती विद्यासिद्ध अवतार जाहला । नेणो ब्रम्हा आला येणें वेषें ॥ २४ ॥ सकाळांसी हा पूज्य सकळांसी वंद्य । सकळांसी हा आद्य गुरु होय ॥ २५ ॥ ऐसा स्तुतिवाद करिती ब्राह्मण । समर्पिती धन कनक वस्त्रें ॥ २६ ॥ अमर्याद धन चांगया बहुमान । म्हणती कन्यादान द्यावें यासी ॥ २७ ॥ सत्पात्र जोडलें निज भाग्ययोगेंसी । करिती मुधोपंतासी विज्ञापना ॥ २८ ॥ वरासी दक्षिणा देऊं शें होन । तंव दुजा म्हणे द्विगुण देईन मी ॥ २९ ॥ एक म्हणती सहस्त्रमुद्रांचा संकल्प । करितों तरी अल्प यथाशक्तया ॥ ३० ॥ महानाम्नी व्रत महाव्रत गोदान । जाहलें उपनयन चतुर्दश ॥ ३१ ॥ तव वेदमूर्ती गुरु बैसवुनी पंगती । पूजन करूनि स्तविती चांगदेव ॥ ३२ ॥ या उपरी करा लग्नाचा विचार । म्हणती लहान थोर आप्तवर्ग ॥ ३३ ॥ विनवीत अती नम्र पुसती सकळांसी । उदईक प्रारंभासी ग्रंथ कोण ॥ ३४ ॥ तंव ते विस्मित होउनी बोलती ब्राह्मण । कुळासी मंडन जन्म तुझा ॥ ३५ ॥ आतां नाहीं ग्रंथ पहावया उरला । एक तो राहिला योगाभ्यास ॥ ३६ ॥ तरी तो उपदेशा म्हणती चांगदेव । द्यावा अनुभव त्याचा स्वामी ॥ ३७ ॥ तेवढीच विद्या राहाते तें काय । पुरुष प्रश्ना नव्हे श्लाघ्यपण ॥ ३८ ॥ तंव ते म्हणती आम्ही नेणों योगमार्ग । नाहीं तो प्रसंग विचारिला ॥ ३९ ॥ काय आम्हां चाड तया योगेंवीण । करूं संध्यास्नान जपादितप ॥ ४० ॥ युक्तआहारी जे कां इंद्रियांचे जती । तेचि योग्य होती तिये मार्गी ॥ ४१ ॥ मितलें बोलणें मितलें चालणें । मितलें ज्या धेणें अन्नरसा ॥ ४२ ॥ नैराश्य निर्लोभ लौकिकावरहित । तेचि प्रवर्तत अभ्यासीं या ॥ ४३ ॥ हटयोगें करितां प्राणनिरोधन । तो आव्हाटा भरोन विटंबी देह्या

॥ ४४ ॥ मग हा ना तोसा ठावो नपवोनि साधक । पावती निष्टंक क्षाणता देहें ॥ ४५ ॥ काळासी वंचन करितां क्षोभे काळ । मग तो नेदी स्थळ विश्रांतीचें ॥ ४६ ॥ नाना विघ्नें लय विक्षेप कषाय । रसस्वादनें अपाय रची त्यासी ॥ ४७ ॥ सिद्धीचा संभ्रम घालुनियां आड । करी त्याचा नाड स्वहिताचा ॥ ४८ ॥ ऐशिया संकटीं बळिया तोचि पावे । इतरांसी नागवे दुर्जय पवन ॥ ४९ ॥ तरी म्हणती चांगदेव साधीन तो योग । उपदेशिला सांग जरी कोणी ॥ ५० ॥ तंव ते म्हणती सुज्ञा ऐकावें वचन । आहे तें कारण निस्पृहाचें ॥ ५१ ॥ जे अखंड एकांतीं शुचिष्मंत चित्तीं । तेचि दृढावती योगासनीं ॥ ५२ ॥ तरी ते योगी कोठें आहेती स्वामिया । सांगा जाईन पायां शरण त्यांच्या ॥ ५३ ॥ तंव द्विज म्हणती योगी नाहींत स्वदेशीं । असती वाराणसीमाजीं विरळे ॥ ५४ ॥ तरी म्हणती चांगदेव जाऊं महाक्षेत्रा । योग आणि यात्रा उभय कार्या ॥ ५५ ॥ मग तीर्थरूपा आज्ञा मागोनि यात्रेसी । करिती मुहूर्तेसीं स्वस्त्यायन ॥ ५६ ॥ क्षौरादिक विधी केलें घृतस्नान । दक्षिणा भोजन देउनी द्विजां ॥ ५७ ॥ गणपतिपूजन पुण्याहवाचन । केलें आवाहन पूर्वजांचें ॥ ५८ ॥ पूजियेली मातापिता उभयतां । आप्तवर्गा गोता गौरविलें ॥ ५९ ॥ समर्पिलें तयां पुरे ऐसे धन । होय पुनरागमन आपुलें तों ॥ ६० ॥ क्षेत्र प्रदक्षिणा पूजिलें ब्राम्हणां । वंदिलें चरणां शिष्टांचिया ॥ ६१ ॥ निघाले बाहेरी मुहूर्तें प्रस्थान । आले बहुत जन बोळवित ॥ ६२ ॥ ऐकोनि प्रांतवासी आरमे दीन जने । विनविती स्तवनें चांगयासी ॥ ६३ ॥ म्हणती आम्हां नाहीं घडली वाराणसी । आणि हेत तो मानसीं बहुत काळ ॥ ६४ ॥ तरी चला समागमें म्हणती चांगदेव । होईल निर्वाहो सर्वांविशीं ॥ ६५ ॥ मग अनाथें दुर्बळें निघालीं बाहेरी । चालिलीं परिवारीं लक्षावत् ॥ ६६ ॥ खर्चा वेंचा तया देती चांगदेव । आणि सांभाळिती सर्व मार्गे पुढें ॥ ६७ ॥ सुसंग जोडला म्हणती

सकळ जन । नलगे घेणें ऋण संगें याच्या ॥ ६८ ॥ भागल्या श्रमल्या जाणे हा उपाय । रोगें येऊं नये याचे दृष्टीं ॥ ६९ ॥ चालतां मारगीं सामोरे जन येती । ऐकोनियां कीर्ति अलौकिक ॥ ७० ॥ महाव्याधी हरी अंधळ्यासी डोळे । वांझा पुत्रफळें पंगुसी पाय ॥ ७१ ॥ जे जे रोगी येती तयांसी उपाय । करिती तया काय उणें मग ॥ ७२ ॥ प्रार्थुनी करिती पूजा समार्पिती धनें । तोषविती स्तवनें नारीनर ॥ ७३ ॥ भरिल्या गाड्या धनें वस्त्रांच्या समृद्धी । जाती राज्यपदी मिरवत ॥ ७४ ॥ ऐसे आले वाराणसी ऐकोनि द्विजवर । क्षेत्रवासी भार पाहो आले ॥ ७५ ॥ देखोनि योग्यता सकळिकीं पूजिला । बहुमान जाहला महाक्षेत्रीं ॥ ७६ ॥ केला तीर्थविधि यथाशास्त्रन्यायें । पूजिले समुदाय ब्रह्मवृंदां ॥ ७७ ॥ ग्रहवृत्तिदानें मठभिक्षा दिधली । अष्ट तीर्थी केली प्रदक्षिणा ॥ ७८ ॥ मग गंध अक्षता द्विजां करूनी पूजन । आर्तीचें वचन अनुवादती ॥ ७९ ॥ म्हणती कोणा आहे योगाची धारणा । ते म्हणती आपणा गम्य नाहीं ॥ ८० ॥ वेदाध्ययनीं आम्ही स्वधर्मी निरत । नेणों कैसी मात योगाची ते ॥ ८१ ॥ यज्ञाचार आम्हां षट्कर्माचा धंदा । नेणों उदावादा पवनाभ्यास ॥ ८२ ॥ महाविवरीं एक आहे योगिराज । ऐकतसो सहज कर्णोपकर्णीं ॥ ८३ ॥ परी तें स्थळाचि परम गुप्त अवघड भयंकर । न करवे संचार कोणा तेथें ॥ ८४ ॥ तरी म्हणती चांगदेव जाऊं दर्शनासी । केलें स्तंभनासी व्याघ्रसर्पा ॥ ८५ ॥ पंचाक्षरी विद्या भारियेलीं भूतें । केलीं शरणागतें वेताळादी ॥ ८६ ॥ तंव प्रार्थिती द्विजवर नवजावें आपण । काय त्या योगेंवीण खोळंबलें ॥ ८७ ॥ सर्व विद्या तुम्हा आहेती स्वाधीन । कोणेविशीं न्यून पडिलें सांगा ॥ ८८ ॥ तया म्हणती चांगदेवजी एवढीच उणीव । येतें येर सर्व आलोडिलें ॥ ८९ ॥ तरी ते म्हणती देवा ऐकावें वचन । जीवासी येत न तेथें जातां ॥ ९० ॥ दरकुटी विशाळ आहे भयानक । जातां सकळ लोक मुकती प्राणा ॥ ९१ ॥ पिशाचें बहुवस असती विंचु सर्प । माजीं गडदधूप अंधःकार ॥ ९२ ॥ घरामाजीं घरें द्वारामाजीं द्वारें ।

विवरांत विवरे लक्षावरी ॥ ९३ ॥ गेलिया निर्गम नव्हेचि कोणासी । वर्जितो स्वामिसी याचिलागीं ॥ ९४ ॥ समागमीं सर्व येती काकुळती । अहो कृपामूर्ती चांगदेवा ॥ ९५ ॥ नवजावें आपण कदा विवरांत । सांगती आघात सर्व तेथें ॥ ९६ ॥ परी चांगदेवा साधणे हृद्गत । ते माईकर्ता मात कोणाचीही ॥ ९७ ॥ म्हणती तुम्हा आहे खर्चावया धन । एक मास पाहोन जावें मार्ग ॥ ९८ ॥ करूनियां संचार शोधिलें विवर । गेले योगेश्वर जेथें होता ॥ ९९ ॥ लागोनियां चरणां वेदाक्षरीं स्तविला ॥ प्रसन्न तो केला तपोराशी ॥ १०० ॥ तो म्हणे बाळका कैसा तूं आलासी ॥ संचार पवनासी नसतां येथें ॥ १ ॥ येरु म्हणे स्वामीं आपुल्या प्रसादे । आलो आशीर्वादे चरणांपाशीं ॥ २ ॥ संसारें पीडिलो जाहलो खेदक्षीण । म्हणोनि शरण आलो देवा ॥ ३ ॥ स्वामीच्या वचनें जन्मांतरें फेरे । चुकती आणि दुस्तरें हरती कर्मे ॥ ४ ॥ करोनियां कृपा म्हणावा जी आपुला । सेवक धाकुला नेणता मी ॥ ५ ॥ नुपेक्षावा कदा आला शरणांगत । हे तो धर्मनीत स्वामी खरी ॥ ६ ॥ हृद्गत हें माझें पाववावें सिद्धी । अहो कृपानिधी गुरुराया ॥ ७ ॥ मज शरणांगता करावा उपदेश । सांगा योगाभ्यास करीन मी ॥ ८ ॥ विचारिती गुरु आपुल्या मानसीं । म्हणती अनुतापेसी शरण आला ॥ ९ ॥ अव्हेरिता यासीं येईल दूषण । विरक्त हा पूर्ण मुमुक्षु जाहला ॥ १० ॥ अनुतापाचें लेणें लेऊनिया अंगी । जाहलासे वीरागी देहगेहा ॥ ११ ॥ वयें तो लहान दिसतो सगुण । अध्ययनें संपन्न वेदवेत्ता ॥ १२ ॥ सच्छिष्य विरळा जोडे भाग्ययोगे । महिमा ज्याच्या संगे गुरुत्वासी ॥ १३ ॥ देउनी आलिंगन आश्वासिलां कृपा । म्हणती केला बापा अंगीकार ॥ १४ ॥ यथा सांप्रदाये आज्ञा समावेश । दावियेला सौरस परंपरे ॥ १५ ॥ बैसवुनी सन्मुख घालीवले आसन । कळा स्थान मान उपदेशिती ॥ १६ ॥ कृपावंत गुरु म्हणती यमनियम । करी प्राणायाम, प्रत्याहार ॥ १७ ॥ ध्यान हे धारणा आसन हे मुद्रा । साधावी शिष्येंद्रा सिद्धीलागीं ॥ १८ ॥ रेचक

पूरक कुंभक आहाटक । पवनाभ्यास ऐक स्थिरबुद्धी ॥ १९ ॥ सगर्भ अगर्भ दाविले प्रकार । करी पवन स्थिर मनोजयें ॥ २० ॥ देह शीतळ पडतां करी अग्निधारण । सोमधारण उष्णें पीडता देह ॥ २१ ॥ प्राणनिरोधन सोहंमंत्रे जाण । करी प्राणापान ऐक्य दोघा ॥ २२ ॥ षट्चक्रांचे भेद दाविले विशद । मुक्त ब्रह्मरंध्र होय जेणे ॥ २३ ॥ काकीमुखअग्निचक्र औटपीठ गोल्हाट । सहस्त्रदळ श्रीहट पावावया ॥ २४ ॥ नाद बिंदू कळा ज्योतीचा अनुभव । जेणें साधे सर्व तें तें आंगे ॥ २५ ॥ जालंधर भेद आंताळी अभ्याळी । भ्रमरगुंफा कंकाळी पावे जेणें ॥ २६ ॥ ऐकतां सादर मुद्रा ठसावली । समाधी लागली चांगयासी ॥ २७ ॥ सद्गुरूच्या वचनें ऐके ज्या ज्या खुणा । पावे त्या त्या स्थाना तेचि क्षणीं ॥ २८ ॥ परी ते सविकल्प समाधी काष्ठा म्हणती तिसी । नावडे संतासी मूर्च्छा म्हणोनी ॥ २९ ॥ वासनेचा क्षय नव्हे ऐशा रीती । न चुके पुनरावृत्ती जडत्व तें ॥ ३० ॥ देखोनि त्याची प्राप्ति विस्मय करिती गुरू । म्हणती हा चमत्कारू थोर झाला ॥ ३१ ॥ एकाचि क्षणें कैसा झाला या अनुभव । प्रज्ञा अभिनव बाळकाची ॥ ३२ ॥ बहुत दिवस मीही करितों अभ्यास । परी न लभेचि सौरस याच्या ऐसा ॥ ३३ ॥ नवल हें देखलें एकाचि उपदेशें । भेदियेलीं निमिषें चौदाचक्रें ॥ ३४ ॥ भ्रमरगुंफे माजी केला रहिवास । गिळोनि निःशेष दशही प्राण ॥ ३५ ॥ ऐशीं सप्त वरुषें समाधी भोगिली । सत्रावी शोषिली अमृतकळा ॥ ३६ ॥ जिंकोनिया काळ घातला तोडरी । उभाविली गुढी विजयाची ॥ ३७ ॥ झाली योगसिद्धि मांडिले व्युत्थान । केलें उन्मज्जन इंद्रियांचे ॥ ३८ ॥ देखोनी गुरुदेव आलिंगन देती । आणि अनुभव मागती समाधीचा ॥ ३९ ॥ वचने तयासी अवस्था लाविली । कसोटी दाविली सिद्धाईची ॥ ४० ॥ घेउनीं अनुभव निघाले बाहेरी । ते आले घाटावरी मनकर्णिके ॥ ४१ ॥ तंव त्या देखियेलें तीरीच्या ब्राह्मणीं । ते लागले चरणी धांवोनीयां ॥ ४२ ॥ म्हणती समाम्ममी बहुझाले चुकुर । नव्हतां सत्वर तुमचे येणें ॥ ४३ ॥ क्षेत्रवासी ब्राह्मणीं करूनिया खेद । म्हणती प्रमाद थोर झाला ॥ ४४ ॥ गेले ते सांगाती तुमचे ग्रामा-

सी । न येतां तुम्हासी रुदन करित ॥ ४५ ॥ नेले क्षेत्रामाजी वाद्यांच्या गजरीं । घोष जयजयकारी करूनि हर्षे ॥ ४६ ॥ बाणली अनुमाई आंगीं योगकळा । गुरुत्वें आगळा भासे लोकां ॥ ४७ ॥ उपरम झाला सकळ इंद्रियां । स्वरुपीं विलया मन गेलें ॥ ४८ ॥ ऐसिया स्वानंदें बुझाविलें चित्त । राहिली अवचित वदनीं वाचा ॥ ४९ ॥ अष्टही आविर्भाव उठले आंगीं । प्राणी प्राणरंगी निजवासे ॥ ५० ॥ वेदत्रयी ठसा पडिला शरीरा । वृत्ती गेली घरां निजाचिया ॥ ५१ ॥ निमोनियां गेलें शब्दाचें बोलणें । पवनुची प्राणें शोषियेला ॥ ५२ ॥ ऐसा सुखासुखी पावला विश्रांती । पदपिंडा समाप्ती करूनियां ॥ ५३ ॥ सिद्धाईचा बहू वाढला बडीवार । पूजिती लहान थोर स्त्रिया बाळें ॥ ५४ ॥ देशोदेशीं वार्ता विस्तारिली ऐसी । ते येती दर्शनासी सिद्धाचिया ॥ ५५ ॥ राजे भेटी येती अनुग्रहीत होती । आशीर्वाद इच्छिती लहानथोर ॥ ५६ ॥ जया जें पाहिजे तें तें विद्या देती'। म्हणोनी शरण येती प्राणीमात्र ॥ ५७ ॥ नाना उपासना शिकती द्विजें न्यास । मंत्रादि यंत्रांस करितीं साध्य ॥ ५८ ॥ वेदाचीं अध्ययनें शास्त्रांचीं परिज्ञानें । शिकती रसायनें चिकित्सा नाडी ॥ ५९ ॥ ज्योतिष आयुर्वेद निघंट घोकिती । कोश विचारिती पंचाक्षरा ॥ ६० ॥ जारणमारणादि ससही प्रयोग । एक ते आगम योग करिती साध्य ॥ ६१ ॥ गारुडाचे दंश नृत्य संगीतास । घेती बहुत शिष्य बहुत विद्या ॥ ६२ ॥ असो आतां ऐसे शिष्य लक्षवत । झाले शरणांगत करिती सेवा ॥ ६३ ॥ यावरी द्वितीय प्रकरणींची कथा । परिसावी ते श्रोता देउनी चित्त ॥ ६४ ॥ निळा म्हणे पुढें ज्ञानेश्वर आख्यान । अद्भुत महिमान सिद्धाईचें ॥ ६५ ॥ इती श्रीचांगदेवचरित्र जन्मकर्म विद्यायोगाभ्यासकथनं नाम प्रथम प्रकरणं समाप्तम्

प्र०२. ऐसा बहुत काळ क्रमिला क्षेत्रांत । मग धरिला पृथ्वी हेत पर्यटणा ॥ १ ॥ उत्तरदक्षिण. मानस करावें । तीर्थां अवलोकावें आणि क्षेत्रां ॥ २ ॥ प्रांतोप्रांती शिष्यसांप्रदाय आपुला । वाढवावा हा धरिला

उद्देश मनें ॥ ३ ॥ मना आलें तेथें समाधी बैसोनी । प्रगटव्हावें जनीं दुजीये स्थळीं ॥ ४ ॥ सिद्धीसी खेळणें गगनेंसी बोलणें । पवनेंसी धांवणें अदृश्यगती ॥ ५ ॥ सत्यवाचासिद्धी मनोजयसिद्धी प्राणजयोबुद्धी निश्चयेसी ॥ ६ ॥ सर्वही पाहिलें सर्वही शोधीलें । सर्व अभ्यासिलें विद्याजात ॥ ७ ॥ वरीष्ट सकळां व्याकरणीं आगळा । गायनाची कळा सप्तस्वरीं ॥ ८ ॥ नृत्य करूं जाणें थैमानें संगीत । अनुकारें दावीत हावभाव ॥ ९ ॥ दशा-वतार खेळें सोंगें नानापरी । विद्या नाहीं उरी ठेवीयेली ॥ १० ॥ चौदाशें वरुषें काळाचा अतिक्रम । करूनि मठ आश्रम तप्तीतीरीं ॥ ११ ॥ जेवीं मोरासी सर्वांगीं पिच्छावरी डोळे । परी एक आंधळें दृष्टीवीण ॥ १२ ॥ तयापरी विद्यासिद्धीचा सोहळा । परी अपरोक्ष आंधळा आत्मज्ञानीं ॥ १३ ॥ नेणे भक्तीप्रेम सुखाचें साधन । सांगे चढला मान सर्वज्ञतेचा ॥ १४ ॥ चौदाशें वरुषांचे सिद्ध चांगदेव । स्वीकारिती भाव पूजकाचे ॥ १५ ॥ विद्येचे मूळपीठ साधनी वरिष्ट । स्वधर्मेकनिष्ठ व्रतधारी ॥ १६ ॥ आरोग्य शरीर अंगी दिव्य कांती । नामें विराजती चतुर्दश ॥ १७ ॥ चांगदेव चांगा वटेश्वर चांगा । चक्रपाणीचांगा चांगासिद्ध ॥ १८ ॥ शिवयोगीचांगा मणीसिद्धचांगा । अनकरचांगा नाहमानामें ॥ १९ ॥ नागेश नामें चांगा मुधेश नामें चांगा । सत्यसिद्ध चांगा निश्चळदास ॥ २० ॥ सिधादेवीचांगा म्हणवी वुटीचांगा । चौदानामें चागा वर्तमान ॥ २१ ॥ राजे प्रजालोक अनुग्रहीत झाले । विद्या अभ्यासिले बहुसाल ॥ २२ ॥ सिद्धीचा साधक वास तप्तीतीरीं । पुजीती नरनारी भावयुक्त ॥ २३ ॥ नित्य नूतन यात्रा येउनी लक्षावत । पावोनी मनोरथ फिरोनी जाती ॥ २४ ॥ वसविले बाजार भोंवते सवदागर । विकीताती संभार कणीयाचे ॥ २५ ॥ त्रिकाळ पूजन त्रिकाळ भोजन । करिती शिष्यजन आरतीया ॥ २६ ॥ तव आला अतिथी पांथीक । द्विजवर सांगे समाचार पैठणीचा ॥ २७ ॥ देखीलें अपूर्व चरित्र लोचनी । विस्मय तो मनीं नित्य वाटे ॥ २८ ॥ ह्मणे जी सिद्धिराया नवलची वर्तलें । प्रतिष्ठानी देखिलें सर्व जनीं ॥ २९ ॥ म्हैषीपुत्रामुखें बोलविल्या श्रुती । येउनी बाळमूर्ति महासिद्ध ॥ ३० ॥

आणुनी स्वर्गवासी पितर जेववीले । ते पुढती बोळविले निजस्थाना ॥ ३१ ॥ तें ऐकोनियां सकळही धिःकारिती त्यासी । म्हणती जाला यासी बुद्धीभ्रंश ॥ ३२ ॥ सिद्धापाशी ऐसें असत्य बोलतां । भोगिल हा निभ्रांता दुष्टफळें ॥ ३३ ॥ कैसा हा बोलीयेला भयचि न धरितां । अजागळी वार्ता अघटीतची ॥ ३४ ॥ म्हणती या मूर्खासी भोवंडा बाहेरी । पिशाच निर्धारी बरळे भलतें ॥ ३५ ॥ तंव तो म्हणे स्वामी निजनेत्रीं देखीलें । आणी तुम्हां हें वाटलें मिथ्या वाक्य ॥ ३६ ॥ तव सिद्ध ह्मणती त्यासी येऊनीया जवळीं । सांगावी समुळी वितळी कथा ॥ ३७ ॥ न वाटेचि हें सत्य अनुमानें सांगतां । कैंवी झाला वदता पशू मुखें ॥ ३८ ॥ काय त्याचीं नांवें जीहीं बोलवीला । म्हैसा पढवीला निगमें कैंवी ॥ ३९ ॥ तरि तो म्हणे स्वामी परिसावें सादर । सांगेन सविस्तर वर्तमान ॥ ४० ॥ तेथें चौघीजणें बाळें अकस्मात आलीं । अंगी विराजली योगमुद्रा ॥ ४१ ॥ प्रायश्चित्तांलागीं आलीं तया स्थळा । परि दाखविली लिळा असुमाई ॥४२ ॥ निवृत्ती ज्ञानदेवो सोपान मुक्ताई । नांवाची नवाई विप्रीं केली ॥ ४३ ॥ सातवें वरुष विराजे निवृत्ती । साहा वरुषांची मूर्ती ज्ञानेश्वर ॥ ४४ ॥ पांचवें वरुष सोपानदेवासीं । चौथें मुक्ताईसीं कुमारित्व ॥ ४५ ॥ त्यां देखोनियां ब्राह्मण आश्चर्य मानीती । बाळकें ह्मणती नागीरगोंडी ॥ ४६ ॥ म्हणवीती पतीत नाहीं वडीलधारे । पातित्य कवण्या द्वारें पुसावयासी ॥ ४७ ॥ तंव ते ह्मणती स्वामी धाडीलें ब्राम्हणीं । तीहीं दीधलें लिहूनी सविस्तर ॥ ४८ ॥ मग तया दाविती वंशावळी पत्रीका । आणि म्हणती किजो रंका पावन आम्हां ॥४९॥ पत्र तें वाचिती सादर मानसें । ऐकती विन्यास विप्रकुळें ॥ ५० ॥ आपेगांवकर गोविंदपंत निराई । आणि सिदोपंत गिरजाई आळंकापुरि ॥ ५१ ॥ ते श्रीगैनीनाथाची शुद्ध सांप्रदाई । परि येरयेरा नाहीं परिचय कदा ॥ ५२ ॥ त्या गोविंदपंता उदरीं वंशाचा उद्धार । उपजला कुमर विठ्ठल नामें ॥ ५३ ॥ केला व्रतबंध पढवीला अक्षर । वेदांतादी सार सांख्ययोग ॥ ५४ ॥ परमार्थीक ग्रंथ पाहिले गुरुमुखें । अध्यात्मीं निजमुखें विराजला ॥ ५५ ॥ परम विरक्त ज्ञानीया सात्विक । ब्रम्हचर्य नि

ष्टक व्रत चाली ॥ ५६ ॥ मातृपितृभक्त परम सुशीळ । नेदी अहंतामळ लागो अंगीं ॥ ५७ ॥ परी जावें रामेश्वरा उत्कंठीत मनीं । मग तीर्थरूपा पुसोनीं निघते झाले ॥ ५८ ॥ ब्रम्हचर्य व्रत त्रिकाळ साधन । स्नानअर्घ्यदान करित चाले ॥ ५९ ॥ गोदा उभय तीरें तीर्थें अवलोकीलीं । पुढें चाली केली भीमातीरें ॥ ६० ॥ मधुकरभिक्षा अनुतापें अथीला । तो आळंकापुरा आला अकस्मात ॥ ६१ ॥ तव तेथें गिरजाई होते सिदोपंत । परम भागवत स्वधर्मशीळ ॥ ६२ ॥ तयासी संतती होतें कन्यारत्न । रुक्माई अभिधान नाम तीये ॥ ६३ ॥ तीहीं विठोबाची देखोनिया स्थिती । कन्या दिधली हातीं संकल्पूनी ॥ ६४ ॥ करूनिया लग्न शुद्ध कन्यादान । केली समर्पण रुक्माई त्या ॥ ६५ ॥ मग ते तीर्थवासु गेले रामेश्वरा । करूनीया इतरा दक्षीण तीर्था ॥ ६६ ॥ सर्वेंची तेथुनी गेले वाराणसी । तंव ऐकिलें वार्तेसी गावींचीये ॥ ६७ ॥ श्रीगोविंदपंतासी देवआज्ञा झाली । मग उत्तरकार्य करूनी गयेसी गेले ॥ ६८ ॥ गयावर्जनाचा संपादिला विधी । जाले शुद्धबुद्धी विरक्ती बळें ॥ ६९ ॥ ऋणत्रयापासुनी झाला तोही मुक्त । मग आले ते पुनरुक्त महाक्षेत्रा ॥ ७० ॥ विरक्त मानसी अनुतापाचें बळ । वैराग्य निर्मळ अंतरनिष्ठ ॥ ७१ ॥ मठी नृसिंहाश्रमासी जाऊनियां शरण । केलें विसर्जन गृहस्थाश्रमा ॥ ७२ ॥ सर्व प्रायश्चित्तें केला प्रेषोच्चार । नाशिले विकार साही वैरी ॥ ७३ ॥ पूर्वआश्रमाचें त्यागुनियां नाम । जालें चैतन्याश्रम यती धर्मे ॥ ७४ ॥ शिरीं नारायण उदरीं नारायण गायत्री नारायण सर्वसंधीं ॥ ७५ ॥ जनीं नारायण विजनीं नारायण । वदनी नारायण सर्वकाळ ॥ ७६ ॥ सद्गुरूसेवनीं राहीले सतत । ते ऐकीयेली मात सिदोपंती ॥ ७७ ॥ करूनियां खेद उभय दंपत्य । हृदयीं रुक्माईतें आळंगिती ॥ ७८ ॥ म्हणती सर्वांविसी तुझें वो अनहीत । आम्हीची तें नेणत केलें मूर्खीं ॥ ७९ ॥ पांथिक विरक्त आला तीर्थवासु । तो देखोनियां उदासु दिधलें तुज ॥ ८० ॥ होणार ते बळीवंत होऊनियां गेलें । पूर्वार्जिता नचले कांहीं ॥ ८१ ॥ जिता अन्न तुज देउं चीर

चोळी । तुची आमुचे कुळीं कन्यापुत्र ॥ ८२ ॥ यावरी तुळसीवृंदावनीं पूजन । करूनि प्रदक्षिणा सारी काळ ॥ ८३ ॥ मग तेंचि दृढ व्रत धरीयेलें रुक्माई । नेणें दुजें कांहीं सेवेवीण ॥ ८४ ॥ तंव नृसिंहाश्रमासी निजस्वप्नीं दृष्टांत । झाला अकस्मात महाक्षेत्रीं ॥ ८५ ॥ चैतन्याश्रमासी आहे भार्या घरीं । पतिव्रता माहेरीं मार्ग लक्षी ॥ ८६ ॥ तरी तुम्ही जाऊनियां आणावी ते येथें । आणी द्यावें संन्याशाते तिचिये हातीं ॥ ८७ ॥ उभयतां एकत्र नांदवावी ऐक्यें । जंव होती बाळकें चौघें पोटीं ॥ ८८ ॥ इंद्रायणीतीरीं आहे ते सुंदरा । माजी आळंकापुरा पतिव्रता ॥ ८९ ॥ तरी तुम्ही अनुमान न करितां यदर्थी । जावें शीघ्रगती आणावी ते ॥ ९० ॥ मग नृसिंहाश्रम आले आळंकापुरासी । आणी नेलें वाराणसी सिदोपंता ॥ ९१ ॥ गिरजाबाई सवे रुक्माबाई घेतली । त्या उभयां भेटी केली वधुवरा ॥ ९२ ॥ आज्ञापिलें तेव्हां चैतन्याश्रमासी । रहावें सहवासी स्त्रियेचीये ॥ ९३ जंव चवघें अपत्यें होती ईचे कूसीं । तंव तुम्ही उदासी नये होऊं ॥ ९४ ॥ दंडकमंडलू घेतला हातींचा । आणि केला उभयतांचा मेळापाक ॥ ९५ ॥ करूनिया यात्रा आले आळंकापूरासी । कन्या जामातेसी सिदोपंत ॥ ९६ त्या देखोनि प्रांतीं उपहासिले बहुत जनीं । म्हणती यांतें नयनीं पाहों नये ॥ ९७ ॥ संन्यासी होऊनी भार्येशी संबंध । स्वप्नीं हें निषिद्ध नदेखावें ॥ ९८ ॥ वनिता आणी घरीं आणि बाहेरि संन्यासी । आतळता यासी प्रत्यवाय ॥ ९९ ॥ कामलोभी तरी कां जाहला संन्यासि । नेलें पूर्वजासीं अधःपाता ॥ १०० ॥ हरिलें शिखा सूत्र वर्ण याति गोत्र । गृहदारादी सर्वत्र त्यजुनीयां ॥ १ ॥ आणी घेउनीयां पत्नी पहुडे हा शेजेसी । पापात्मा संन्यासी पापरूपी ॥ २ ॥ विटाळ मानीती सर्वही दर्शनाचा । म्हणती हा पतीताचा शिरोमणी ॥ ३ ॥ बुडवीले स्वधर्म चतुर्थाश्रमासी । इहलोक परत्रासी आंचवला ॥ ४ ॥ विटंबिली काया नासीला परमार्थ । वेदबाह्य अनर्थ केला येणें ॥ ५ ॥ धिक् ऐसें जिणें म्हणती स्त्रियाबाळें । नेलीं उभय कुळें निरयवासा ॥ ६ ॥ उबगोनी षट्कर्मा त्यजीलें शिखासूत्र । आणि अंगीलें कलत्र परिग्रहो ॥ ७ ॥ परि तो को-

णासीही न बोले वचन । सर्वदा लपोन वसे गुंफे ॥ ८ ॥ नैवेद्य वैश्वदेव नाहीं स्मार्ताधान । श्राद्ध ब्रम्हयज्ञ विवर्जित ॥ ९ ॥ तयाची संतती मुलें चौघें जणें । प्रायश्चित्त कोणे कैसें द्यावें ॥ १० वडील निवृती दुजा ज्ञानदेवो । तिजा सोपान देवो मुक्ताबाई ॥ ११ ॥ तें वाचीलीया पत्र हांसती सकळ । म्हणती यातीकुळ नाहीं यांसी ॥ १२ ॥ नव्हतें जें ऐकिलें तें नेत्रीं देखिलें । अपूर्व हीं मूलें श्रीपादाचीं ॥ १३ ॥ चतुर्थाश्रम आणि भार्येसी संबंध । ऐकतां हें निषिद्ध घडती दोष ॥ १४ ॥ ठेवियेली नांवें बरवीं विचारुनी । केलीं उपजवोनी पतित पोरें ॥ १५ ॥ ज्ञानदेवो अर्थे ज्ञानाचा दीवस । आणि हा तो पतित वेष बाळकाचा ॥ १६ ॥ ईतीचिये पोटीं जन्मले पतीत । नामें विपरीत ठेवीयेलीं ॥ १७ ॥ जेविं छत्रपति म्हणती घरींच्या बाळका । परी कैंचा गज सिक्का राज्य त्यासी ॥ १८ ॥ निवृत्ति नाम आणि प्रवृत्ति बांधला । सोपान अवघडला प्रत्यवायीं ॥ १९ ॥ मुक्ताबाई आणि मुक्तीची सुराणी । ज्ञानदेवो आणि पातित्य भोगी ॥२०॥ तंव एक म्हणती द्विज होता नामापासी काय । राजा आणि वाहे मोळ्या शिरीं ॥ २१ ॥ रवी नाम आणी दधी मंथन करीत । फणी विंचरीत वनिता केश ॥ २२ ॥ इंद्रधनुष्य आणि क्षणमात्रेंची विरे । मेरू आणि फिरे माळेसवें ॥ २३ ॥ पैल तो गे म्हैसा पखाले वाहती । आणि ग्याना तया म्हणती. विश्वजनीं ॥ २४ ॥ म्हैसीपुत्र आणि नामें म्हणती ग्याना । तरी काय तो होईल प्रज्ञाशीळ ॥ २५ ॥ हें ऐकोनि ज्ञानदेव बोलती तयासीं । होती ज्ञानरासी आत्मा माझा ॥ २६ ॥ आज्ञानासी ठावो नाहींची पाहतां । विचारा वेद आतां देईल साक्ष ॥ २७ ॥ तंव म्हणती ते द्विज हे पूर्णाची बोलणीं । बोलती वायाणी मुर्खे पोरें ॥ २८ ॥ उपवासी उद्गार देती घाल्या ऐसे । परि ते फोस जैसें भुकेल्याचें ॥ २९ ॥ श्रीपाद बोलतां ऐकीलीं जीं वचनें । तेची धरुनि मनें बैसलीं हे ॥ ३० ॥ कुपथ्य हें यासी झालें सर्वोपरी । प्रायश्चित्तावरी पडिला धोंडा ॥ ३१ ॥ वासुदेव सर्वांभूतीं हे बोलती । परी बहुत जन्माते प्रतीती ज्ञाननिष्ठे ॥३२॥ शुक्र सनकादिकाचे हे स्वानुभव । पावती मानव कैसापरी ॥ ३३ ॥

शब्दज्ञानी सर्वही कथनीं हेंची कथिती । परी तैसा न पवती स्वानुभव ॥ ॥ ३४ ॥ ऐशा करूनिया स्त्रीक्या धिःकारें बोलती । नाश केला म्हणती वृथा ज्ञानें ॥ ३५ ॥ पुसा याशी कैसा तुझा आत्मा पशू । हा दावी सौरसु बोलील्याचा ॥ ३६ ॥ त्याचीया ताडणें तुज येती वेदना । कीं पावसी यातना त्याच्या घातें ॥ ३७ ॥ हा दावीशी चमत्कार तरी तूं ज्ञानेश्वर । ऐसें द्विजवर बोलीयेले ॥ ३८ ॥ म्हणती ज्ञानदेव संदेह निरसावा । ह्मैसा आणवावा जवळीके ॥ ३९ ॥ मग अणुनी टोणगा मारीती शिपुटी तंव तोची उठी ज्ञानदेवा ॥ ४० ॥ देखोनी आश्चर्य येरयेरा दाविती । आणि आसुमाई हें म्हणती नवलथोर ॥ ४१ ॥ बोलील्या सारखी कर्तृत्वाची शक्ती । आंगी तेची विभूती ईश्वराची ॥ ४२ ॥ उदंडे बोलती हावभाव दाविती । परी ते प्रतिष्टाची मिरवीती ॥ ४३ ॥ आजी हें अपूर्व देखीलें लोचनीं । जे परदुःख लेउनी दाविलें आंगीं ॥ ४४ ॥ तंव ते कुटीळ म्हणती हें सर्व ही बाजीगीरी । दाविताती परी विद्याचिया ॥ ४५ ॥ गौडबंगालीची विद्या हे प्रसिद्ध । शिकवूनी प्रबुद्ध केलीं पोरें ॥ ४६ ॥ चतुर्थाश्रमांत करितीं तीर्थाटणें । शिकला टाणटोणे क्रियाभ्रष्ट ॥ ४७ ॥ पतीत संन्यासी पतिताचे मंत्र । पढविले अपवित्र अर्भकांसी ॥ ४८ ॥ सर्वांवीशी तेणें नाश केला यांचा । जें प्रायश्चित वाचा न वदे श्रुती ॥ ॥ ४९ ॥ गुरू आज्ञेवरी होऊनी सोकाळ । लावीयेला वीटाळ चतुर्थाश्रमा ॥ ५० ॥ अभिचारपूजा कापट्याचीं बीजें । घोकविलीं वोजें मूर्खपोरां ॥५१॥ या अर्भकासी थार नाहीं ऐसी केलीं । आणि उभय कुळें नेलीं पतनद्वारा ॥ ५२ ॥ तंव सात्विक प्रबुद्ध बोलती तयासी । नये गुणदोषीं चित्त ठेवूं ॥ ५३ ॥ दिक्षादानी ऐसे भासती लोचनी । पैशुन्य वचनीं काय काज ॥ ५४ ॥ न कळेची माहिमा कदाहि कोणाचा । नये बोलों वाचा हेळसुनी ॥५५॥ जानकी स्वयंवरीं श्रीराम बाळरूप । आणि भंगूनीयां चाप पर्णिली सीता ॥ ५६ ॥ बटुरूपी वामन तीन पादभूमी । मागोनी आक्रमी अवनी सर्व ॥ ५७ ॥ तैसाची प्रल्हाद दैत्याचीये वंशीं । झाला वैष्णवाशी अग्रगण ॥ ५८ ॥ मर्कट योनीसी जन्मला हनुमंत । प्रताप अद्भुत आंगीं त्याचे ॥ ५९ ॥ घटमाजी जन्म आणि प्राशीला सागर । पहा तो द्विजवर अगस्तीमुनी ॥ ६० ॥

असो हें न झांके सुवर्ण कसवटी लावितां। भानू आच्छादिता अभ्रछाये॥६१॥ याहिवरी यासी युक्ति एकी आहे। जेणें निःसंदेह फिटे भ्रांती॥ ६२॥ जरी हा बोलवील पशु स्पष्ट निजमुखें। तरी याचे श्रुतीकें आत्मज्ञान॥६३॥ तरी मानू हैसा याचा आत्मा खरा। करूं परीहारा दोषमुक्त॥६४॥ ऐकोनीयां सकळ मानवले द्विज। म्हणती हेची वोज बरवी युक्ती॥ ६५॥ येऱ्हवी पद्धती नाहीं ग्रंथांतरी। प्रायश्चिता वरी वचन याच्या॥ ६६॥ यतीधर्मामाजी पत्नी आपंगीली। नाहीं हे ऐकीली शिष्टाचारीं॥ ६७॥ कैचें प्रायश्चित्त श्रीपादाच्या पोरा। कीजे परीहारा दंडुनि दोषां॥ ६८॥ न करवे सर्वथा याचा अंगीकार। बरवा हा विचार काढीयेला॥ ६९॥ वरी म्हणे निळा पुढीलीये प्रकर्णी। वेद घोषें वाणी गर्जेल पशु॥ ७०॥ इति श्रीचांगदेवचरित्रे ज्ञानेश्वरजन्मकर्मनिरुपणंनाम द्वितीयप्रकरणं समाप्तं।

३ बरवीं हीं गुंतलीं आपुल्या वचनें। निमित्ता वरून भोंवडावीं॥ १॥ विचारुनी ऐसें बोलिले सकळ। वदवीं अविकळ पशुमुखें॥ २॥ तुझा याचा आत्मा आहे एक जरी। वदवीं ग्यान्या तरी येचीक्षणीं॥ ३॥ नाहीं तरी वृथा न करावी वल्गना। घेऊनियां पतना जावें स्थळां॥ ४॥ म्हणती ज्ञानदेव तुमच्याचि प्रसादें। करील घोष वेद म्हैसी पुत्र॥ ५॥ कराल तें काय नव्हे धरामर। पाषाणीं ईश्वर प्रतिमे स्थापा॥ ६॥ ग्रंथत्रयामाजीं सांगा जी निरुता। पढावा कोणता वेद येणें॥ ७॥ ऐकोनि सकळ विस्मयें बोलती। ऋग्वेदची म्हणती पढवा यासी॥८॥ मग देऊनी वरदान केली आज्ञा त्यासी। पशू प्रारंभासी करितां झाला॥ ९॥ मुख्य प्रणवोच्चारें काढियेला स्वर। देखोनि द्विजवर ठकावले॥ १०॥ लागली टकमक सांडलें निज धैर्या। म्हणती गेलों वाया दुराभिमानें॥११॥ संहिता पद क्रम उपन्यासें स्वरित। सूत्रादिनिरुक्त शिक्षा छंद॥१२॥ अष्टाध्यायी मीमांसा-अरण ब्राम्हण। मांडिलें अध्ययन युगादीचें॥ १३॥ बोलियेला म्हैसा वेदाच्या सुस्वरीं। हें सकळ द्विजवरीं देखियेलें॥१४॥ मग गळाले अभिमानें जाहले विगलीत। चरणीं लोळत दीनपणें॥ १५॥ म्हणती हेचि देव तिन्ही मूर्तिमंत। मुक्ताई सावंत परमात्मा॥ १६॥ नेणोनिया महिमा या-

वळलों जी देवा । तो परिहार आतां द्यावा काय किती ॥ १७ ॥ घडले जे अपराध ते ते करा क्षमा । अहो सिद्धोत्तमा विश्वंद्या ॥ १८ ॥ अज्ञान गर्वित गेलों जी अभिमानें । बोलियेलो वचनें अमर्यादें ॥ १९ ॥ सर्वी सर्व तुम्ही सदा सर्वगत । कैचें प्रायश्चित नित्यमुक्ता ॥ २० ॥ निमित्तें करूनि करितां उद्धार । जडजीवा आधार चरण तुमचे ॥ २१ ॥ विश्वाच्या उद्धारा तुमचें अवतरण । कराया स्थापन स्वधर्माचें ॥ २२ ॥ कळलेती यावरी विधीचे जनिते । व्यापूनीं सकळांतें सगुणरूपीं ॥ २३ ॥ ऐशीं करूनि स्तवनें करिती दंडवते । आणि मागती आज्ञेतें विनीतता ॥ २४ ॥ घेऊनि निरोप जाती मंदिरांसी । म्हैसा देऊनी त्यासी पढीण म्हुण ॥ २५ ॥ ऐकोनी अद्भुत ऐसा चमत्कार । येती नारीनर नमस्कारा ॥ २६ ॥ घरोघरीं चर्चा स्त्रियाबाळें करिती । प्राणीमात्र वर्णिती कीर्ति त्यांची ॥ २७ ॥ मिळो-नी परस्परें विप्र अनुवादती । योग्यता हे म्हणती नकळे यांचीं ॥ २८ ॥ तंव आणीकही एक नवल वीतलें । क्षेत्रींच्या देखिले सर्व जनीं ॥ २९ ॥ क-रिती विस्मयचर्चा तंव येरे दिवसीं । श्राद्ध गृहस्थासी होतें घरीं ॥ ३० ॥ तेणें त्या चौवासीं दिधलें निमंत्रण । त्याचे पितृगण आणियेले ॥ ३१ ॥ देऊन भोजन केले स्वर्गवासी । सांगीतली ऐशी मात तेणें ॥ ३२ ॥ तें सादर चांगदेवें ऐकीयेलें श्रवणीं । आणखीही ब्राम्हणीं संनिधींच्या ॥ ३३ ॥ श्रवणेंचि सिद्धासी ताटस्थ्य लागलें । प्रश्नीं विचारिलें ज्योतिषमतें ॥ ३४ ॥ तंव तें सत्य ऐसें आलें अनुमाना ॥ वि-स्मयें त्या नयनां अश्रू आले ॥ ३५ ॥ म्हणे हें तों नव्हे तपाचें सामर्थ्य । होती मूर्तिमंत देवची ते ॥ ३६ ॥ अपूर्व हे वार्ता नवलचि ऐकिली । पूर्वीं नाहीं झाली नव्हे पुढें ॥ ३७ ॥ अनुतापें झाला उद्विग्न मानसी । पुसे ब्राम्हणासी पुढतोपुढतीं ॥ ३८ ॥ कोण त्यांचा ग्राम झाले किती दिवस । द्विज म्हणे मास एक झाला ॥ ३९ ॥ इंद्रायणी तीरीं आहे अलंकापूर ॥ तेथें निरंतर वास्तव्य त्या ॥ ४० ॥ पुसोनि ब्राम्हणा गेले नेवासिया । म्हैसा घेऊनियां समागमें ॥ ४१ ॥ ऐकोनी चांगदेवे शिष्य पाचारिले । आणि एकांतासी गेले सांगती त्या ॥ ४२ ॥

यावरी पूजन न करावें आमचें । सांगतों हें साचें धरा चित्तीं ॥ ४३ ॥ तंव ते विनविती होऊनि भयभीत । आज्ञा किंनिमित्त केली ऐसी ॥ ४४ ॥ आम्ही तों अज्ञान नेणों स्वामी सेवा । अपराध तो देवा किजे क्षमा ॥ ४५ ॥ त्या म्हणती चांगदेव पूजेचे अधिकारी । आले महीवरी तेचि पूज्य ॥ ४६ ॥ जेवीं सूर्यवंशीं अवतरतां राघव । राहिला भार्गव मागील मार्गे ॥ ४७ ॥ शिष्ट असतां पूजा न घ्यावी आपण । आहे हें प्रमाण वेदशास्त्रीं ॥ ४८ ॥ करितां अमर्यादा जावें पतनासी । भय हें मानसीं बहुत वाटे ॥ ४९ ॥ शतमख करूनिया नहुष स्वर्गी गेला । परी अमर्यादें पावला सर्पत्व तो ॥ ५० ॥ त्रिशंकू सगर ऐसे सांगों किती । अमर्यादें येती पतनद्वारा ॥ ५१ ॥ तरी ते पूज्य प्रकट झाले मूर्तिमंत । ऐकिलें तें सांप्रत याचि काळे ॥ ५२ ॥ नव्हती ते मानवी देवाचे अवतार । निवृत्ति ज्ञानेश्वर सोपानदेवो ॥ ५३ ॥ मुक्ताबाई आदिमाया हे जननी । केला प्रतिष्ठानीं कीर्तिघोष ॥ ५४ ॥ म्हैसीपुत्रामुखें बोलविल्या श्रुती । आश्चर्य हें चित्तीं बहुत वाटे ॥ ५५ ॥ जावें भेटीलागीं विचारिलें मनीं । हे सिद्धी साधनीं नव्हे कोणा ॥ ५६ ॥ अनुतापें झाला संतप्त मानसी । म्हणे सिद्धाईसी खेव आला ॥ ५७ ॥ तंव बोलती प्रबुद्ध त्यासीचि आणावें । अहो मूळ पाठवावें सिद्धराया ॥ ५७ ॥ सर्व सत्ता तुम्हां आहे जी स्वाधीन । राजे प्रजाजन आज्ञेमाजीं ॥ ५९ ॥ तंव म्हणती चांगदेव नव्हे हा विचार । आज्ञेचा बडिवार कोणा अंगीं ॥ ६० ॥ वंचूनियां काळा रक्षिलें शरीर । बहूत दिस भार वाढविला ॥ ६१ ॥ परी हें सामर्थ्य नाहीं आम्हां अंगीं । जावें भेटीलागीं हेंचि सत्य ॥ ६२ ॥ जन्माचें सार्थक सिद्धाचीये भेटी । होईल या तुटी संसारेंसी ॥ ६३ ॥ परी सिद्धपणा येईल उणीव । काय कीजे जीव तळमळी ॥ ६४ ॥ ते म्हणती देवा हे नव्हे सत्य वार्ता । म्हैसा केवीं वदतां होईल वेदां ॥ ६५ ॥ आणि मृत स्वर्गवासी पितर कैसे येती । ते भोजनें करूनि जाती हेंही मिथ्या ॥ ६६ ॥ स्वामीसी विश्वास वाटे भलतीयाचा । परी हा नव्हे साचा वर्तमान ॥ ६७ ॥ नाहीं ये वार्तेसी साक्ष पडताळा ।

बोलियेला वाचाळ मिथ्या द्विज ॥ ६८ ॥ तंया म्हणती चांगदेव रे प्रश्न म्यां पाहिला तोही उतरिला यथार्थपणें ॥६९॥ तों शिष्य म्हणतीदेवा प्रश्नही चुकतो। न सांपडतां जातो वेळ काळ ॥ ७० ॥ हें ऐकोनि तयांसी सिद्ध म्हणती तुम्ही मूर्ख.। अरे वि[illegible] आहे चोख पढित माझी ॥ ७१ ॥ तरि ते म्हणती देवा आणवावी वार्ता। पैठणीहुनी तत्त्वतां धाडूनि शिष्य ॥ ७२ ॥ मग विद्यार्थीया म्हणती जा रे प्रतिष्ठाना। आणि हें वर्तमान आणा यथातथ्य ॥७३॥ ॥ चिरंजीव सकळ क्षेत्रवासी द्विजा। आशीर्वाद [illegible] लिहा पत्रीं॥ ७४ ॥ नवल हें ऐकिलें रेडा बोलविला। निगमाक्षरीं केला घोष तेणें ॥ ७५ ॥ स्वर्गस्थ पितर आणूनि जेवविले। पुनरपि बोळविले स्वर्गाप्रती ॥ ७६ ॥ साच की हें मिथ्या धाडावें लिहुनी। तें ऐकावया मनीं उत्कंठीत ॥ ७७ ॥ सांगती शिष्यासी जाऊनी त्वरीत। यावें शिघ्रवत बरावरी ॥ ७८ ॥ चालिले तेथूनी सत्वर ब्राह्मण। ते पावले पैठण गंगातीरा ॥ ७९ ॥ तींही ऐकोनी चांगदेवें पाठविलें पत्र। मिळाले सर्वत्र क्षेत्रवासी ॥ ८० ॥ धूतवस्त्रावरी गोधुमाची राशी। मांडिलें पत्रासी पूजा केली ॥ ८१ ॥ आलिंगिलें पत्र कंठी उरी शिरीं। वाचिलें समग्रीं श्रवण केलें ॥ ८२ ॥ कळला अभिप्रावो विस्मयें दाटले। ते सिद्ध आठवले बाळवेषी ॥ ८३ ॥ फुंदती गाळिती उभय नेत्रीं जीवन। म्हणती धन्य धन्य ईश तिन्ही ॥ ८४ ॥ पूर्वार्जितें होती उत्तम गोमटीं। म्हणोनी ते दृष्टीं देखयेले ॥ ८५ ॥ मग म्हणती सिद्धासी झालें हें उपश्रुत। नवल जें अद्भुत वितलें येथें॥ ८६ ॥ दिव्यक्रीडा ऐसे संत आचरति। दिगंता धांवत वाऱ्यावरी ॥ ८७ ॥ कैसी विस्तारिली आख्या दुरदेशीं। आश्चर्य हेचि मानसीं बहुत वाटे॥ ८८ ॥ सन्मानुनी ब्राह्मणां दीधलें भोजन। वस्त्रें पांघरवून गौरविलें ॥ ८९ ॥ दीधली दक्षिणा मार्गीं खर्चावया। पत्र लिहूनियां दिलें हातीं ॥ ९० ॥ परात्परा सिद्धा गुरूसी नमन। पत्र अवलंबन केलें स्वामी ॥ ९१ ॥ विद्यार्थीं ये आम्ही सर्वही ब्राह्मण। झालों सुखसंपन्न आशीर्वादें ॥ ९२ ॥ देवें ऐकिली जे वार्ता सत्य वितली येथें। पढविलें पशूतें वेदघोषें॥ ९३ ॥ गृहस्थाचे पितर आणुनी जेंवविले। प्रत्यक्ष पाहिलें आपण नेत्रीं ॥ ९४ ॥

निवृत्ति ज्ञानेश्वर मुक्ताई सोपान । वय तों लहान बाळवेषी ॥ ९५ ॥
करूनी ऐसी क्रीडा येथुनी स्वार झाले । नेवासिया गेले महासिद्ध ॥ ९६ ॥
तया स्थळीं केला भगवद्गीता अर्थ । दहा सहस्त्र ग्रंथ सिद्ध झाला ॥ ९७ ॥
तो बाबाजीपंतांनीं स्वहस्तें लिहिला । परी ओंवीबद्ध केला ज्ञानेश्वरीं ॥ ९८ ॥
मग सच्चिदानंदबावा ठेवियेलें तया नांव । शिक्षापिला भाव देखोनियां ॥ ९९ ॥
एक पशु दुजा सच्चिदानंदबावा । शिष्य केले नभा नाकळतां ॥ १०० ॥
येथूनिया जातां अळंकापूरीसी । पशू आळियापाशीं स्थापियेला ॥ १ ॥
अजान वृक्ष तेथें ठेवियेली खूण । झालें निरूपण निवेदिलें ॥ २ ॥
तें घेऊनियां पत्र द्विज आले तप्तीतीरा । नमिलें वटेश्वरा चांगयासी ॥ ३ ॥
करूनि नमस्कार पत्र दिलें हातीं । नवलावो सांगतां देखिला तो ॥ ४ ॥
म्हणतां सत्य देवा अद्भुत चरित्र । वर्णिती सर्वत्र तेथिचे जन ॥ ५ ॥
मग वाचिलीया पत्र म्हणती चांगदेव । अरे वार्ता अभिनव नित्य नवी ॥ ६ ॥
विचारितां दिसे नव्हे हें सामान्य । गेला अभिमान गळोनियां ॥ ७ ॥
कायरे अतिक्रम करविला मज हातीं । फिटली असतां भ्रांति पाहोनि त्यातें ॥ ८ ॥ आतां तरी जावें म्हणती अळंकापुरा । सामर्थ्या कर सिद्ध वेगीं ॥ ९ ॥ तंव शिष्यजन सर्व गृहस्थ मिळाले । सकळीं प्रार्थिलें म्हणती देवा ॥ १० ॥ सिद्धाई कोणाची नाहीं स्थिरावत । तपाचें सामर्थ्य वेंचलीया ॥ ११ ॥ आहे नाहीं आतां त्यांचें सिद्धपण । धाडा विचक्षण पाहोनि येती ॥ १२ ॥ मग तैशासारिखा करावा विचार । जेणें येरझार चुके देवा ॥ १३ ॥ मग पाचारिले प्रौढ वृद्धतपोराशी । जा म्हणती तयांसी अळंकापुरा ॥ १४ ॥ वसती सिद्ध तेथें निवृति ज्ञानेश्वर । सोपान मुनेश्वर मुक्ताबाई ॥ १५ ॥ सिद्धपण त्यांचें आहे कीं वेंचलें । तें पाहोनि यावें वहिलें वेगावत ॥ १६ ॥ ते म्हणती स्वामीया संतांचें लक्षण । काय कैसी खूण सांगा आम्हां ॥ १७ ॥ वर वेषा आम्हीं पाहावें ते काय । अंतरींचें नव्हे विद्यमान ॥ १८ ॥ गृहस्थाश्रमीं एक उदास दिसती । एक ते भासती व्यवसायीसे ॥ १९ ॥ एक वेडे मुके पंगु मुद्राहीन । चतुर व्युत्पन्न दिसती एक ॥ २० ॥ देहाच्या संबंधे दिसे

देहाकृती । अवस्थाही भोगिती यथाकाळें ॥ २१ निद्रित नीजेमाजीं जागेचि जागृती । स्वप्नींहि देखती नानाविध ॥ २२ ॥ इंन्द्रियां वर्तविती स्वभावव्यापारीं । दिसती संसारीं अतिदक्ष ॥ २३ ॥ बाळक कौमार वृद्धाप्य तारुण्य । दिसती शक्तिहीन व्याधिग्रस्त ॥ २४ ॥ क्षुधाकाळीं अन्न प्रसादाते घेती । तृषाकाळीं पीती जीवनाते ॥ २५ ॥ इतराचि सारिखे दिसती तेही जनीं । काय तें पाहोनी यावें आम्हीं ॥ २६ ॥ हांसती रुसती शिव्या देती एका । दिसती लौकिकासारखेची ॥ २७ ॥ न चोजवे आम्हां संतांची निज खूण । सांगावें लक्षण तेंचि पाहों ॥ २८ ॥ आंगे संत तोचि ओळखे संतांसी । काय आणिकासी वर्म कळे ॥ २९ ॥ म्हणती चांगदेव साच हे बोलिले । विचार नचले युक्ती तेथें ॥ ३० ॥ कायरे करावें पूसती शिष्यांसी । ते म्हणती सिद्धासी द्यावें पत्र ॥ ३१ ॥ लिहोनि पत्रिका द्यावी यांचे हातीं । ते देउनि पाहती स्थित्यंतर ॥ ३२ ॥ पत्राचें उत्तर काय देती कैसें । अर्थी अनायासें येईल कळों ॥ ३३ ॥ मग पत्र लिहावया बैसले एकांतीं । तव न चालेची युक्ति थोटावली ॥ ३४ ॥ अनामासी नाम अरूपाशीं रूप । कैसें लावूं पाप कल्पनेचें ॥ ३५ ॥ चिरंजीव म्हणों तरी विश्वात्मक । आणि तीर्थरूप तरी बाळकदशा आंगीं ॥ ३६ ॥ न दिसेचि पूर्वी न लभेचि अक्षर । पडियेला विचार न चले हात ॥३७॥ मग दिधली टाकुनी पत्रिका लेखणी । चित्तीं चिंतवणी पैठी झाली ॥ ३८ ॥ हें देखोनि सकळ प्रार्थिती सिद्धासी । कां हे दशा ऐसी विपरीत ॥३९॥तंव म्हणती चांगदेव कायरे लिहावें । मूळाचि न संभवे पत्रिकेचें ॥४०॥ तरी ते ह्मणती देवा कोरें पत्र पुरे । द्यावें अत्यादरें पाठवुनी ॥ ४१ ॥ युक्तीमाजीं दिसे बरवा हा सिद्धांत। सिद्धाईचा अर्थ गूढ गुह्य ॥४२॥ मग घालुनीयां वंडी कोरें पत्र देती। आणि उत्तर म्हणती मागा त्यासी ॥ ४३ ॥ जाऊनियां तुम्हीं यावें शीघ्रवत । करा दंडवत क्षेम सांगा ॥ ४४ ॥ चालिले तेथुनी आले शिवपीठा । वास्तव्य वरिष्ठा सिद्धा जेथें ॥ ४५ ॥ यावरि ह्मणे निळा पत्राचें उत्तर । देती ज्ञानेश्वर परिसावें तें ॥ ४६ ॥ अत्यंत रसाळ आहे निरूपण । पुढील प्रकरण करोटीचें ॥ ४७ ॥ इतिश्रीचांगदेवचरित्रे पत्रप्रेषणंनाम तृतीयप्रकरणं ॥

प्र. ४ पावले ब्राह्मण अळंकापुरासी । आनंदमानसी न समाय तो ॥ १ ॥ तंव देखिला दंड क्षेत्रवासी जन । प्रातःकाळीं प्रश्न करिती तीर्थी ॥२॥ पूजूनि सिद्धासी नर नारी बाळें । जातातीं राउळा आपुलाल्या ॥ ३ ॥ ते बाळलीळा वेषें आनंदें खेळती । नर नारी देखती येतां जातां ॥ ४ ॥ खालावुनी माथा श्रीमुख पाहती । आणि आपुलाल्या जाती कामा लोक ॥५॥ हें देखोनियां ब्राह्मण मनी विचारिती । येथें नमस्कारिती मार्गी कोणा ॥६॥ तंव पुढें देखियेल्या खेळतां कुमारी । पुसती उच्चस्वरी तयांप्रती ॥७॥ निवृत्ति ज्ञानदेव वसताती कोठें । कोणीकडे मठ आहे त्यांचा ॥ ८ ॥ ऐकोनि कुमारी हेटसाउनी धिक्कारी । बोट नाकावरी ठेवूनियां ॥ ९ ॥ कोठील रे तुम्ही नेणा विनीतता । उद्धट बालतां महामूर्ख ॥ १० ॥ अर्भकाच्या परी नामें उच्चारूनी । पुसतां महामुनी सिद्धराया ॥ ११ ॥ दीर्घस्वरें करितां नामाचा उच्चार । नेणोनियां पार महिमा त्यांचा ॥ १२ ॥ गव्हारांच्या परी बोला सैरा शब्द । मूर्ख तुम्ही मुग्ध हीनबुद्धी ॥ १३ ॥ व्यापकासी स्थान अपारासी मान । मानितां अज्ञान मूढमती ॥ १४ ॥ ऐकावें स्वर्गीचे श्रीमंत गोसावी । नाटक लाववी ब्रह्मांडाचें ॥ १५ ॥ तया एकदेशी कल्पूनियां स्थान । पुसतां अज्ञान मठाचि त्यांचा ॥ १६ ॥ तिहीं लोकांवरी मिरवे ध्वज ज्यांचा । नेणा महिमा त्यांचा मतिहीन ॥ १७ ॥ अरे ब्रह्मादिकां पूज्य ईश्वर अवतार । आणि बोलतां उत्तर अमर्यादें ॥१८॥ मग संज्ञामात्रे नेत्रखुणेनें दाविती । पहा ते खेळती नित्यमुक्त ॥१९॥ ज्ञानप्रभा दिनमणी ते उगवले । ते प्रत्यक्ष देखिले देव तिन्ही ॥ २० ॥ सहजाचें आसन आंगी योगकळा । देखियेली लीळा आत्मनिष्ठ ॥ २१ ॥ मग देखतां लोटिले देह लोटांगणी । लागले चरणी अति नम्र ॥ २२ ॥ तंव ह्मणती ज्ञानदेव चांगयापासून । आले हे ब्राह्मण समाचारा ॥ २३ ॥ तें ऐकोनीयां द्विज ह्मणती अंतर्निष्ठ । जाणीतलें स्पष्ट अंतरीचें ॥ ॥२४॥ यावरी सिद्धाई असावी ते कैसी । सर्वांतरवासी देवचि हे ॥ २५ ॥ लागोनियां चरणीं दिधली पत्रिका ।आणि सांगितला निका समाचार ॥ २६ ॥ म्हणती चागदेवें प्रणिपात केला. ।आणि मस्तक ठेविला चरणांवरी ॥२७॥ पत्राचें उत्तर मागितलें स्वामी । भेटी अंतर्यामी इच्छिताती ॥ २८ ॥ म्हणती

निवृत्तिनाथ बाचा ज्ञानेश्वरा। तंव ते म्हणती कोरा अर्थ आहे ॥ २९ ॥ कोरें पत्र बरें निवृत्तिनाथ बोलती । पाकाची निष्पत्ती होय तेथें ॥ ३० ॥ कोरें तें सोंवळें खरकटें ओंवळें। धुतल्याही जळें शुद्ध नोहे ॥ ३१ ॥ कोरें तें निर्मळ स्वीकारिलें जाय । अमंगळ राहे खरकटें तें ॥ ३२ ॥ कोरीया अक्षर उमटे कसोटी । रद्दी जाय हाटीं विकावया ॥ ३३ ॥ एकाक्षर ब्रम्ह प्रणवाचे कुशीं । नुच्चारे परेशीं उच्चारितां ॥ ३४ ॥ पाविजे अक्षर गुरुकृपाखुणें । येराशीं उमाणें नुकलवे ॥ ३५ ॥ शिणती बहुतें करितां खटपट अर्थ उफराटा पडे तयां ॥ ३६ ॥ अक्षर परब्रम्ह वेदा अगोचर । कैचा अनुस्वार उमटला ॥ ३७ ॥ नचले जाणीव नचले शाहाणीव । तर्का नुरे ठाव अक्षर तें ॥ ३८ ॥ पत्र लिहा तुम्ही कृपेच्या सौरसें । आज्ञापिलें ऐसें निवृत्तिनाथें ॥ ३९ ॥ मग रेखियेली पत्रीं लिखीत पासष्टी । पाहतां अर्थ दृष्टीं तत्त्वीं पडे ॥ ४० ॥ परम गुह्या गुह्य उपनिषद्भाग । कृपेचा प्रसंग संपादिला ॥ ४१ ॥ जे वाचिलीया अर्थ आणितां मानसीं । पाविजे अनायासीं परमतत्वा ॥ ४२ ॥ न करितां यजन अध्ययन अध्यापन । न करितां साधन आत्मप्राप्ती ॥ ४३ ॥ तें देऊनियां पत्र म्हणती चांगदेवा। निरोप सांगावा विवराहे ॥ ४४ ॥ घेऊनियां पत्र निघाले ब्राम्हण । वंदिले चरण पुढतोपुढतीं ॥ ४५ ॥ आले तप्तीतीरा नमिलें सिद्धासी । वर्तमान त्यासी निरोपिलें ॥ ४६ ॥ म्हणती सिद्धराया पाहिला जी माहिमा । आंगीं निरूपमा सामर्थ्याचा ॥ ४७ ॥ अद्भुत ऐश्वर्य देखिलें लोचनीं । दिधलें लिहोनी पत्र तुम्हा ॥ ४८ ॥ देऊनियां पत्र म्हणती द्विजवर । देवाचे अवतार निःसंदेह ॥ ४९ ॥ मग करूनियां पूजा पत्र वाचियेलें । तंव गुह्य देखिलें न चले युक्ती ॥ ५० ॥ मग म्हणे अभिमान अद्यापि न जळे । तिमिरें गेले डोळे न दिसे हित ॥ ५१ ॥ कृत्रिम आचरणें दशा झाली ऐशी । विश्वास मानसीं थार नेदी ॥ ५२ ॥ ऐकतों श्रवणीं पहावें लोचनीं । निश्चय तो मनीं दृढ केला ॥ ५३ ॥ अनुतापें उद्देश धरिला चांगदेवें । जे अळंकापुरा जावें सिद्धा भेटी ॥ ५४ ॥ तरीच सार्थक धरिलिया जन्माचें. । नाहीं तरी काळाचें भातुकलें ॥ ५५ ॥ न चुकती जन्म चौऱ्यायसीं यातना । काळासी वंचना

कोठवरी ॥५६॥ मग पाचारिले सर्व पारिपत्य अधिकारी । सांगती तयारी करावी त्या ॥ ५७ ॥ वहने सामग्रीया सिद्ध करा वेगीं । जाणें भेटीलागीं सिद्धाचीये ॥ ५८ ॥ कोठवळे जामदार आले पोतनीस । सरंजाम त्यांस आज्ञापिला ॥ ५९ ॥ ऐकोनिया ते सर्व गृहस्थ शिष्यवर्ग । धांविले सवेग आले जवळी ॥ ६० ॥ म्हणती सिद्धराया परिसावी विनंती । जाणें तरी युक्ती ऐसें जावें ॥ ६१ ॥ प्रतापें महत्वें आपुल्या महिम्यानें । ऐश्वर्य भूषणें सिद्धाईच्या ॥ ६२ ॥ विद्येच्या सामर्थ्यें आपुलीया वैभवें । जाऊनि भेटावें बडिवारें ॥ ६३ ॥ आपणा देखोनि झांकेल त्यांचें तेज । येतील तेही सहज शरण पायां ॥६४॥ मग तैसाचि योजिला युक्तीचा प्रसंग विस्तारिलें सोंग बहुविध ॥ ६५ व्याघ्रासी स्तंभनें सर्पासी मोहनें । सिद्ध केलीं वहनें रथ वारू ॥ ६६ ॥ हाकारिला सर्व शिष्यसमुदाय । सांगितलें काय तयांप्रती ॥ ६७ ॥ बैसा व्याघ्रावरी सर्प धरा करीं । नानाआलंकारीं जाऊं चला ॥ ६८ ॥ जाती चांगदेव भेटी समुदायें । महा महोत्साहें अळंकापुरा ॥ ६९ ॥ तप्तीतीराहुनि गृहस्थ अपार । सर्व दळभार गजवारू ॥ ॥ ७० ॥ कश्यप स्वामीचा फळला आशीर्वाद । राजश्रिया पद भोगप्राप्ती ॥ ७१ ॥ चालियेले राजे गृहस्थ मंडळी । केली विप्रकुळीं परस्थानें ॥ ७२ ॥ म्हणती सिद्धा भेटी होईल परस्परें । पाहों अत्यादरें उत्साह तो ॥ ७३ ॥ परिवारें सांगाती घेतलीं स्त्रियाबाळें । व्यवसायी पाठ्याळ थोपटिली ॥ ७४ ॥ निघाला उदीम म्हणती सौदागर । भरियेले संभार कोणीयाचे ॥ ७५ ॥ हांशील जकाती नलगे चौकी देणें । लाभा नाहीं उणें पिकला कौल ॥ ७६ ॥ नटवे नृत्यांगना गुणिजनांचे भार । चालिले अपार समागमें ॥ ७७ ॥ ठाकूर नगारी गर्जती पवाडे । सर्व चालती देव्हडे सिद्धापुढें ॥ ७८ ॥ गजावरी वाद्यें निशाणें कुसरी । द्रव्यें भरिल्या हारी गाडीयांच्या ॥ ७९ ॥ नरमिन्याचीं दिंडें सर्वे शिकारखाना । राजभार सेना तैसा चाले ॥ ८० ॥ डेरेकनातांचे लांदियेले उंट । चालती संघाट काटीयाचे ॥ ८१ ॥ नौबदी नगारे वाद्यजात सकळ । घोषें त्या भूगोल दुमदुमिला ॥ ८२ ॥ लक्षावत यात्रा तप्तीतीराहूनी । चालतां

अवनी न पुरे मार्ग ॥ ८३ ॥ छत्रिने पताका मोरपिसा कुंचे । टाळमृदंगांचे समारंभें ॥ ८४ ॥ शृंगारिला भेख विद्येच्या कुसरी । सोंगें नानापरी दर्शनाचीं ॥ ८५ ॥ सवारले शिष्य गुरुआज्ञेवरी । नानावेषधारी बाह्यरंग ॥ ॥ ८६ ॥ चर्चियेली भस्में काषायांबरवासी । मृग व्याघ्र चर्मीसी संख्या नाहीं ॥ ८७ ॥ कुडूक कुंडलें मुद्रा शिरीं जटाभार । मुक्तकेशी दिगंबर नागवेची ॥ ८८ ॥ जागवटे सैल्या फुलमाळा शोभती । कथा विराजती नाना वर्ण ॥ ८९ ॥ झोळ्या बटवे कक्षेमाजीं जड्या बुट्या । आडबंद लंगोट्या बटुवस्त्रे ॥ ९० ॥ कुबड्या काठ्या छड्या वेणुदंड हातीं । टोप विराजती कफणीया ॥ ९१ ॥ कुंडलें सांगातें भांग घोटावया । चिलमी ओढाया गुडगुड्या ॥ ९२ ॥ पक्ष्यांचे पिंजरे सांगाते कुतरे । चितळे सामोरे सोकविलीं ॥ ९३ ॥ पांवे मोहऱ्या चंग किन्नरी झल्लरी । डफ हुडुक करीं नागसरे ॥ ९४ ॥ गोरख धंदे हातीं गोलाणें धनुष्यें । धांवती आवेशें [illegible]चिया ॥ ९५ ॥ कुशाळ कवी ते वाचाळ बोलते । बहुमतें झकविते तर्कवादी ॥ ९६ ॥ फळें जळाहारी येक दुग्ध पिती । मौनाचें व्रतस्थी पवनाभ्यासी ॥ ९७ ॥ व्याघ्राआरोहणें रथाची वहनें । सर्पाचीं वेष्टणें नानाविध ॥ ९८ ॥ योगमुद्रा अंगी दाविती कसोटी । नानालक्ष दृष्टी उफराटिया ॥ ९९ ॥ कलखापरी अंजनें घालूनि नयनीं । दाविती लोचनीं तिमिर तेज ॥ १०० ॥ भाविका नरनारी बाळा झकविती । हेंचि ब्रह्म म्हणती तेजाकार ॥ १ ॥ सत्याचा दुष्काळ असत्याची रूढी । दावितांती प्रौढी थोरपणा ॥ २ ॥ मार्गीचे जन लोक सामोरे धांवती । लोटांगणी येती चांगदेवा ॥ ३ ॥ नानावस्त्रें भेटी सिद्ध सामग्रिया । समर्पूनि पायां नमस्कारिती ॥ ४ ॥ याचेनि दर्शनें जडजीवा उद्धार । करिती जयजयकार नामघोषें ॥५॥ ऐसे आले पुण्यस्तंभा श्रीगोदे सन्निध । केला तीर्थविधी स्नान संध्या ॥ ६ ॥ द्विजसंतर्पणें वांटियेलीं दानें । मग पुढारी गमनें आरंभिलीं ॥ ॥ ७ ॥ आळेखिंडीवरूनि चालियेले भार । केले नमस्कार हैसीपुत्रा ॥ ८ ॥ केंदुरावरूनि उतरले घाट । गर्जती उद्भट सिद्धनामें ॥ ९ ॥ कान्होपाठक प्रीतीं चाळविले सर्वें । प्रार्थुनी चांगदेवें अत्यादरें ॥ १० ॥ ऐसे आले भीमातीरीं

तेथें स्थिरावले । पुढें पाठविलें सांगोनियां ॥ ११ ॥ यावरी ह्मणे निळा होईल सिद्धभेटी । परस्पर ते गोमटी आहे कथा ॥ १२ ॥ बहुत अपूर्व असमाई चरित्र । परिसोत सर्वत्र श्रोतेजन ॥ १३ ॥ इति श्रीचांगदेवचारित्रे सिद्धदर्शननंनाम चतुर्थप्रकरणं संपुर्ण ॥

प्र. ५ चालीले ब्राम्हण वार्ता सांगावया । शीघ्र बैसोनियां व्याघ्रावरी ॥ १ ॥ तव ते तिन्ही देव बाळमूर्ती धारी । मुक्ताई खेचरी आदिमाया ॥ २ ॥ बाळक्रीडालीळे होती भिंतीवरी । बैसलीं सूर्यकरी उष्ण घेत ॥ ३ ॥ तव ते पातले वार्तिक द्विजवर । करिती नमस्कार विनीतता ॥ ४ ॥ सिद्ध आले भेटी चांगदेव समर्थ । सांगती वृत्तांत साष्टांगेसी ॥ ५ ॥ ऐकोनि चांगदेव आले भेटावया । उल्हासल्या बाह्या आलिंगना ॥६॥ जावें सामोरें निवृत्तिनाथ बोलती । तव ज्ञानदेवा चित्तीं विस्मय वाटे ॥७॥ सर्वांतरवासी स्वामी सर्वगत । नभीं नभ सतत जयापरी ॥८॥ सन्मुख विन्मुख सूर्यकोणाकडे । आज्ञेच बागडे नाचवीत ॥ ९ ॥ जेथें जावें तेथें भरूनि ऊरलेती । सर्वांतरी वस्ती तुमची स्वामी ॥१०॥ मग हंसूनि तयासी म्हणती निवृत्तीनाथ । वदलासी यथार्थ सिद्धांत तूं ॥ ११ ॥ परी येथें सगुणें सगुणा भेटावें । निर्गुणी तो अवघे शून्याकार ॥ १२ ॥ द्वैतयोगें घडे निजसुखाची वृद्धी । अभेदी तो सिद्धी आपेंआप ॥ १३ ॥ आणखी एक गुज ऐके ज्ञान सिंधू । इंद्राचा हा बंधू मरुद्गण ॥ १४ ॥ पुत्र कश्यपाचा उदरीं दितीचा । जन्म झाला याचा पूर्व जन्मीं ॥ १५ ॥ मातेने याचिये मागीतला वर । व्हावा राज्यधर पुत्र माझा ॥ १६ ॥ तोंची भोगावया आला हा वैभव । परमार्थिक सर्व लेउनी लेणी ॥ १७ ॥ इंद्रादिका पूज्य व्हावी ऐसी बुद्धी । विद्यायोग रिद्धी वरेंतु हा ॥१८॥ स्वर्गवासी आला वरदें मृत्यु लोका । विद्याचा आवांका सर्व आंगीं ॥ १९ ॥ चतुर्दशविद्या कळा ही चौसष्टि । मंत्र सप्तकोटि विधी जाणे ॥ २० ॥ स्थान मान कळा जाणे योगसिद्धी । आष्टादशौषधी रसायनें ॥ २२ ॥ जडया बुटया जाणे रोगाच्या परीक्षा । पंचाक्षरी शिक्षा करीत भूतां ॥ २३ ॥ मणीमंत्र सिद्धी तोटके वेधका । साधका बाधका विद्या जाणे ॥ २४ ॥ चतुर हरिभक्त चौदाशें वर्षीचा ।

बहुविधा सिद्धाच्या सिद्धजगीं ॥ २५ ॥ आर्तभूत आले भेटी लवलाहो। उचित हें आहे सामोरे या ॥ २६ ॥ म्हणती ज्ञानदेव चलावेंजि प्राज्ञा। भिंतीशीं केली आज्ञा चला म्हणे ॥ २७ ॥ निर्जिव चाले भिंती देखे विश्वजन। धांवती ब्राह्मण पुढें सांगों ॥ २८ ॥ तो येती चांगदेव वाघाच्या गजरीं। आरूढोनीं व्याघ्रावरी चवरडोली ॥ २९ ॥ तव सांगती वार्तिक महासिद्ध आले। भिंती वोळंघले चालवीती ॥ ३० ॥ ऐकूनि चांगया गलितपत्र जाला। लोटांगणीं आला गडबडां ॥ ३१ ॥ घाली दंडवत उभा ठाके पाहे। भिंती चालताहे गजगती ॥ ३२ ॥ तेजसूर्यापरी चौघे भिंतीवरी। देखोनियां करी नमस्कार ॥ ३३ ॥ ऐसे शतवरी संख्या नमस्कार जाले। तव ते पातले जवळीके ॥ ३४ ॥ विर्नात चांगया देखीयेली स्थिती। उतरले क्षिती भेटावया ॥ ३५ ॥ जाली भेटी तोची विश्रांतीचा वट। छाया घनदाट बैसावया ॥ ३६ ॥ प्रीतीच्या पडीभरें पडीले आलिंगन। परम समाधान उभयता ॥ ३७ ॥ आलिंगनमीसें हृद्गत आपुलें। सुख निक्षेपिलें हृदयीं त्याचे ॥ ३८ ॥ चांगदेवो कृपादृष्टी अवलोकिलें। अमृताचें झालें मार्जन त्या ॥ ३९ ॥ नेणो काय केलें हृदयीं क्षेम देता। विश्वीं एकात्मता ठसावली ॥ ४० ॥ तुटलें बिरडें पुढें जन्मावळी। मागें झाली होळी संचिताची ॥ ४१ ॥ सकळ जनयात्रा दंडाचियेपरी। जैसी महीवरी पाडिलीं वस्त्रें ॥ ४२ ॥ देखोनियां भाव देव कृपामूर्ती। आलिंगन देती लहान थोरां ॥ ४३ ॥ देवासी सारिखी जे आले शरणागते। दुबळीं समर्थे उंचनिंचे ॥ ४४ अनन्याचा भाव जाणती हृद्गत। करिती त्या सनाथ दर्शनमात्रें ॥ ४५ ॥ सकळ विश्वजन यात्रासमुदाय। आलिंगिले बाह्या पसरूनियां ॥ ४६ ॥ आनंद पिकला सिद्धाचिये भेटी। आमृताचि वृष्टी अनिवार ॥ ४७ ॥ विश्रांतिसी सुख आलें जया ठाया। रुळविती त्या पायावरी निडळें ॥ ४८ ॥ गर्जती आनंदें नामाच्या गजरीं। घोष तो अंबरीं न समाये ॥ ४९ ॥ नाचती नाचणी संगीत कुसरी। राग सप्तस्वरीं आळविती ॥ ५० ॥ वाजावितीं वाद्यें करिती सोहळा। समर्पिती कळा अभ्यासिल्या ॥ ५१ ॥ सिद्धाच्याचरित्रें गर्जती पवाडे। नाचती सुरवाड

आनंदाच्या ॥ ५२ ॥ ऐसे आले आळंकापुरीं इंद्रायणीतीरा । ब्रह्मानंद नरानारी लोका ॥ ५३ ॥ म्हणती चांगदेव महालाभ झाला । हा सद्गुरु भेटला कृपामूर्ती ॥ ५४ ॥ विधीयुक्त पूजा षोडशोपचारीं । समर्पिलीं शिरीं पुष्पांजुळी ॥ ५५ ॥ पतित पतित तारावें पतिता । चांगा विनीतता शरण आला ॥ ५६ ॥ वरद हस्त आतां मस्तकीं ठेवावा । चांगा म्हणवावा शिष्यवर्ग ॥ ५७ ॥ मग श्रीनिवृत्तिनाथें कृपेच्या सागरें । आणि ज्ञानेश्वरें सोपानदेवें ॥ ५८ ॥ निरविला चांगा मुक्ताबाई प्रती । यासी करा प्रतीत आत्मज्ञानीं ॥ ५९ ॥ चांगदेवें चरणीं न्यासीला मस्तक । मुक्ताबाई हस्त ठेवी माथा ॥ ६० ॥ नकळे ब्रम्हादिकां सद्गुरूचि हतवटी । केला उठाउठी निजबोध ॥ ६१ ॥ स्वरूपीं अढळ ठेली चित्तवृत्ती । इंद्रिया विश्रांति तेणें सुखें ॥ ६२ ॥ न लाविची मुद्रा कष्ट नाहीं अंगीं। केला राजयोगी जिवन्मुक्त ॥ ६३ ॥ लेववीला सर्वांगीं पासष्टीचा अर्थ । होऊनि कृतार्थ ठेला पायीं ॥ ६४ ॥ चांगदेव म्हणे आजीचि जन्मलों । गुरूपुत्र झालों मुक्ताईचा ॥ ६५ ॥ मागील चौदाशें झालीं जन्मांतरें आजी जन्म खरें सार्थकाचा ॥ ६६ ॥ मीची मज भासे विश्वातें वसविता हें सद्गुरू वचनें आतां प्रतिती आलें ॥ ६७ ॥ धन्य हा सद्गुरू निवृत्ति ज्ञानेश्वरु । सोपान मुनेश्वरु मुक्ताबाई ॥ ६८ ॥ दर्शनेंचि यांच्या स्वरुप साक्षात्कारू । चांगावटेश्वरू सुखी केला ॥ ६९ ॥ मग केशवदास चांगा म्हणती ज्ञानेश्वर । तुज असो बडिवार नामाचा या ॥ ७० ॥ हा ऐकोनि उत्साह सकळ प्रांतवासी । आले दर्शनासी परीवारें ॥ ७१ ॥ म्हणती सिद्ध भेटी आले चांगदेव । अगणित वैभव घेऊनियां ॥ ७२ ॥ सकळ वर्ण आले पाहाया चरित्र । पंचक्रोशि क्षेत्र न पुरे ठावो ॥ ७३ ॥ व्यवसायी जन आले घेऊनी सौदे माल । होईल उकल ह्मणती येथें ॥ ७४ साधिले बाजार मांडिलें दुकान । पाहिजेतो वाण सिद्ध आहे ॥ ७५ ॥ ह्मणती चांगदेव करावें पूजन । द्यावें निमंत्रण सर्वयात्रे ॥ ७६ ॥ त्रिलक्षभोजनाची अइत सारिली । पूजा आरंभिली सद्गुरूची ॥ ७७ ॥ उभय तिरीं दीले मंडप अपार । शोभे गंगातीर इंद्रायणी ॥ ७८ ॥ सकळ यात्रा

आणि जन क्षेत्रवासी । यावें भोजनासी प्रार्थियेलें ॥ ७९ ॥ नरनारी बाळें अवघी लहानथोरें । प्रार्थिलीं आदरें प्रसादासी ॥ ८० ॥ भगवतद्भुतीं द्यावें सर्व भुतीं अन्न । हेंचि मुख्य पूजन सद्गुरूचें ॥ ८१ ॥ आरंभिले पाक अन्नें नानापरी । शाखा कोशिंबिरी चिरीयेल्या ॥ ८२ ॥ शर्करा मिश्रीत सघृत पक्वान्नें । षड्रस दिव्यान्नें सिद्ध केलीं ॥ ८३ ॥ मग षोडशोपचारें पूजेस आरंभ । वेदघोषें नभ गर्जिन्नलें ॥ ८४ ॥ सिदोपंत गिरिजाबाईचें पूजन । करूनी स्तवन बहूत केलें ॥ ८५ ॥ तुमचिये कुळीं हे विश्वाचे तारक । उपजले बाळक माहासिद्ध ॥ ८६ ॥ समर्पिली पूजा वस्त्रें अळंकार । संपदा अपार वोपियेली ॥ ८७ ॥ सिद्धाचें पूजन आरंभिलें वोजा । मेळउनियां द्विजा व्युत्पन्नासी ॥ ८८ ॥ निवृति ज्ञानेश्वर सोपान मुक्ताबाई । पूजेची नवाई विश्व देखे ॥ ८९ ॥ रत्नजडित चौक्या बैसविले वरी । अर्घ्यपाद्यादि उपचारी पंचामृतें ॥९०॥ शतसहस्त्र विप्र भोवताले फेरी । अभिषेक पात्रें करीं धरिलीं द्विजीं ॥ ९१ ॥ महारुद्र अतिरुद्र आरंभ उपन्यास । अंबर मंत्रघोषें दुमदुमीत ॥ ९२ ॥ मंगळ उतुरे नाना वाद्यांचा गजर । घोषें जयजयकार करिती सर्व ॥ ९३ ॥ अक्षवणें नारी पतिव्रता करिती । आणि श्रीमुख अवलोकिती चरण दृष्टीं ॥ ९४ ॥ नानापरीमळ द्रव्यें गंधाक्षता माळा । जडित पदकें गळां समर्पिलीं ॥ ९५ ॥ सुवर्ण तंतु वस्त्रें मुकुटादि अलंकार । लेववीले परीकर चांगदेवें ॥ ९६ ॥ मुद्रिका भूषणें जाडिताचीं कुंडलें । कटीं सूत्र सुदले वाळे वाकीं ॥ ९७ ॥ नाना सुमने हार घालुनियां कंठीं । अवलोकुनी दृष्टी भरूनियां ॥ ९८ ॥ विसन्न चांगया जाणें विधीमार्ग । पुजा केला सांग उपचारेशीं ॥ ९९ ॥ पुजेचे आसनीं विराजल्या मूर्ती । झाली धुपारती आरतीया ॥ १०० ॥ सुवर्ण दक्षिणा गोदाना दीधली । पूजा सांग केली सद्गुरूची ॥ १ ॥ पहाती लोचनीं नरनारी झाळें । आणि नाचती कल्लोळें प्रेमाचिया ॥ २ ॥ जवादी कस्तुरी बुक्याचे धूसर । उधळती अपार देवावरी ॥ ३ ॥ नैवेद्य पुष्पांजुली केल्या प्रदक्षिणा । सकळा ब्राह्मणां पूजीयेले ॥ ४ ॥ हरिभक्त वैष्णव

पूजिले आदरें। वाद्यें मंगळ तुरे घोष ध्वनी ॥ ५ ॥ व्यवसायी जन यात्रा पुजीले क्षेत्रवासी । दिधलीं सवा णीसीं हळदी कुंकें ॥६॥ चांगदेवें मग आरंभिलें ध्यान । मूर्ती अवलोकून सद्गुरूची ॥ ७ ॥ आरक्त पदतळीं पाऊलें सकुमार । पोटऱ्या सुंदर जानु जंघा ॥ ८ ॥ उदर त्रिवळी प्रशस्त वक्षस्थळा । शोभली निर्मळ उटी आंगीं ॥ ९ ॥ सरळ भुजादंड तुळशी पत्रें माळा । नानापुष्पें गळां डोल देती ॥ १० ॥ हनुवटी चुबुका दंत हिरीया जाती । दुबाही पंगति विराजली ॥ ११ ॥ नासिक सरळ उन्मलीत नेत्रकमळ । शोभल्या कपाळीं गंधाक्षता ॥ १२ ॥ जावळ कुरळमंडीत मस्तक पूजा ब्रह्मादिक समर्पिती १ ३ मुक्ताई मुक्तरूप मुक्तीची चित्कळा । नित्य मुक्तलीळा दावी अंगीं ॥ १४ ॥ आर्घ्यपाद्यादिक वेदाच्या सुस्वरी । चांगदेव करी ध्यान पूजा ॥ १५ ॥ धन्य तो दिवस नैवेद्य अर्पिला । पुष्पांजुली केला प्रणीपात ॥ १६ ॥ पुजीले ब्राह्मण विधी उपचारें । हरिभक्त आदरें येथोचिता ॥ १७ ॥ बैसविल्या पंगती इंद्रायणीतीरीं । पात्रीं नानापरी विस्तारिल्या ॥ १८ ॥ दिव्यान्नें परवडी अन्नशुद्धी वाढिली । मंत्रें प्रोक्षीयेलीं त्रिपदेच्या ॥ १९ ॥ सोडिला संकल्प झालों निर्विकल्प । निराशिलें पाप संदेहाचें ॥ २० ॥ तदर्पण केलें ज्ञानेश्वर नामें । भोजनें संभ्रमें सारीयेलीं ॥ २१ ॥ एक एक शीत द्विजमुखीं अर्पितां । शतक्रतू भोक्ता नारायण ॥ २२ ॥ ऐसा ये क्षेत्रीचा अद्भूत महिमा । वर्णी निरुपमा चांगदेव ॥ २३ ॥ मग समर्पिले विडे दक्षिणा उपचारी । चांगदेव करी नमस्कार ॥ २४ ॥ मंत्राक्षता द्विजीं आर्पीयेल्या शिरीं । राहो कल्पवरी क्षेत्र महिमा ॥ २५ ॥ मग बैसवोनि पंगती परिवार आपुला । शेष प्रसाद घेतला चांगदेवें ॥ २६ ॥ अद्भूत सोहळा हरीचीं कीर्तनें । वाटियेलीं धनें याचकांसीं ॥ २७ ॥ सकळांशीं तृप्ती याचेनि दर्शनें । करीतीं स्तवनें नारीनर ॥ २८ ॥ प्रत्यक्ष पंढरी ते हे अळंकापूर । मुक्तीचें माहेर उपासका ॥ २९ ॥ निर्विकार जन सकळ क्षेत्रवासी । पूजितां सिद्धांसि नित्यकाळ ॥ ३० ॥ धन्य पंचक्रोशी धन्य क्षेत्रवासी । धन्य जे यात्रेसीं येती लोक ॥ ३१ ॥ ऐसा चांगदेवें स्तुतिवाद केला । आणि मस्तक ठेविला चरणावरी ॥ ३२ ॥ याचि जन्में बहुत जन्मा

निवारीलें । वंदितां पाउलें सद्गुरूचीं ॥ ३३ ॥ बहुतेक विद्यांचे बहु गुरु आहेती । परीते तुळणें न येती सद्गुरूचे ॥ ३४ ॥ ज्याचीया प्रसादें पावलों हा बोधु । समूळ मायाकंदू तोडीयेला ॥ ३५ ॥ निजानंद पदीं स्थापिलों सतत । केला जिवन्मुक्त क्षणामाजी ॥ ३६ ॥ काय उतराई होऊं कवण्या अर्थें । अर्पितां नाशिवंतें जीवादिकें ॥ ३७ ॥ कायावाचामनें करूनि कुर्वंडी । धरी ते न सोडी चरण याचे ॥ ३८ ॥ येणें काळे मर्व लाभाचिया कोटी । लाधलों या भेटी सिद्धाचिया ॥ ३९ ॥ सकळ विद्या सहित करूनी वोवाळणी । सांडीन वरूनि जीवप्राण ॥ ४० ॥ म्हणतां चांगदेव कृतकृत्य झालों । चरणीं राहिलों मुक्ताईचे ॥ ४१ ॥ या संतचरित्र ओंव्या मुक्ताफळें माळा । मिरवी जो गळा आवडीनें ॥ ४२ ॥ पढे वाचे गाये आणीका परिसवी । लाभे तो पदवी हरिभक्तीची ॥ ४३ ॥ संतांचें चरित्र आवडी जो गाये । पदीयेंता तो हो ये विठोबासी ॥ ४४ ॥ आवडे श्रीहरी संत अचरिता । म्हणउनी निष्ठत हरीकथे ॥ ४५ ॥ नारद प्रल्हाद पुंडीलिक नामा । प्रिय पुरुषोत्तमा जीवाहुनी ॥ ४६ ॥ गोरा परीसा आतां नरहरी सावता । कुर्मा आवडता पांडुरंगा ॥ ४७ ॥ निवृत्ती ज्ञानेश्वर सोपान मुक्ताइ । चांगा मिराबाई भानुदास ॥ ४८ ॥ विसोबाखेचर जाल्हान कबीर । रोहिदास वछरा चोखामेळा ॥ ४९ ॥ जनार्दन एका विष्णुदास तुका । वैकुंठनायका आवडते ॥ ५० ॥ संतोबा पवार हरीभक्त अपार । हे परम प्रीतीकर विटोबाचे ॥ ५१ ॥ या सकळांचीं चरित्रें श्रवणें पठणें । मुक्त वाचाऋणें झाला निळा ॥ ५२ ॥ नव्हे वाचस्पती मूढ वाचक मती । परि उदयोकर्ता स्फूर्ति ज्ञानेश्वर ॥ ५३ ॥ तिहींच हा ग्रंथ पावविला सिद्धी । प्रवर्तवुनि बुद्धी स्फूर्ती दीली ॥ ५४ ॥ श्रोता वक्ता तूचि आवडीच्या भारें । ग्रंथ अत्यादरें लीहवीला ॥ ५५ ॥ नेणता प्रमेय कथेच्या अन्वया । नेणों केलें काय सामर्थ्यगुणें ॥ ५६ ॥ निळ्यालागीं शेष प्रसाद वोपिला । सद्गुरु वोळला तुकयास्वामी ॥ ५७ ॥ सत्य सत्य सत्य त्रिवाचा हें सत्य । वदवितां यथार्थ तुकया सिद्ध ॥ ५८ ॥ उदंड राहिलें कथीं कथितां कथनीं । वाढेल म्हणउनी ग्रंथ थोर ॥ ५९ ॥ देवा-

चिया चित्ता आलें तेंची पुरे । राहिल्या विस्तारें काय काज ॥ ६० ॥ पुढतो पुढतीं संता हेंचि विनवणी । बैसावें श्रवणीं करूनी कृपा ॥ ६१ ॥ ऐकूनि हें संत तोषले सकळ । म्हणती तूं प्रेमळ कळों आलें॥ ६२ ॥ हरि प्रियाची कथा सप्रेमें वदलासी । झाला हा आम्हासी पाहुणेरु ॥ ६३ ॥ प्रासादिक वाणी आम्हांरे रुचली । अष्टांगें निवाली श्रवणमात्रें ॥ ६४ ॥ निळा म्हणे सुखें आनंदें निवाला । चरणासि लागला धांवोनियां ६५ ॥ इति श्री चांगदेव चरित्र पंचम प्रकरण समाप्त ॥

चांगदेव चरित्र समाप्त.

---

## पंढरीमाहात्म्य व पांडुरंगांचें वर्णन.

१ हा गे पहा विटे उभा । सच्चिदानंदाचा हा गाभा ॥ १ ॥ देखे सकळांचेंही भाव । अध्यक्ष हें याचें नांव ॥ २ ॥ जेथें तेथें जैसा तैसा । नव्हे न्यून पूर्ण ऐसा ॥३ ॥ निळा म्हणे माझ्या जिवीं । ठेला जडोनी तो गोसावी ॥ ४ ॥

२. सांगतां महिमा पंढरीचा । अपार वाचा वेदांचिये ॥ १ ॥ सहजचि क्षेत्रा जाईन म्हणतां । धांवे सायुज्यता सामोरी ॥ २ ॥ विठ्ठलराज देखतां दिठी । वास वैकुंठीं तेचि क्षणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे आलिंगन । देतां समाधान जिवशिवा ॥ ४ ॥

३. भेटावया भक्तजनां । उभाचि राणा पंढरीचा ॥ १ ॥ अवलोकितो दिशा चारी । येती वारकरी ज्या पंथें ॥ २ ॥ आलियाचा राखे मान । करी समाधान यथाविधी ॥ ३ ॥ निळा म्हणे दोषा खंड । चुकवी दंड यमाचा ॥ ४ ॥

४. पुंडलीक पांडुरंग । संतसंग पद्माळें ॥ १ ॥ चंद्रभागा वाळवंट । भूवैकुंठ पंढरी ॥ २ ॥ वेणुनाद गोपाळपुर । पुष्पावती सार संगम ॥ ३ ॥ निळा म्हणे झाला मेळा । या भूगोळा उद्धरा ॥ ४ ॥

५. सर्वस्वें उदार । देतां न म्हणे सान थोर ॥ १ ॥ तें हें पंढरीये धेंडें । उभें पुंडलिकापुढें ॥ २ ॥ अरिमित्रांसम । देणें एक निजधाम ॥ ३ ॥ निळा म्हणे नाहीं । जया आपपर कांहीं ॥ ४ ॥

६. ऐक्यरूपें हरिहर । उभा कटीकर विटेवरी ॥ १ ॥ तो म्यां देखियला दिठी । भूवैकुंठीं पंढरिये ॥ २ ॥ तुळसीमाळ वैजयंती । वेढिला संतीं मुनिवरीं ॥ ३ ॥ निळा म्हणे विश्रांती मना । झालें लोचनां पारणें ॥ ४ ॥

---

## पंढरी माहात्म्य.

७. आला स्वइच्छा पंढरपुरा । सांडुनियां क्षीरसागरा ॥ १ ॥ पुढें देखोनियां इटे । चरण ठेविले गोमटे ॥ २ ॥ दोन्ही हात कटावरी । ठेवुनि परमात्मा श्रीहरी ॥ ३ ॥ निळा म्हणे जगदोद्धार । करीत उभा निरंतर ॥ ४ ॥

८. सुकृताचा होता सांठा । भूवैकुंठा ते आले ॥ १ ॥ सन्मुख देव भेटे तया । लागती पायां भाग्याचे ॥ २ ॥ न्याहाळिती दृष्टि मुख । कैवल्यसुख तुच्छ पुढें ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मानंदा । झाले तत्पदा अधिकारी ॥ ४ ॥

९. सहज गेलों पंढरपुरा । विश्वंभरा भेटीसी ॥ १ ॥ तो हा उभा विटेवरीं । देखिला श्रीहरी जगदात्मा ॥ २ ॥ ज्याचिये तेजें धवळलें नभ । हा जगदारंभ अंगकांति ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मादिकां । व्यापक लोकां सकळां जो ॥ ४ ॥

१०. संत येताती सनकादिक । सोहळा पाहों तो कौतुक ॥ १ ॥ चंद्रभागे निमज्जन । परिसों हरीचें कीर्तन ॥ २ ॥ संतसज्जनाचिया भेटी । करूं स्वानंदाची लुटी ॥ ३ ॥ निळा म्हणे पंढरपुरीं । सेवूं काला वांटिती हरि ॥ ४ ॥

११. वेगुनादीं लाभे काला । उणें त्याला मग काये ॥ १ ॥ ब्रह्मानंदें कोंदे सृष्टी । शीतचि ओंठीं लागतां ॥ २ ॥ देतां पदीं पिंडदाना । पितृगणा उद्धार ॥ ३ ॥ निळा म्हणे देवचि ऋणी । एक स्नानीं पन्नाळा ॥ ४ ॥

१२. राहिला उभा विटेवरी । भक्तकैवारी म्हणउनी ॥ १ ॥ जे जे येती ज्या ज्या भावें । तें त्या द्यावें न बोलतां ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति वांटी एका । लाविल्या फुका रिद्धीसिद्धी ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वाधिकारी । प्रेमभांडारी भक्त केले ॥ ४ ॥

१३. राही रुक्मिणी सत्यभामा । पुरुषोत्तमा वामसव्य॥ १ ॥ पुंडलिक दृष्टीपुढें । उभे देहुडे सनकादिक ॥ २ ॥ जय विजय महाद्वारीं । गरुड शेजारीं हनुमंत ॥ ३ ॥ निळा म्हणे भोंवते संत । कीर्तनें करीत चौफेरीं ॥ ४ ॥

१४. पंढरीहुनी गांवा जाता । वाटे खंती पंढरीनाथा ॥ १ ॥ आंतां बोळवीत यावें । आमुच्या गांवां आम्हांसवें ॥ २ ॥ तुम्हांलागीं प्राण फुटे । वियोगदुःखें पूर लोटे ॥ ३ ॥ निळा म्हणे पंढरीनाथा । चला गांवां आमच्या आतां ॥ ४ ॥

१५. याचि लागीं हरी । उभा चंद्रभागेतीरीं ॥ १ ॥ भक्तांचिये हाकेसवें । उडी घालोनियां पावे ॥ २ ॥ नेदी पडों दिठी । काळाची त्या घाली पोटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे नामावरी । सर्वस्वें हा उदार हरि ॥ ४ ॥

१६. वरी बुकियाचे धूसर । अत्तर कस्तुरी केशर ॥ १ ॥ तुळसी नाना सुमनमाळा । दिव्यांबराचा सोहळा ॥ २ ॥ पांडुरंगा ओंवाळिती । नारीनर अवलोकिती ॥ ३ ॥ निळा म्हणे दिपावळी । सोडिती चंद्रभागा जळीं ॥ ४ ॥

१७. विटेवरी कैवल्यगाभा । राहिला उभा पंढरिये ॥ १ ॥ आलियासीं देतो धणी । सर्वां गुणीं संपन्न हा ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति देतो रिद्धी । स्थापितो पदीं अधिकारिया ॥ ३ ॥ निळा म्हणे पुरवी कोड । उरोंचि साकड नेदी हा ॥ ४ ॥

१८. वारकरी संत पंढरीसी जाती । सप्रेमें गर्जती नामघोषें ॥ १ ॥ लोटांगणीं त्यांसी जाईन आवडीं । ओंवाळीन कुडी वरुनी पायां ॥ २ ॥ धन्य केला वंश तारिले पातकी । डोलतां पताकी गगन शोभे ॥ ३ ॥ टाळ श्रुति वाद्यें मृदंगाच्या ध्वनी । कमिताती अवनी ब्रह्मानंदें ॥ ४ ॥ पढती ब्रीदावळी करिती जयजयकार । टाळीया अंबर सादु देत ॥ ५ ॥ निळा म्हणे माझे सखे विष्णुदास । जाती पंढरीस प्रतिवरुषीं ॥ ६ ॥

१९. भुक्तिमुक्तींचें माहेर । वसविलें पंढरपुर ॥ १ ॥ सुख विश्रांतीसी आलें । संतां पाचारिलें सज्जना ॥ २ ॥ कथा कीर्तनें सोहळा । छबिने मेळा पताकांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे पंचक्रोशी । नामें घोषीं दुमदुमित ॥ ४ ॥

२०. नाना लोक धांवोनि येतां । राशी भरिती आइत्या ॥ १ ॥ नेऊनि जातां विश्वजना । नव्हेचि उणा माल फार ॥ २ ॥ युगें गेलीं व हातीं लोक । न सरेचि पीक वोसंडलें ॥ ३ ॥ निळा म्हणे पुंडलिकें केली लोकें सभाग्य ॥ ४ ॥

२१. नारद येऊनि पंढरियेसी । स्थळ पुंडलिकासी मागती ॥ १ ॥ भीमापुष्पावती संगम । योजिला आश्रम तयाप्रती ॥ २ ॥ विष्णुपदें उमटलीं जेथें । कराविला तेथें रहिवास ॥ ३ ॥ निळा म्हणे पिंडदान । करिती सज्जन जे स्थळीं ॥ ४ ॥

२२. ऐसा उदार देवादेवो । पंढरिरावो सुखसिंधु ॥ १ ॥ ज्याचें देणें न सरे कधीं । कल्पावधीं पर्यंत ॥ २ ॥ देवां दैत्यां शेषादिकां । सप्तहिलोकां मानवासी ॥ ३ ॥ निळा म्हणे ठायाठावो । जाणें भावो अंतरिचा ॥ ४ ॥

२३. नामस्मरणेंचि श्रीहरी । दासां दुरिता दूरी करी ॥ १ ॥ तो हा पंढरिये ठाके । गुंतोनियां भक्ताभाके ॥ २ ॥ हरिभक्तां या उद्धरी । तत्संगे आणिकांतें तारी ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशी कीर्ती । सनकादिक संत गाती ॥ ४ ॥

२४. नामरूप नातळे ज्यासी । परात्पर ऐशी वदंती ॥ १ ॥ तो

हा आला पंढरपुरा । समाचारा भक्तांच्या ॥ २ ॥ ओळखिला पुंडलिकें । केलें निकें पूजन ॥ ३ ॥ निळा म्हणे विटेवरी । स्थापिला तीरीं चंद्रभागे ॥ ४ ॥

२५. पंढरिये केला वास । निज भक्तांस तारावया ॥ १ ॥ म्हणे यारे अवघे वर्ण । आदि ब्राह्मण करूनियां ॥ २ ॥ जया वैकुंठासी जाणें । तया पेणें हें पंढरी ॥ ३ ॥ निळा म्हणे सुकाळ केला । भक्तां वोळला कुवासा ॥ ४ ॥

२६ पुंडलिकें पिकविलें । विश्वा पुरलें न्यावया ॥ १ ॥ त्रैलोक्यमाणि लागला हातीं । लोक ते किती नेतील ॥ २ ॥ विश्वनिर्मिता ज्याचे द्वारीं । निरंतरीं तिष्ठत ॥ ३ ॥ निळा म्हणे भाग्य त्याचें । अपार वाचें न वर्णवे ॥ ४ ॥

२७ पुंडलीक म्हणे देवा । आतां करावा वास येथें ॥ १ ॥ असों एक जीवें प्राणें । मीतूंपणें वोसंडुनी ॥ २ ॥ बहुत बरें ह्मणती देव । ठेविले पाव विटेवरी ॥ ३ ॥ निळा म्हणे नव्हे तुटी । युगापाठीं युग जातां॥ ४ ॥

२८ यमुनेच्या जो विहारीं । तोचि हा उभा पंढरपुरीं ॥ १ ॥ दह्या दुधाचा सुकाळ । कार्तिकाये पर्वकाळ ॥ २ ॥ नवनीताचे गोळे । क्षीरामृताचे कल्लोळे ॥ ३ ॥ निळा म्हणे अळंकार । वस्त्रें मिरवी रमावर ॥४॥

२९ आतां पाहेन वाडेंकोडें । याचें रूपडें दृष्टीभरी ॥ १ ॥ आहे उभा इटेवरी । न वजे पंढरि सांडूनियां ॥ २ ॥ येती त्यांसी आलिंगन । पाववी देऊन संतोषा ॥ ३ ॥ निळा म्हणे दासाप्रती । वांटितो मुक्ति दर्शनें ॥ ४ ॥

३० राहेन आतां तुमच्या संगें । हेंचि मागें भक्तांसीं ॥ १ ॥ हेंचि द्या आतां उदारपणें । माझें करणें रूप नांव ॥ २ ॥ विश्रांतीचें माझें घर । तुह्मीं जें शरीर धरिलें तें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तापाशीं । भाकी ऐशी कींव देव ॥ ४ ॥

३१. आत्मा सकळांचा श्रीहरी । तो हा उभा पंढरपुरीं ॥ १ ॥ म्हणोनियां देव येती । दर्शना ऋषींच्या पंगती ॥ २ ॥ प्रतिवर्षी उपासक । येती यात्रे सनकादिक ॥ ३ ॥ निळा म्हणे त्रैलोक्यदाता । विठो लक्ष्मीचा भर्ता ॥ ४ ॥

३२. उमटलीं खडकावरी । पदें गोजिरीं विष्णूचीं ॥ १ ॥ देखोनियां ते सात्विक जन । करिती पिंडदान तये पदीं ॥ २ ॥ पंढरिये नारदाश्रमीं । भीमासंगमीं पुष्पावती ॥ ३ ॥ निळा म्हणे दक्षिण गया । उद्धरावया पूर्वजां ॥ ४ ॥

३३. उमटलीं विष्णुपदें । गयावर्जनीं जे प्रसिद्धें ॥ १ ॥ नारद क्षेत्री पंढरपुरीं । अद्भुत पदांची त्या थोरी ॥ २ ॥ ऋणत्रया मुक्त जन । देतां पदीं पिंडदान ॥ ३ ॥ निळा म्हणे गोपाळपुरीं । विठ्ठल वेणू वादन करी ॥ ४ ॥

३४. एकंदर देवें आज्ञा केली । पुंडलीका दिधली निजभाक ॥ १ ॥ जे जे तुझिया क्षेत्रासी येती । त्यां त्यां उत्तम गति पाठवीं ॥ २ ॥ उत्तम अधम न म्हणे कांही । रिगमचि नाहीं दोषा येथें ॥ ३ ॥ निळा म्हणे हे पंचक्रोशी । जाणा वाराणसी समान ॥ ४ ॥

३५ ऐसा दोहीं स्थळींचा महिमा । अगाध उपमा नाहीं त्या ॥ १ ॥ पंचक्रोशीमाजी भार । छबिनें अपार मिरवती ॥ २ ॥ वैष्णव करिती नामघोष । नाचती उदास कीर्तनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे भुक्ती मुक्ती । जोडती विरक्ती अनायासें ॥ ४ ॥

३६ ऐशिया सुखाची मांदूस । झाली रूपस विठाई ॥ १ ॥ मांडूनिया। इटे ठाण । धरिला जघन द्वयकरीं ॥ २ ॥ रूपाकृती मानववेष । ईशाईश जननी हे ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तांसाठीं । फिरे वाळुवंटीं उघडी हे ॥ ४ ॥

३७. नाढळे कधींही पंढरीं । नका सांगों त्याची थोरी ॥ १ मिथ्या करिती ते चार । सोंग कथेचा विस्तार ॥ २ ॥ नाहीं प्रेमा पांडु

गीं । चित्त विषयसेवाभोगीं ॥ ३ ॥ निळा म्हणे दावी जैसें । नाहीं अंतर झालें तैसें ॥ ४ ॥

३८ नाहीं विश्वास जया गांठीं । न पाहती दिठीं पंढरी ते ॥ १ ॥ अदृष्ट त्यांचें हीन झालें । न देखती पाउलें विटेवरी ॥ २ ॥ लक्ष चौऱ्याशीं यातना भोग । सोशिती अभंग दैन्यवाणे ॥ ३ ॥ निळा म्हणे नाडले वांया । दुर्लभ पावोनियां नरदेह ॥ ४ ॥

३९ पुंडलिकें शेत केलें । पिकविलें अपार ॥ १ ॥ सर्वांगित नावरे एका । मग सकळ लोकां हांकारी ॥ २ ॥ या रे ह्मणे बांधा मोटा । करा सांठा न्या घरा ॥ ३ ॥ निळा ह्मणे कल्पवरी । लुटती परी सरेना ॥ ४ ॥

४० पुढारले विठ्ठलहरी । केली नगरी वैकुंठ ॥ १ ॥ सुदर्शन ठेविलें तळीं । म्हणे कल्पजळीं बुडों नेदी ॥ २ ॥ तैसेचि धरिले क्षेत्रावरी । म्हणती हे नगरी रक्षावी ॥ ३ ॥ निळा म्हणे या पुंडलिकें । यापरी लोकें उद्धरिलीं ॥४॥

४१ भोळा माझा पंढरीनाथ । धांवे त्वरित पाचारिल्या ॥ १॥ न पाहे मान प्रतिष्ठा त्याची । घेतली ज्याची मुति येणें ॥ २ ॥ अनाथें दिनें भाविकें तें । आवडती चित्तें जीवापरी ॥३॥ निळा म्हणे पाळी लळा । अखंड सोहळा करूनियां ॥ ४ ॥

४२ जो देखे एकदां तरी । हें पंढरी वैकुंठ ॥ १ ॥ मुती तया आली हाता । नाहीं चिंता मोक्षाची ॥ २ ॥ याचिये मार्गीं पाऊल पडे । तेव्हांचि जोडे यात्रा त्या ॥३॥ निळा म्हणे प्रत्यक्ष भेटी । ते तो लुटी निजानंदा ॥

४३. पाचारितांचि पंढरीनाथा । संचरे तत्वतां हृदयांत ॥ १ ॥ ऐसा प्रताप आणिकां अंगीं । नाहीं ये युगीं विवरितां ॥ २ ॥ संगतीं अन्यत्र दैवतें भूतें । आशा लोलिंगतें ते काय ॥ ३ ॥ निळा म्हणे जन्ममरणा । करि निवारणा एक हरि. ॥ ४ ॥

४४. करूनी चंद्रभागे स्नान । अभिवंदन पुंडलीका ॥ १ ॥ पुजूं

जाति विठोबासी । वैकुंठवासी ते होती ॥ २ ॥ कथाश्रवण प्रदक्षणा । नाहीं गणना सुकृता त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे पूर्वजेसी । होती विमानेंसी प्रविष्ट ॥ ४ ॥

४५. भाविकाचें अवघेंचि गोड । करूनि कोड स्वीकारी ॥ १ ॥ भोळानाथ पंढरीचा । न करी दासाचा अतिक्रम ॥ २ ॥ न म्हणे रुक्ष थोडें कांहीं । घाली अवघेंही मुखींचि तें ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपावंत । उभा तिष्ठत विटेवरी ॥ ४ ॥

४६. महर्षी देव स्तविती ज्यातें । कृतांजुळी हातें जोडूनियां ॥ १ ॥ तो हा उभा विटेवरी । रम्य तीरीं चंद्रभागे ॥ २ ॥ शुक नारद गाती कीर्तनीं । ज्यातें अनुदिनीं सुस्वरें ॥ ३ ॥ निळा ह्मणे ब्रह्मादिक । ज्याचिये सेवक आज्ञेचे ॥ ॥

४७. न देखे जो पंढरीनाथ । झाला हाहाभूत जन्म त्याचा ॥ १ ॥ वाया गेला पतना नेला । नाहीं आठविला हरि म्हणून ॥ २ ॥ कैंचें त्या पंढरपूर । पदरीं अपार दोषमळ ॥ ३ ॥ निळा म्हणे देईल झाडा । जाऊनी पुढां यमदंड ॥ ४ ॥

४८- धिक् त्याचें जन्मांतर । न देखे पंढरपुर महापापी ॥ १ ॥ अहारे कर्मा बलवत्तरा । नेला अघोर भोगावया ॥ २ ॥ नेदीचि उपजों विश्वासले मुनीं । पंढरी हे नयनीं देखावया ॥ ३ ॥ निळा म्हणे संग्रह होतां । पापाचा आइता उघडला तो ॥ ४ ॥

४९. नेमूनियां ठेविले जेथें । वसती तेथें ते देव ॥ १ ॥ ऐसा समर्थ पंढरीनाथ । तो हा मोहित भक्तिसुखा ॥ २ ॥ जेणें निर्मूनि पांचहि तत्त्वें । राखिलीं समत्वें निज आज्ञा ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मांडें भुवनें । स्वर्गें आनानें रचियलीं ॥ ४ ॥

५० धन्य धन्य पुंडलिका । केला तरणोपाय लोकां ॥ १ ॥ एका दर्शनेचि उद्धार । केलें पावन चराचर ॥ २ ॥ चंद्रभागा पंढरपूर । भक्त ॥ आणि हरिहर ॥ ३ ॥ निळा म्हणे सुलभ केलें । भूमि वैकुंठ। गाईगोधनाचे

९१ तळींवरी सुदर्शन । करीत छेदन महापापा ॥ १ ॥ प्रत्यक्ष उभा देवचि भेटे । हेंही कोठें आन ठायीं ॥ २ ॥ एकी क्षेत्र प्रदक्षणा। तुळसीपानावरी तोखे ॥ ३ ॥ निळा म्हणे चंद्रभागे । स्नाने भंगे पाप ताप ॥ ४ ॥

९२ पंढरिये अनुष्ठान केलें चंद्रे । अलकापुरीं इंद्रें तपश्चर्या ॥ १ ॥ तेथें इंदु निष्कलंक अंगें । येथें आरोग्यभगें सुरेंद्रता ॥ २ ॥ हरिहररूपें पंढरीरावो । येथें तिन्ही देवो सिद्धरूपें ॥ ३ ॥ निळा म्हणे तेथें भक्ती । येथें विरक्ती प्रगटली ॥ ४ ॥

९३. नावडे पंढरी । कथा करी दारोदारीं ॥ १ ॥ नको त्याचें संभाषण । वाटे भेटीसवें शीण ॥ २ ॥ सांगे ब्रह्मज्ञान वरी । नाहीं प्रेम तें अंतरीं ॥३ ॥ निळा म्हणे पोटभरू । उगेचि करिती गुरुगुरु ॥ ४ ॥

९४. झाली भाग्याची उजरी । दृष्टी देखतांचि पंढरी ॥ १ ॥ ठेविले तों कर कटीं । जेणें अवलोकिला दिठी ॥ २ ॥ चंद्रभागे केलें स्नान । भक्ता पुंडलिकाचें दर्शन ॥ ३ ॥ निळा म्हणे वैकुंठासी । प्राणी होईल तो निश्चयेसी ॥ ४ ॥

९५. तिहीं लोकीं फुटली हांक । वैकुंठलोक पर्यंत ॥ १ ॥ भेटों गेला पुंडलिकांसी । हृदयनिवासी जगाचा ॥ २ ॥ दोषियां पापियां उद्धरीत । हांकारित भाविकां ॥ ३ ॥ निळा म्हणे ठेवुनी हात । कटावरी तिष्ठत विटे उभा ॥ ४ ॥

९६. जया नावडे पंढरी । निरयवासी तो अघोरी ॥ १ ॥ विठोबासी निंदी वाचा । यमदंड तो पावे साचा ॥ २ ॥ नेणे विठोबाचें नाम । वृथा गेला त्याचा जन्म ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रेतरूप । त्याचें पुण्य तेंचि तें पाप ॥ ४ ॥

९७. चंद्रभागे करितां स्नान । होती पातकी पावन ॥ १ ॥ पुंडलिकासी नमस्कार । करितां पूर्वजां उद्धार ॥ २ ॥ वेणु नादीं काला वांटी। करि-मी पूर्वजां वैकुंठीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पिंडदान । दक्षिणा गया ॥

५८. जाउनियां भीमातटीं । नाचों वाळुवंटीं पंढरिये ॥ १ ॥ होतील लाभाचिया कोटी । पहाता दृष्टी विठ्ठला ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति आपुल्या सुखें । येती हरिखें सामोऱ्या ॥ ३ ॥ निळा म्हणे परमार्थ धणी । होईल आयणी फिटोनी ॥ ४ ॥

५९ अगाध महिमा पंढरीचा । काय तो वाचा कळेल ॥१ येती यात्रे मुक्त होती । जे या देखती विठ्ठला ॥२॥ नलगे दुर्जे तपसाधन । घडतां स्नान चंद्रभागे ॥३॥ निळा म्हणे भूमीवरी । क्षेत्र हें पंढरी वैकुंठ ॥४॥

६० देखतांची यातें दिठी । पळती कोटी पापांच्या ॥१॥ जेंवि उगवतांचि रवी । अंधकार न दावी मुख पुढें ॥२॥ जन्ममरणयात्राचि फिटे । लाजती गोमटे अभ्यास ॥३॥ निळा म्हणे महिमा ऐसा । पंढरीनिवासा भेटतां ॥४॥

६१ झाली कीर्तनाची दाटी । चंद्रभागे वाळुवंटीं ॥१॥ संत गर्जती आनंदें । हरिचीं नामें नाना छंदें ॥२॥ टाळ मृदंग झणत्कार । नामें कोंदलें अंबर ॥३॥ निळा म्हणे वैकुंठवासी । झाला सुलभ हरिभक्तांसीं ॥४॥

६२ जाईन म्हणतांचि पंढरपुरा । काळिकाळा दरारा उपजे मनीं ॥१॥ यमधर्माचिया दंडासी चुकला । आणि पूज्यमान झाला तिहीं लोकां ॥२॥ विधी म्हणे तया निषेधुची नाहीं ॥ कर्माकर्मप्रवाहीं न पडेचि तो ॥ ३ ॥ निळा म्हणे तेणे आनंदवुनी सकळा ॥ नेले आपल्या कुळा वैकुंठासी ॥ ४ ॥

६३ कौलें पिकली परलोक पेठ । हे भूवैकुंठ पंढरी ॥ १ ॥ नाम मुद्रा खरें नाणें। घेणेंदेणें लाभवरी ॥ २ ॥ ब्रह्मानंदें भरिलीं पोतीं। प्रेमें उथळती सीगवरी ॥ ३ ॥ निळा म्हणे जाऊं हाटा । करूं साठा न सरेसा ॥ ४ ॥

६४. गरुड आणि हनुमंत । पुढें सेवेसी तिष्ठत ॥ १ ॥ उभा वैकुंठनिवासी । देव येती दर्शनासी ॥ २ ॥ महाद्वारीं गरुडध्वज । गगनीं झळके तेजःपुंज ॥ ३ ॥ निळा म्हणे कथा कीर्ति । संत सन्मुख नाचती ॥ ४ ॥

६५. पुंडलिकें आणिला घरां । त्रैलोक्य सोयरा कुटुंबाळु ॥ १ ॥ सोळा सहस्र आतापुरे । कन्या कुमर दास दासी ॥ २ ॥ गाई गोधनाचे

वाडे । गोपाळ सवंगडे समवेत ॥ ३ ॥ निळा म्हणे वस्ती दाट । केली वैकुंठ पंढरी ॥ ४ ॥

६६. कैवल्याचा गाभा । व्यापुनिया ठेला नभा ॥ १ ॥ तो हा सगुण वेषधारी । उभा चंद्रभागे तीरीं ॥ २ ॥ धुंडिती पुराणें । वेदश्रुती ज्याकारणें ॥ ३ ॥ निळा म्हणे अवघे देव । ज्याचे म्हणविताती अवयव ॥ ४ ॥

६७. देवा भक्ताचा सोहळा । वाचे गाती वेळोवेळा ॥ १ ॥ म्हणती धन्य पंढरपुर । पुंडलीक मुनीवर ॥ २ ॥ चंद्रभागा पद्मतीर्थ । वेणुनादीं जन कृतार्थ ॥ ३ ॥ निळा म्हणे पांडुरंगा । भेटी तापत्रयभंगा ॥ ४ ॥

६८. पंढरपुरा जाऊं चला । भेटों रुकमाई विठ्ठला ॥ १ ॥ जन्ममरणाचें खंडन । अवलोकितां दृष्टीं चरण ॥ २ ॥ पुंडलिका वंदूनियां । लागें विठोबाच्या पायां ॥ ३ ॥ निळा म्हणे घेऊनी कडे । नेतील वैकुंठा रोकडें ॥ ४ ॥

६९. सांगतों हें मनीं धरा । हित करा आपुलें ॥ १ ॥ जारे पंढरीसी आधीं । कृपानिधी भेटेल ॥ २ ॥ अवचीच सुखें अलौकिकें । देईल एके दर्शनें ॥ ३ ॥ निळा म्हणे रिद्धी सिद्धी । मुक्ति पदीं लागती ॥ ५ ॥

७० चिमणाचि दोखिला परि हा वाड झाला । गगन हि फांकला प्रकाश वरी ॥ १ ॥ भरोनियां दाही दिशा कोंदाटला । पाताळा वरिही गेला पदांकु याचा ॥ २ ॥ स्वर्ग माळा अंगीं लेईला सुढाळ । कान्हो चक्रचाळ पंढरीचा ॥ ३ ॥ निळा म्हणे दिसे ईटेच्या नेहटी । परी हा व्यापुनी सृष्टी येथें उभा ॥ ४ ॥

७१ बरें झालें शरण गेलों । संतीं लाविलों निज सोयीं ॥ १ ॥ म्हणती पंढरीचा हाट । करी बोभाट हरिनामें॥ २ ॥ येईल तो बरावरी । धरील श्रीहरी हृदयेंसी ॥ ३ ॥ निळा म्हणे एकाचि खेपे । खंडती पापें सकळही ॥ ४ ॥

७२. बोलाविल्यावांचुनी आला । उभा पाठीसी ठाकला । अवचित

पुंडलिकें देखिला । मग पूजिला उपचारीं ॥ १ ॥ म्हणे आजी हें नवल झालें । मज अनाथा सांभाळिलें । ब्रीद आपुलें सांच केलें । सुयाणें घडलें स्वामीचें ॥ २ ॥ देव म्हणती तुझिया भावा । देखोनि पावलों विसांवा । उभा राहोनि करीन सेवा । नवजें आतां येथुनी ॥ ३ ॥ पंच महापातकी येती । तेही येथें मुक्त होती । ऐसा पुरस्करुनी पुंडलिकाप्रती । वरु दिधला त्रिवाचा ॥ ४ ॥ निळा म्हणे सात्विक जन । करिती तेथें हरि-कीर्तन । तें तों ब्रम्ह सनातन । पावती वचन हें सत्य ॥ ५ ॥

७३ भाग्याचे ते नारीनर । अवलोकिती निरंतर ॥ १ ॥ उजळूनीयां ताटीं ज्योती । वधुवरांतें ओवाळिती ॥ २ ॥ नित्य पंढरीचा वास । उपमा नाहीं त्या सुखास ॥ ३ ॥ निळा म्हणे वैकुंठवासी । नित्य हरि जयापाशीं ॥ ४ ॥

७४ पंढरीये पांडुरंग । भोंवता संग संतांचा ॥ १ ॥ मिळवूनियां संतमेळा । मध्यें सांवळा शोभत ॥ २ ॥ एकला एकचि पुंडलिका । जोडी त्रैलोक्या पुरविली ॥ ३ ॥ निळा म्हणे न सरे तरी । अद्यापि वरी तैसीचि ॥ ४ ॥

७५ सर्व काळ तुमच्या पदीं । मोक्ष मुक्ति रिद्धी सिद्धी ॥ १ ॥ करिती भक्तांचें पाळण । जे जे ध्याती हृदयीं चरण ॥ २ ॥ तुमच्या चरणातें चिंतिती । वैकुंठीं ते पूज्य होती ॥ ३ ॥ निळा म्हणे जगदोद्धारा लागीं ते आले पंढरपुरा ॥ ४ ॥

७६ अचळ धरा तैसें पीठ । पायातळीं मिरवे वीट ॥ १ ॥ दोन्हीं पाउलें समान । जैसे योगीयाचे नयन ॥ २ ॥ जानु जंघ ते स्वयंभ । जैसे कर्दळीचे स्तंभ ॥ ३ ॥ कसीयले पीतवसन । झळके विद्युल्लते समान ॥ ४ ॥ शेष बैसला वेटाळां । तैसा कटिबंध मेखळा ॥ ५ ॥ समुद्र खोलीये विशाळ । तैसें नाभीचें मंडळ ॥ ६ ॥ तुळसी मंजरिया गळां । जैशा सुटल्या मेघमाळा ॥ ७ ॥ दिग्गजाचे शुंडादंड । तैसे कटीं कर प्रचंड ॥ ८ ॥ पूर्णिमेचा उदो केला । तैसा मुखचंद्र शोभला ॥ ९ ॥

जैसीं नक्षत्रें झमकती । तसीं कुंडलें चमकती ॥ १० ॥ सूर्य मिरवे नभमंडळा । तैसा केशराचा टिळा ॥ ११ ॥ क्षीराब्धीचे चंचळ मीन । तैसें नेत्रीं अवलोकन ॥ १२ ॥ जैसें मेरूचें शिखर । तसा माथां मुगुट स्थिर ॥ १३ ॥ इंदु प्रकाशें वेढिला । तैसा क्षीरोदकें वेष्टिला ॥ १४ ॥ तृप्तीलागीं चातकपक्षी । निळा तैसा ध्यान लक्षी ॥ १५ ॥

७७ महिमा याचा चतुर्मुखा । न करवेचि लेखा वर्णितां ॥ १ ॥ सनकादिकाहि नित्य येती । पूजा करिती देवभक्ता ॥ २ ॥ सुरवर आणि मुनिजन । संतसज्जन नित्य स्तविती ॥ ३ ॥ निळा म्हणे सकळहि तीर्थें । होतीं कृतार्थ दर्शनें ॥ ४ ॥

७८ चिमणें ठाण कटीं कर । मूर्ती सांवळी सकुमार ॥ १ ॥ होय डोळियां पारणें । पहातां दिसे राजसवाणें ॥ २ ॥ जडोनि ठेले सनकादिक । चरणीं ठेवुनिया मस्तक ॥ ३ ॥ निळा म्हणे ओवाळिती । संत प्राणांचिया ज्योती ॥ ४ ॥

७९ पुंडलीक पूजा करी । विधि षोडश उपचारीं ॥ १ ॥ देखोनियां त्याचा भावो । उभा वैकुंठींचा रावो ॥ २ ॥ बुका अर्पी तुळशीमाळा । केशर चंदनाचा टिळा ॥ ३ ॥ निळा म्हणे स्थिरावला । देखोनि भक्तातें भुलला ॥ ४ ॥

८० जेणें पृथ्वीसीं धरिलें । सूर्या प्रकाशें उटिलें ॥ चंद्रबिंबीं अमृत ठेविलें । तेणें निववीत जगा तो ॥ १ ॥ गगना पवाडू दिधला । मेरु स्तंभ उभारिला ॥ गती पवनही उडविला । दाही दिशा फिरतसे ॥ २ ॥ जेणें अग्नीसी दीपन । जीवनीं ठेविलें जीवन ॥ आपोनिधी जळें पूर्ण । क्षीरें सागर भरियेला ॥ ३ ॥ नाना अन्नीं ठेविली तृप्ती । नाना परिमळ पुष्पयाती ॥ नाना रसस्वाद फळा प्रति । एवढी युक्ती कोणाची ॥ ४ ॥ अपार चांदणें फुलोरा । जेणें शोभविलें अंबरा ॥ पर्जन्याच्या धरुनि धारा । जेणें पिकविलें धरणीतें ॥ ५ ॥ जेणें इंद्रादिका देवां । पदीं स्थापुनी वांटिल्या सेवा ॥ जेणें मर्दुनी दैत्य दानवां । केला सांभाळ भक्ताचा ॥ ६ ॥ जो या प्राणातें

चाळिता । जीवा जिवणें ज्याचिया सत्ता ॥ मनीं संकल्पाचिया चळथा । उठवी सत्ता हे कोणा ॥ ७ ॥ जो या श्रुतीतें पढविता । परमामृतातें जीववीता ॥ सूर्या अंजन लेववीता । अवघी सत्ता हे ज्याची ॥ ८ ॥ चराचर व्यापूनियां उरला । उभा विटेवरी ठाकला ॥ निळा म्हणें तेणें केला । बुद्धी माझीये प्रकाश ॥ ९ ॥

८१ वोरसोनियां भक्तासाठीं । धांवे वैकुंठेहुनी उठाउठी । हात ठेऊनियां कटीं । उभा द्वारीं ठाकला ॥ १ ॥ देखोनियां पुंडलिकासी । वास केला तयापाशीं । अवलोकुनियां निजभक्तासीं । परम विश्रांती पावला ॥२ ॥ जे जे येती दर्शनासी । भुक्तिमुक्ति वांटी त्यांसी । गाती वाणिती जे यासी । त्या ने वैकुंठासी निज गजरें ॥ ३ ॥ नेघे त्यांची अतिशय सेवा । जिहीं आळविलें याचिया नांवा । धांवोनि त्यांचा करी कुडावा । आपुलिया गांवा ने त्यांसी ॥ ४ ॥ न म्हणेचि दिवसरात्री कांहीं । सदा भक्तांचिये बाहीं । निळा म्हणे त्यांच्याचि देहीं । प्रगट नव्हे निराळा ॥ ५ ॥

८२ विठ्ठलमूर्ति पाहतां दिठीं । पळती कोटि पापांच्या ॥ १ ॥ मग तो आविर्भवे अंतरीं । दिसे बाहेरी चहूंकडे ॥ २ ॥ दुजें येऊचि नेदी आड । लपवी दुवाड मायाकृत ॥ ३ ॥ निळा म्हणे व्यापुनी दिशा । ठाके सरिसा दृष्टीपुढें ॥ ४ ॥

८३ माझिये मना विश्रांती वाटे । देखतां गोमटे विटे चरण ॥ १ ॥ तुळशीमाळा शोभल्या कंठीं । प्रकाश मुगुटीं रत्नांचा ॥ २ ॥ कुंडलाचे दीप्ती झळाळ । शोभलें निढळ बुक्यानें ॥ ३ ॥ निळा म्हणे अंगींचे कांति । सुर्यादि लोपती शशिमंडळें ॥ ४ ॥

८४ योगी चिंतिती चिंतनी । ध्यानीं मनीं रूप ज्याचें ॥ १ ॥ तोहा अकल्पीतचि आला । उभा केला पुंडलिकें ॥ ५ ॥ हृत्कमळीं चतुरानन । ज्यातें स्तवून पूजितु ॥ ३ ॥ निळा म्हणे शिवहि चिंती । ज्यातें एकांती सर्वदा ॥ ४ ॥

८५ भक्तां भाग्य घरां आलें । उभेंचि ठेलें सन्मुख ॥ १ ॥ म्हणे विठ्ठल माझें नांव । सांगों गांव वैकुंठ ॥ २ ॥ भेटावया तुम्हां आलों । निर्बुजलों वियोगें ॥ ३ ॥ निळा म्हणे पुंडलिका । भेटे सखा प्रीतीनें ॥ ४ ॥

८६ संतसनकादिक देव । भेटावया आले सर्व ॥ १ ॥ देवा भक्तांतें पूजिती । महिमा अद्भुत तो वर्णिती ॥ २ ॥ पावन केलीं पुंडलिकें । म्हणती नरनारी बाळकें ॥ ३ ॥ निळा ऐकोनियां ते वाणी । मिठी घालूं धांवे चरणीं ॥ ४ ॥

८७ राजा जाय तिकडे ऐश्वर्य संपत्ती । वैभवें चालती समागमें ॥ १ ॥ वसे वनामाजीं तेथें सर्व सिद्धी । घेऊनी समृद्धी वसती पाशीं ॥ २ ॥ नाही उणें धना वस्त्रा आणि भूषणा । अन्ना काष्ठा जीवना तृणा सैन्या ॥ ३ ॥ निळा म्हणे देवा तुम्ही लक्ष्मीवर । उभे कटीं कर जयापाशीं ॥ ४ ॥

८८ न पुरे धणी गुण गातां । रूप दृष्टीं अवलोकितां ॥ १ ॥ बरवा बरवा विठ्ठल हरी । माझे बैसला अंतरीं ॥ २ ॥ मुख लावण्याची खाणी । राही वामांगीं रुक्मिणी ॥ ३ ॥ निळा म्हणे दृष्टीपुढें । दिसे कोंदलें रूपडें ॥ ४ ॥

८९ पाहिजे तें समयीं देणें । नेदितां उणें पडों कोठें ॥ १ ॥ ऐसा कृपेचा सागर । रमावर श्रीविठ्ठल ॥ २ ॥ उपकार याचे आठवितां । न सांडे चित्ता आनंद तो ॥ ३ ॥ निळा म्हणे भरंवसा झाला । संदेह फिटला मानसींचा ॥ ४ ॥

९० पांडुरंगा तुमची लिळा । विचित्र काळा जाणतीया ॥ १ ॥ म्हणोनियां शरणांगत । देवहि अंकित ऋषी तुमचे ॥ २ ॥ हृत्कमळीं आराधिती ॥ नित्य पूजिती दृढनिष्ठा ॥ ३ ॥ निळा म्हणे दृश्य येती नाना स्तविती स्तुतिवादें ॥ ४ ॥

९१ दिव्य तेज मुसावलें । विठ्ठलचरणीं तें राहिलें ॥ १ ॥ झालें डोळियां पारणें । तनुमना भुलवणें ॥ २ ॥ देवा दर्शनाची शिराणी । वाणी न पुरेचि त्या वदनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे चरण चुरी । रमा नित्य निरंतरीं ॥ ४ ॥

९२ ऐशी विठाई माउली। अनाथां कृपेची साउली ॥ १ ॥ उभी असे निरंतर। ठेउनीयां कटीं कर ॥ २ ॥ देउनी प्रेमाचें भातुकें। दासा अवलोकी कौतुकें ॥ ३ ॥ निळा म्हणे महिमा इचा। वर्णितां कुंठित वेदवाचा ॥ ४ ॥

९३ माझा विठो नव्हेचि तैसा। उदारपणें ज्याचा ठसा ॥ १ ॥ नामाचि एक स्मरल्यासाठीं। गणिका बैसविली वैकुंठीं ॥ २ ॥ भ्रष्ट अजामेळ दोषी। स्मरतां नेला निजधामासीं ॥ ३ ॥ निळा म्हणे सुदामदेवा। देउनी स्थापिलें निजवैभवा ॥ ४ ॥

९४ वसती पायांपाशीं। रिद्धि सिद्धी मुक्ती दासी ॥ १ ॥ तो हा उभा कटीं कर। राहीरुक्माईचा वर ॥ २ ॥ भुक्ति मुक्ती दासी वांटी। दर्शनेंचि फुकासाठीं ॥ ३ ॥ निळा म्हणे चिंतिती मुनी। ज्यातें ध्यानीं अनुदिनीं ॥ ४ ॥

९५ सगुण स्वरूप तुमचें हरी। शोभलें तें विटेवरी ॥ १ ॥ तेणें लागली टकमक। डोळियां नावडे आणिक ॥ २ ॥ मनाबुद्धीसीही भुली। इंद्रियें गुंफोनि राहिलीं ॥ ३ ॥ निळा म्हणे तनुप्राण। गेलीं आपणा विसरोन ॥ ४ ॥

९६ सकळा मंगळांचें धाम। ज्याचेनि विश्राम विश्रांती ॥ १ ॥ तो हा पंढरीचा रावो। सकळां ठावो कल्याणा ॥ २ ॥ ज्याचेनि सुखा सुखपण। ज्याचेनि त्रिभुवन रूपस ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्याचेनि निगमा। आणिली गरिमा जाणिवेची ॥ ४ ॥

९७ सूर्य विटला प्रकाशासी। परि तो सांडितां नयेचि त्यासी ॥ ॥ १ ॥ तेवीं हा पंढरीश परमात्मा। सांडूं नेणे आपला माहिमा ॥ २ ॥ अग्नि दीपना विटला। परि ते नसुटेचि कीं त्याला ॥ ३ ॥ निळा म्हणे साखरे गोडी। उदका आर्द्रता न सोडी ॥ ४ ॥

९८ सुहास्य वदन तुटती तारे। पाउलें गोजिरीं विटेवरी ॥ १ ॥ कटावरी ठेविले हात। आयुधें मंडित शंखचक्र ॥ २ ॥ पीतांबर वेष्टिला

कांसे । मेखळे ठसे जाडिताचे ॥ ३ ॥ निळा म्हणे हृदयावरी । पदक तमारि तेंवि झळकें ॥ ४ ॥

९९ सर्व तीर्थें चहुं भागें । होती अंगें सुस्नात ॥ १ ॥ देवा उभा म्हणोनि तीरीं । सरोवरीं महिमा हा ॥ २ ॥ सकळतीर्थां अधिष्ठान । विटेचरण शोभले ॥ ३ ॥ निळा म्हणे विठ्ठल म्हणतां । सायुज्यता घर रिघे ॥ ४ ॥

१०० विठ्ठल केणें मागेंपुढें । पिके उदंडें सुरवाडिक ॥ १ ॥ एक ते घेती देती एक । तरि हें अधिक भरलेंसे ॥ २ ॥ युगें गेली करितां माप । निगमाहि अमूप नये माना ॥ ३ ॥ निळा म्हणे भाविकां जोगें । झालें हें अनुरागें आवडीच्या ॥ ४ ॥

१०१ वेद शोधितां शिणले । मग ते मौनाचि राहिले ॥ १ ॥ देखोनि निजात्मा निर्मळा । नेणती गोरा कीं सांवळा ॥ २ ॥ हा ऱ्हस्व दीर्घ नये माना । बाळ वृद्ध किंवा तरुणा ॥ ३ ॥ निळा म्हणे तो हा येथें । आला भेटी पुंडलिकातें ॥ ४ ॥

१०२ वसवूनियां चराचर । उभा नागर विटेवरी ॥ १ ॥ सगुण रूपें भासे लोकां । परि हा नेटका निरामय ॥ २ ॥ देत्यांतकचि म्हणती यासी । परि हा सकळांसी भक्षक ॥ ३ ॥ भक्तांपाशीं गुंतला दिसे । परि हा वसे अणुरेणीं ॥ ४ ॥ कर्ता भोक्ता वाटे सकळां । परि हा वेगळा अलिप्त ॥ ५ ॥ निळा म्हणे नयेचि मना । करितां विवंचना श्रुतिशास्त्रांसीही ॥ ६ ॥

१०३ भक्तकृपाळू माउली । कटीं कर उभी ठेली ॥ १ ॥ मोहें पाहे मुखाकडे । भेटावया वाडें कोडें ॥ २ ॥ परम प्रीतीचा वोरस । सदांसर्वदां उल्हास ॥ ३ ॥ निळा म्हणे सुप्रसन्न । भक्तांलागीं हास्यवदन ॥ ४ ॥

१०४ महर्षि सिद्ध सनकादिक । संत ज्याचे उपासक ॥ १ ॥ तो हा पुंडलिका भेटी । आला उतावेळ पोटीं ॥ २ ॥ शिवाचिये ध्यानीं मनीं योगी चिंतिती चिंतनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे रमा दासी । म्हणवी सेवूनियां चरणासी ॥ ४ ॥

१०५ मूळ डाळ बीजीं अवघे शाखा पल्लव । फळीं पुष्पीं विस्तारला परि तेंचि सर्व ॥ १ ॥ तैसा एक बीजरूप विटेवरी उभा । विश्वाकारें प्रकटला व्यापूनियां नभा ॥ २ ॥ सर्वहि होऊनि देवो देवी आपणचि सकळ । भूत व्यक्ति नाना वर्ण सूक्ष्म स्थूळ ॥ ३ ॥ निळा म्हणे एकाविण नाहीं दुसरें । एकीं एकपणही नुरे सेवटिलें मरे ॥ ४ ॥

१०६ उतरिला धराभार । जेणें घेऊनियां अवतार ॥ १ ॥ तो हा भक्तें पुंडलिकें । गोवीयेला घेउनी भाकें ॥ २ ॥ शिळीं बांधिला सागर । निर्दाळिला दशशीर ॥ ३ ॥ निळा म्हणे नारी । सोडवूनी राज्य करी ॥ ४ ॥

१०७ भक्त देखोनियां श्रीहरी । केला घरीं वास पुढें ॥ १ ॥ म्हणे नवजे येथूनियां । युगें गेलियां कल्पकोटी ॥ २ ॥ प्रसन्न झाले निजभक्तासी । म्हणती मुक्तीसी वांटीन येथें ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपावंत । राहिले तिष्ठत मग उभे ॥ ४ ॥

१०८ उघडली सतेज खाणी । लावण्याची बरवेपणीं ॥ १ ॥ विठो सुंदरा सुंदर । रूप नागरा नागर ॥ २ ॥ मुख अमृत कुपिका । पूर्णचंद्रउदयो लोका ॥ ३ ॥ निळा म्हणे कटीतटीं । मूर्ति साजिरी गोमटी ॥ ४ ॥

१०९ इटे साजिरीं पाउलें । कटीं कर विराजले ॥ १ ॥ तेची आठवती मनीं । चित्त रातलें चिंतनीं ॥ २ ॥ तुळशीहार पदकें माळा । रूपाकृति घनसावळा ॥ ३ ॥ निळा म्हणे वेधल्या वृत्ती । आनु कांहींचि त्या नेणती ॥ ४ ॥

११० इंद्रादिकां देवां । पदीं स्थापुनी वाटी सेवा ॥ १ ॥ तो हा येऊनी पंढरीये । इटेवरी उभा ठाये ॥ २ ॥ चिंतिती चतुरानन । ईश्वराचें ध्येय जो ध्यान ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्यातें गीती । सदा वेदश्रुती गाती ॥ ४ ॥

१११ उपनिषद्वांच्या मती । ज्याच्या स्तुतिवादें भ्रमती ॥ १ ॥ तो हा सुंदर नागर । इटे उभा कटीकर ॥ २ ॥ रमा होऊंनियां दासी । नित्य सेवीत चरणांसी ॥ ३ ॥ निळा म्हणे लीलाचि करी ॥ ब्रह्मांडाच्या भरोवरी ॥ ४ ॥

११२ उभा ठेला इटेवरी । प्रभा दाटली अंबरीं ॥ १ ॥ विठो कैवल्याचा गाभा । व्यापुनियां ठेला नभा ॥ २ ॥ नेणती कुसरी । ब्रह्मादिक ज्याची थोरी ॥ ३ ॥ निळा ह्मणे भक्तिसुखा । भुलोनियां आला देखा ॥ ४ ॥

११३ एक जोडी बहुतें खाती । भाग्यवंत म्हणती जन त्यासी ॥ १ ॥ परि त्या आणिक साहित्यासी । नव्हे तैसी जोडी याची ॥ २ ॥ एकला एकचि पुंडलिका । जोडी त्रैलोक्या पुरविली ॥ ३ ॥ निळा म्हणे न सरे तरी । आद्यपिवरी तैसेचि ॥ ४ ॥

११४ मच्छ कूर्म वराह झाला । नृसिंह वामन होऊनी ठेला ॥ १ ॥ तो हा विटे सौम्यरूप । कोटी कंदर्पांचा बाप ॥ २ ॥ परशुराम कृतांत काळ । अयोध्यावासी नृप गोवळ ॥ ३ ॥ निळा म्हणे बौध्य कलंकी । होउनी वेगळा नाटकी ॥ ४ ॥

११५ आराधिला पुंडलिकें । जननी पुजुनियां जनकें ॥ १ ॥ त्याच्या भावासी भुलला । भेटी धांवोनियां आला ॥ २ ॥ सहस्त्रसोळा परिवारेसीं । वस्ति केली तयापाशीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पाचारिले । देवसमुदाय आणिले ॥ ४ ॥

११६ शोषिली पूतना । विषें भरुनी आली स्तनां ॥ १ ॥ तोहा पुंडलिका द्वारीं । उभा परमात्मा श्रीहरी ॥ २ ॥ कंस आणि जरासंध । जेणें मर्दिले मागध ॥ ३ ॥ निळा म्हणे फरशधारी । केली क्षत्रियां बाहेरी ॥ ४ ॥

११७ सुकाळ झाला नारीनरां । चराचरां मुक्तींचा ॥ १ ॥ विठोबाच्या दर्शनमात्रें । ऐकतां श्रोत्रें गुण त्याचे ॥ २ ॥ नित्य नवाचि उत्साह वाटे । हृदयीं न संडे आनंद तो ॥ ३ ॥ निळा म्हणे जगदोद्धारा । उपाय बरा योजिला हा ॥ ४ ॥

११८ गाउनियां आल्हर मुखें । निजीं निजवी त्या सुखें ॥ १ ॥ आवडि ते नीच नवीं । वस्त्रें अळंकार लेववी ॥ २ ॥ माझे दिठावेल ह्मणे । उतरी वरुनी निंबलोणे ॥ ३ ॥ निळा म्हणे आई । परम कृपाळू विठाई ॥ ४ ॥

११९ भक्तांलागीं पुढारला। येउनी पुढें उभा ठेला ॥ १ ॥ शीण भागही न विचारी। युगानुयुगीं विटेवरी ॥ २ ॥ सोहळा अधिकें अधिक। करी भक्ताचें कौतुक ॥ ३ ॥ निळा म्हणे बहुमानें। संतां पूजी वांटी दानें ॥ ४ ॥

१२० बरवी आजी हे जोडी झाली। तुमचीं पाउलें देखिलीं ॥ अवघींच इंद्रियें निवालीं। आलिंगनीं तुमचिया ॥ १ ॥ वदनीं आठवलें नाम। तुमचें सांपडलें प्रेम ॥ बरवा साधला हा नेम। मनही विश्राम पावलें ॥ २ ॥ बरवा पंढरपुरा गेलों। सत्संगें महाद्वारा पावलों ॥ भीतरीं राउळां प्रवेशलों। बरवा भेटलों विठोबासी ॥ ३ ॥ तेणें पुरले सर्वही काम। रूप डोळां वदनीं नाम ॥ संतांचाही समागम। धणी धाय तो पावलों ॥ ४ ॥ निळा म्हणे सर्वांपरी। कृतकृत्य झालों हरी ॥ तुमचा दास मी कामारी। ठेवा दारवंटा राखोन ॥ ५ ॥

१२१ केली कीर्ती अलोलिक। फुटली हाक त्रैलोक्यीं ॥ १ ॥ दोषी दुराचारी जन। केले पावन दर्शनें ॥ २ ॥ नामासाठीं मुक्ती फुका। हाही नेटका बडिवार ॥ ३ ॥ निळा म्हणे यात्रेसी येती। ते ते होती कृतार्थ ॥ ४ ॥

१२२ पुंडलीक म्हणे हरी। राहे वरिविटे उभा ॥ १ ॥ अवलोकिन वेळोवेळां। श्रीमुख डोळां रूप तुझें ॥ २ ॥ अलभ्य लाभ लक्ष कोटी। झाले भेटी दिली तुम्हीं ॥ ३ ॥ निळा म्हणे मग पुंडलीक। करी पूर्वक विधी पूजा ॥ ५ ॥

१२३ प्रवेश राउळाभीतरीं। केला संतमुनीश्वरी ॥ १ ॥ तंव तो घननीळ सांवळा। उभा विटेवरी देखिला ॥ २ ॥ कांसे मिरवे पीतांबर। विराजित कटीं कर ॥ ३ ॥ मुख सुहास्य चांगलें। केशर निढळीं रेखिलें ॥ ४ ॥ अंग प्रत्यंगीं भूषणें। दिव्यमाळा करकंकणें ॥ ५ ॥ निळा म्हणे संतभेटी। उतावेळ घाली मिठी ॥ ६ ॥

१२४ भेटी गेला पुंडलीका। हे सनकादिकां जाणवलें ॥ १ ॥ मग ते धावोनि आले। उभयतां भेटले देवभक्तां ॥ २ ॥ करूनियां पूजाविधी

लागती पदीं स्वानंदें ॥ ३ ॥ निळा म्हणे मंत्रांजुळी । वोपिती निढळीं दिव्य सुमनें ॥ ५ ॥

१२५ बिजापोटीं महा तरु । होता फांकला तो थोरु ॥ १ ॥ सविताबिंब दिसे सान । प्रकाशिलें त्रिभुवन ॥ २ ॥ तेवीं विठ्ठल विटेवरी । भासे परि तो चराचरीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जीवन जीवा । प्राण प्राण्यांचा आघवा ॥ ४ ॥

१२६ दर्शन याचें आदरें घेतां । ओपी सायुज्यता मुक्तीतें ॥ १ ॥ न मानी कोणा सान थोर । दाता उदार जगदानी ॥ २ ॥ शरणांगताचा आदरी । वैषम्य अंतरीं असेचिना ॥ ३ ॥ निळा म्हणे भावचि गांठीं । देखतां साटी करूं धांवे ॥ ४ ॥

१२७ गुण लावण्याची खाणी । विठोजी मुगुटमणी सकळांचा ॥ १॥ जाणे अंतरींचा भाव । देवादिदेव पूजनीय ॥ २ ॥ ब्रह्मादिक लागती पायीं । सुरपती तोहि आज्ञांकित ॥ ३ ॥ निळा म्हणे लागला भाग्यें । हातीं अनुरागें गीतीं गात। ॥ ४ ॥

१२८ तेथेंचि बैसलें । मन नुठी कांहीं केलें ॥ १ ॥ विटेवरी विराजती । चरण तेचि आठवती ॥ २ ॥ कटीं कर तुळसीमाळा । ध्यानीं बैसला तो डोळां ॥ ३ ॥ निळा म्हणे भूकतहान । गेली विसरोनियां मन ॥ ४ ॥

१२९ गुण लावण्य संपत्ती । पांडुरंग बाळमूर्ती ॥ सर्व सुखाची विश्रांती । चरणीं लोळती महा सिद्धी ॥ १ ॥ विटे पाउलें समान । कांसे क्षीराब्धी परिधान ॥ हात कटावरी ठेवून । तुळशीसुमन वनमाळा ॥ २ ॥ कटी मेखळा कटसूत्र । उदर नाभी ते पवित्र ॥ सांठवले बीजमात्र । नाना लोकरचनेचे ॥ ३ ॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । पदक एका कळीं भूषण । मुख नासीक लोचन । निढळीं चंदन कस्तुरिक ॥ ४ ॥ मुगुटीं सूर्यप्रभा झळाळ । श्रवणीं कुंडलाचे ढाळ । मैत्रीं करुणेचे कल्लोळ । निववीत भक्तजनां ॥ ५ ॥ गरुड हनुमंत सन्मुख । मुख्य सेवेचे सेवक ॥ विराजला पुंडलीक । चंद्रभागावाळुवंटीं ॥ ६ ॥ निळा उभा कर जोडून । चरणावरी ठेउनियां मन ॥ तयासी तृप्तीचें भोजन । नामसंजीवनी दिधली ॥ ७ ॥

१३० गाय वत्सा देखतां दृष्टी । मोहें उठी पान्हा ये ॥ १ ॥ चाटी तया देउनी घणी । भरी दुधाणी इतरांची ॥ २ ॥ तैसाचि हा पंढरिनाथ । करी सनाथ निजवत्सा ॥ ३ ॥ निळा म्हणे दासासंगें । तारी जगें त्रिविध ॥ ४ ॥

१३१ ज्याचे मोक्षा मोक्षत्व देणें । मुक्तीसी स्थापणें मुक्तत्वीं ॥ १ ॥ तो हा जगज्जनक मुरारी । उभा भीमातीरीं पंढरिये ॥ २ ॥ जेणें शांतिसी शांतीपद । दिधला आनंद आनंदा ॥ ३ ॥ निळा म्हणे जेणें वेद । केला प्रबुद्ध पढवूनी ॥ ४ ॥

१३२ देखतांचि विटेवरी । समान पाउलें साजिरीं ॥ १ ॥ माझें लांचावलें मन । नुठी बैसलें वरून ॥ २ ॥ न सुटे मुंगियेसी गूळ । जेवीं भ्रमरा आमोद कमळ ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसें झालें । मक्षिकें मोहळें गोंविलें ॥ ४ ॥

१३३ ज्याची आस करिती लोक । देव सकळिक आणि ऋषी ॥ १ ॥ तो हा येउनी इटे उभा । राहिला लोभा भक्तीचिया ॥ २ ॥ नित्य काळ सिद्ध मुनी । ज्यातें चिंतनीं चिंतिती ॥ ३ ॥ निळा म्हणे वैष्णव गाती । ज्यातें वर्णिती वेदशास्त्रें ॥ ४ ॥

१३४ देखतांचि ठसावलें । रूप हृदयीं हें चांगलें ॥ १ ॥ विठो लावण्याची कळा । मूर्ति मदनाचा पुतळा ॥ २ ॥ साळंकार उत्तम लेणीं । विराजलीं बरवेपणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे तनुमनदिठी । विगुंतली ते वरुनी नुठी ॥ ४ ॥

१३५ जडित मुद्रिका बाहुभूषणं । करीं कंकणें सुशोभितें ॥ १ ॥ पितांबरें घातली कास । हेमरत्नास जिंकीयलें ॥ २ ॥ उभा ठेउनी कटावरी हात । दृष्टी न्याहाळित पुंडलिक॥३॥ निळा म्हणे हरिघनसांवळा। कमळमाळा डोलती ॥ ४ ॥

१३६ चौदा भुवनें पोटीं । सकळ तीर्थें ज्या अंगुष्ठीं ॥ १ ॥ तो हा देखियेला डोळां । विठो घननीळसांवळा ॥ २ ॥ जों जों दिसे दृश्याकार । तों तों जयाचा विस्तार ॥ ३ ॥ निळा म्हणे उत्पन्न होती । जीवें जेथें लया जाती ॥ ४ ॥

१३७ जेणें रचियेले भूगोळा । एकवीस स्वर्गे लावुनी माळा ॥ १ ॥ तो हा विटे उभा ठेला । भक्तपुंडलिकें पूजिला ॥ २ ॥ ज्याचे चरणीं-हूनि गंगा । उद्धरीत चाले जगा ॥ ३ ॥ निळा म्हणे गतिमति । माझी आहे ज्याचे हातीं ॥ ४ ॥

१३८ गोविलें इंद्रियां । पाय दिठी दावूनियां ॥ १ ॥ ऐसा लाघवी नाटकी । चोर चैतन्य चेटकी ॥ २ ॥ गुणीं गुणाचा वोतला । रूपाकृती उभा ठेला ॥ ३ ॥ निळा म्हणे पुंडलीकें । आणिला भुलवावया लोकें ४

१३९ देखतांचि विठ्ठलमूर्ति । झाली विश्रांति इंद्रियां ॥ १ ॥ डोळे मुख निवाले कान । देतां आलिंगन हृदयें भुजा ॥ २ ॥ पाणी पाद टाळि-या नृत्यें । वाणी त्रिसत्य कीर्तनें ॥ ३ ॥ निळा म्हणे जीवही धाला । सकळां फावला सुरवाड ॥ ४ ॥

१४० चरणीं भागिरथी गंगा । जन्मली उद्धरी ते जगा ॥ १ ॥ ब्रिदावळी रुळती भार । तळीं लोळती असुर ॥ २ ॥ ध्वज वज्रांकित चिन्हें । विटेवरी ते समानें ॥ ३ ॥ निळा म्हणे हृदयीं धरिलें । सनका-दिकीं पोटाळिलें ॥ ४ ॥

१४१ गुणवर्णितां भागला शेष । महिमा विशेष न कळे तो ॥ १ ॥ वेदुहि ठकोनि ठेले मौन । पार नेणोन स्वरूपाचा ॥ २ ॥ पुराणेंहि कुं-ठित झालीं । अपार खोली नेणवे ते ॥ ३ ॥ निळा म्हणे तोचि हा येथें । आणिला समर्थे पुंडलिकें ॥ ४ ॥

१४२ दर्शना धांवोनियां जे येती । तयां मुक्ति वोळंगती॥ १ ॥ ऐसें जोडूनि ठेविलें । युगायुगीं उभें केलें ॥ २ ॥ हृत्कमळीं ब्रह्मादिक । ज्या-तें पूजिती सनकादिक ॥ ३ ॥ निळा म्हणे कीर्तिघोष । न संडे त्रैलोक्यीं उल्हास ॥ ४॥

१४३ घोकउनी वेदा । जेणें आणियेले बोधा ॥ १ ॥ तो हा पंढरपुर-निवासी । नित्य उभा भक्तांपासीं ॥ २ ॥ सूर्यां अंगीं कांती । ज्याच्या प्रकाशाची दीप्ती ॥३ ॥ निळा म्हणे दिलें । चंद्रासी अमृतेंचि भरिलें ॥४॥

१४४ मुसावलें मुसें । प्रेम भक्तांचें वोरसे ॥ १ ॥ धरूनियां विठ्ठ-लरूप । विटे ठाकलें चिद्रूप ॥ २ ॥ सांवळें सुंदर । कसूनियां पीतांबर ॥ ३ ॥ निळा म्हणे पदकें गळां । वैजयंती सुमनमाळा ॥ ४ ॥

१४५ तिहीं लोका जें दुर्लभ । होतें निक्षेपिलें स्वयंभ ॥ १ ॥ वेदराय सनकादिकीं । पोटाळूनियां एकाएकीं ॥ २ ॥ तेंचि मुळींचें भांडवल । नांव पावलें विठ्ठल ॥ ३ ॥ निळा म्हणे विटेवरी । ठेविलें पुंडलिकें तें द्वारीं ॥ ४ ॥

१४६ म्हणती ज्यातें परात्पर । तो हा उभा कटीं कर ॥ १ ॥ रूपें गोजिरा सगुण । अवलोकितां निवे मन ॥ २ ॥ मुगुट कुंडलें मेखळा । कांसे मिरवे सोनसळा ॥ ३ ॥ निळा म्हणे संतभेटी । उतावेळ सदा पोटीं ॥ ४ ॥

१४७ देखिलीं तीं विटेवरी । समान पाउलें गोजिरीं ॥ १ ॥ माझे राहिलीं मानसीं । सर्वकाळ अहर्निशीं ॥ २ ॥ मुनिजनांचीं मानसें । रंगलीं जेथें सावकाशें ॥ ३ ॥ निळा म्हणे योगीजन । ज्यातें बैसले पोटाळून ॥ ४ ॥

१४८ ज्याचें करूनियां चिंतन । संत चरणीं होती लीन ॥ १ ॥ तो हा चंद्रभागे तीरीं । ठेऊनी हात कटावरी ॥ २ ॥ उभा राहिला तिष्ठत । वाट भक्तांची पहात ॥ ३ ॥ निळा म्हणे मुनिजनां । ज्याची नित्य उपासना ॥ ४ ॥

१४९ नाना मत मतांतरें । वेद सुस्वरें स्ताविती ज्या ॥ १ ॥ तो हा येउनी पंढरीसी । भक्तांपाशीं तिष्ठतु ॥ २ ॥ जयालागीं आराधनें योगयागांचीं साधनें ॥ ३ ॥ निळा म्हणे कथा कीर्ति । जया रुचे सत्संगती ॥ ४ ॥

१५० नाना अवतार धरिले जेणें । दैत्यांसी उणें आणियेलें ॥ १ ॥ तो हा संताचिये भारीं । उभा तीरीं चंद्रभागे ॥ २ ॥ तुळशीपत्र बुका मागे । धन वित्त नलगे म्हणतसे ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतरींचा । भाव साचा ओळखे ॥ ४ ॥

१५१ नाना तर्के विचार केला । शरवीं राहिला नेणवेचि ॥ १ ॥ तें हें निर्गुण निराभास । झालें रूपस विटेवरी ॥ २ ॥ वेद पुराणें नानाशास्त्रें शिणलीं वक्त्रें वानितां ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तासाठीं । उभा कर कटीं राहिला ॥ ४ ॥

१५२ जें जें करिसी तें तें वृथा । पंढरिनाथा न भजतां ॥ १ ॥ दिसे

पुढें पर्री तें माया । जाइल विलया क्षणमात्रें ॥ १ ॥ पुत्र पत्नी बंधु पशु । भासे अभासु परि मिथ्या ॥ ३ ॥ निळा म्हणे वित्त गोत । नेणसी नाशवंत हें सकळ ॥ ४ ॥

१९३ जेणें आणियेलीं क्षिती । रसातळींहुनी वरुती ॥ १ ॥ तो हा उभा कृपावंत । ठेवुनि कटांवरी हात ॥ २ ॥ ज्याचे नाभींकमळींहून । जन्म पावे चतुरानन ॥ ३ ॥ निळा म्हणे कमळा नारी । ज्याचे चरणीं वास करी ॥ ४ ॥

१९४ नित्य निरामय सागरीं । मथन करुनी विचारशूरीं ॥ १ ॥ काढिला नवनीताचा गोळा । तो हा विटेवरी सांवळा ॥ २ ॥ जया तया लागे गोड । हरी क्षुधा अवघी चाड ॥ ३ ॥ निळा म्हणे दैवें हातीं । लागला जिहीं गाइला गीतीं ॥ ४ ॥

१९५ निरोप मागावया संत । आले राउळा समस्त ॥ १ ॥ चरणीं ठेऊनियां माथा । विनविती पंढरीनाथा ॥ २ ॥ म्हणती कृपा असों द्यावी । उपेक्षा आमची न करावी ॥ ३ ॥ निळा म्हणे पंढरीनाथा । वियोग न साहे सर्वथा ॥ ४ ॥

१९६ नेऊनियां बळी । जेणें घातला पाताळीं ॥ १ ॥ तो हा देवांचाही देवो । विटे उभा ठेवुनी पावो ॥ २ ॥ शेषाचे शयनीं । होता निद्रित अनुदिनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे करी । मंथन क्षीराचे सागरीं ॥ ४ ॥

१९७ निर्गुण निरामय संचलें । गुणातीत रूपा आलें । परात्पर ते सगुण झालें । उभें ठाकलें विटेवरी ॥ १ ॥ कोटी कंदर्पांच्या दीप्ति । विराजली अंगकांति । गुणलावण्याची संपत्ती । विठ्ठलमूर्ति गोजिरी ॥ २ ॥ पहातांचि प्रवेशे अंतरीं । मनीं मनातें मोहरी ॥ चित्तीं चैतन्यातें भारी । देहभावा उरी उरों नेदी ॥ ३ ॥ जीवाचें हरूनियां जीवपण । नेदी उरों मीतूंपण ॥ वंदितांचि याचे चरण । करी बोळवण अहंकारा ॥ ४ ॥ निळा म्हणे भक्तपती । आला पुंडलिकाचिये आर्ती ॥ अवघीं जाणतीं नेणतीं । केलीं सरतीं पायांपे ॥५ ॥

१९८ पूजूनियां पुंडलिकें । चरण अवलोकिलें निके ॥ १ ॥ तोहिं जाणतो महिमान । हृदयीं कवळिलें म्हणवून ॥ २ ॥ शेष जाणे शयन

झाला । पद्में उमटलीं तो शोभला ॥ ३ ॥ निळा म्हणे कुरवाळितां । कमळा पावली अर्धांगता ॥ ४ ॥

१५९ कणाचि आले हे घनदाट। कणिसें ताट नाढळे॥१॥लुंगी भुस नाहीं कोंडा। पीक ब्रह्मांडा न समाये ॥ २ ॥ सनकादिकां आणि देवां । पुरेसें मानवा प्राणिमात्रा ॥ ३ ॥ निळा म्हणे तिहीं लोकां । केला पुंडलिकें सुकाळ ॥ ४ ॥

१६० पाडुरंगा न पाहती । ज्ञान गाडेवर बोलती ॥ १ ॥ त्यांचे न व्हावें दर्शन । देवा दूषिती म्हणऊन ॥ २ ॥ नायकावे त्यांचे बोल। विठ्ठल कृपेंविण फोल ॥ ४ ॥ निळा म्हणें करिती कथा । अवघी पोकळ त्यांची वृथा ॥ ४ ॥

१६१ भवसिंधु तरावया । भजावें राया पंढरीच्या ॥ १ ॥ करील तोचि तरणोपावो । दाविल ठावो निजाचा ॥ २ ॥ जेथें वाजतां नलगे वारा । दिशा अंबरा शिवों नेदी ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसिये घरीं । निजविली वोवरीं पर्यंकीं ॥ ४ ॥

१६२ मुगुट कुंडलें वनमाळा । केशर कस्तुरीचा टिळा ॥ १ ॥ विठो देखिला म्यां दिठीं । अंगीं चंदनाची उटी ॥ २ ॥ जाडित कंकणें मुद्रिका । कासे पितांबर नेटका ॥ ३ ॥ कटीं मेखळा विराजे । वाकी किंकणी तोडर गाजे ॥ ४ ॥ मुख लावण्याची खाणी । जैसा चंद्र पूर्णपणीं ॥ ५ ॥ निळा म्हणे कटीं कर । अंगकांति मनोहर ॥ ६ ॥

१६३ माथां मोरपिसें कुंडलें गोमटीं । कस्तुरी ललाटीं रेखिली दिसे ॥ १ ॥ हृदयीं निकेतन श्रीवत्सलांछन । मूर्ती विराजमान शंख चक्र ॥ २ ॥ कटावरी कर उभा विटेवरी । भोंवताले फेरी संतजन ॥ ३ ॥ निळा म्हणे तेंचि कळासलें मनीं । देखिलें लोचनीं ध्यान जैसें ॥ ४ ॥

१६४ अष्टहि दिग्गज आणि दिक्पाळ । थावरिले कुळाचळ निज सत्ता ॥ १ ॥ तो हा परमात्मा श्रीहरी । येउनी इटेवरी ठाकला ॥ २ ॥ जेणें सागर सप्तामृतीं । भरिले उचंबळती सर्वदा ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्याचेनी रवी । नित्य नवा मिरवी प्रकाश ॥ ४ ॥

१६५ मिरवी अंगीं आवतार लेणीं । विराजित कीर्ति भूषणीं । मुगुट कुंडलें कोटी तरणीं । तैसें तेज बंबाळ ॥ १ ॥ कंठीं शोभला कौस्तुभमणि। पदकीं चरित्र रत्नाच्या खेवणी । बाहुभूषणें दिव्याभरणीं । जडित कंकणें सुशोभित ॥ २ ॥ भक्तस्तवनाच्या सुमनमाळा । वेदमर्यादा कटीं मेखळा । शास्त्रें वसनें सोनसळा ।पुराणें ठसे उमटले ॥ ३ ॥ शंख चक्र पद्म गदा । शोभल्या भुजा त्या सायुधा । असुरमर्दनीं झळकती सदा । मोक्षदानी वैरियां ॥ ४ संतसनकादिक उदरवासी । भरला आनंद सावकासीं । नाभिकमळीं प्रजापतीसि । ठाव दिधला अखंड ॥ ५ ॥ लक्ष्मी अर्धांगी विराजली । चरण सेवितां निमग्न झाली । तोडर दानवांच्या शिसाळीं । वामचरणीं रुळतसे ॥ ६ ॥ गंगा वामांगुष्ठिहुनी । जन्मली उद्धरावया अवनी । महादोषांची करीत धुनीं। चालिली पुर्व समुद्रा ॥ ७ ॥ सकळ देवांचे समुदाये । सिद्धही येती वंदितों पाये । नारद कीर्तनीं उभा ठाये । नृत्य करी स्वानंदें ॥ ८ ॥ निळा म्हणे उदार ऐसा । भक्त चकोरा चंद्रमा जैसा । पुंडलिकाच्या भावासरिसा । विटे उभा ठाकला ॥ ९ ॥

१६६. अरुपी रूपाचा विस्तार । अगुणीं गुणांचा शृंगार । अनामीं नामाचा बडिवार ।सहस्त्रावरी विराजला ॥ १ ॥ नाहीं अवतारा मर्यादा। अपार गुणांची संपदा । केलीं चरित्रें सच्चिदानंदा । कोण वर्णिता पुरेल ॥ २ ॥ वृद्ध तरुण नव्हसी मुग्ध । सूक्ष्म स्थूळ ना अगाध । तरंग सागरिचे बुदंबुद । नाहीं गणना त्यां जैशी ॥ ३ ॥ अनंतरूपा मधुसूदना । जगत्रयव्यापका जनार्दना । योगिमानसमनोरंजना । अहो निधाना सुखमूर्ती ॥ ४ ॥ मुख मंडित सुदंर कर । कटीं विराजले सकुमार । चरणीं ब्रीदाचा तोडर । रुळती असुर तया तळीं ॥ ५ ॥ संत गर्जती स्वानंदें । कीर्तन करिती ब्रह्मानंदें । नित्य करिती नाना छंदें । पढती ब्रिदें सुस्वरें ॥ ६ ॥ निळा म्हणे तया सुखा । नाहीं पार नव्हे लेखा । समाधि लागे सनकादिकां । तो सोहळा देखोनी ॥ ७ ॥

१६७ ध्यानतेः राहिलें मानसीं । सर्वकाळ दिवानिशीं ॥ १ ॥ जेणें धरिलें कटीं कर । रूपें सांवळा सुकुमार ॥ २ ॥ न पुरे डोळियांची

घणी । कीर्ति ऐकतांहि श्रवणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे लोचावली । वृत्ति तेथेंचि गुंतली ॥ ४ ॥

१६८ अर्चूनियां पुंडलिका । विश्वव्यापका राहविलें ॥१॥ थोर उपकार केला लोकां । भक्तां भाविकां तारियलें ॥ २ ॥ आणूनियां वैकुंठवासी । सुगुण रूपेंसी भेटाविला ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मादिक । देवही सकळिक मानवलें ॥ ४ ॥

१६९ तापत्रयाचेंहि हरण । ते हे गोजिरे श्रीचरण ॥ ॥ आले पुंडलिकाचिये भेटी । ठेले विटेच्या नेहटीं ॥ २ ॥ सकळहि सामुद्रिका ओंळी । शोभती उभय पादतळीं ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्यातें ध्याती । देवत्रयादि ऋषीपंगती ॥ ४ ॥

१७० तमाळशाम रूप मंडित । कटीं मिरवत करांबुजें ॥ १ ॥ पाहतां घणी न पुरे मना । न संडे नयना निजानंद ॥ २ ॥ सर्वहि भूषणें सर्वांगभरी । मनोहरी सुशोभित ॥ ३ ॥ निळा म्हणे रुक्मिणी वामीं । त्रैलोक्यस्वामी श्रीविठ्ठल ॥ ४ ॥

१७१ टाळ विणे मृदंगेसीं । येती गजरेंसी मिरवत ॥ १ ॥ छबिने पताका गरुडटके । घेउनी हरिखें अवलोकिती ॥ २ ॥ म्हणती जन्म सुफळ झाला । आजीं देखिला परात्पर ॥ ३ ॥ निळा म्हणे विठ्ठल हरी । लेवुनी अंतरीं सुखावती ॥ ४ ॥

## हरीचें वर्णन

१७२ अहो कृपेच्या सागरा । अहो भक्त करुणाकरा । भुक्तीमुक्तीच्या दातारा । जगदोद्धारा विठोजी ॥ १ ॥ अहो त्रिविक्रमा वामना । रामा कृष्णा मधुसूदना ॥ दशरथात्मजा रघुनंदना । दानवदमना मुरारि ॥ २ ॥ अहो चतुरामाजी सुजाणा । अहो अच्युता नारायणा । अहो राधारुक्मिणि-रमणा । दिनोद्धारणा गोविंदा ॥ ३ ॥ अहोजी वैकुंठनायका । विश्वचरा-चरपालका । अनंत ब्रह्मांड व्यापका । यदुकुळटिळका श्रीहरी ॥ ४ ॥ अहो केशवा माधवा । जनार्दना श्रीवासुदेवा । मुकुंदा दामोदरा यादवा । भक्तजनभावा लक्षीत्या ॥ ५ ॥ अहो नृसिंहा श्रीधरा । मच्छ कूर्म वराह ऋषीकुमरा ॥ अहो परात्परा अति सुंदरा । श्रीरमावरा गुणनिधी ॥ ६ ॥ अहो पद्मनाभा शेषशयना । राजसा राजीवलोचना । निळा म्हणे सुख-संपन्ना । अहो निजनिधाना परमात्मया ॥ ७ ॥

१७३ अहो देवा तिमिरनाशा । बुद्धीप्रकाशा विठ्ठला ॥ १ ॥ अनुग्रह तुमचा झाला जया । निरसला माया तम त्याचा ॥ २ ॥ असोनियां ते घरीदारीं । मुक्तचि संसारीं संगातीत ॥ ३ ॥ निळा म्हणे नित्यानंदें । भोगिती ते पदें वैकुंठिचीं ॥ ४ ॥

१७४ अवघे टाळुनी निमित्त । वरुनी बोलत आपण ॥ १ ऐसी करितो हरि लाघवें । सर्वांहि ठावें सर्वज्ञा ॥ २ ॥ बुद्धि बुद्धीचा हा जनिता । स्फुर्ति प्रसविता स्फुर्तीचा ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुल्या गोडी । तया आवडी स्तवनाची ॥ ४ ॥

१७५ अयोध्येसी जन्मले राम । पुरुषोत्तम मथुरेसी ॥ १ ॥ आनंद झाला दशरथाघरीं । गोकुळामाझारीं तैसाचि ॥ २ ॥ ऋषीयज्ञ सिद्धी नेला । कृष्णें आणिला गुरुपुत्र ॥ ३ ॥ निळा म्हणे वरिली सीता । येणें दुहिता भीमकाची ॥ ४ ॥

१७६ आणिखिही याचीं उदंड वर्मे । बोलतांचि ते नर्मे आमुचीं कर्मे

॥ १ ॥ म्हणोनियां याचें भयाचि वाटे । बोलों जाय तंव बोलणेंचि कुंठे ॥ २ ॥ वेदहि ना बोलेचि भेउनी याला । देखोनि यातें मग मौन्येंचि ठेला ॥ ३ ॥ कळहि कांपे याचिया धाके । त्यासिहि गिळुनी आपणचि ठके ॥ ४ ॥ ना बोलती योगी याचिया भेणें । ध्यानींचि बैसले बसवूनी रानें ॥ ५ ॥ संतहि याची न करित गोठी । धरूनी राहिले उगलेचि पोटीं ॥ ६ ॥ अणुमात्र याची बोलतांचि कर्मे । मरणासिचि मारुनि हरि तो जन्में ॥ ७ ॥ धीटपणें निळा बोलिला कांहीं । बोलतांचि लाविला आपुला वाही ॥ ८ ॥

१७७ आप आपणा नेणता । निर्मी ब्रम्हांडाच्या चळथा ॥ १ ॥ काय सांगों नवलपरी । ऐसी याची आकळ चोरी ॥ २ ॥ असे आपण निराकार । प्रकटोनि दावी जगदाकार ॥ ३ ॥ निळा म्हणे महर्षि देवा । न कळती ऐशा याच्या मावा ॥ ४ ॥

१७८ उणें परे बोलिलों आधीं । तें आपुलिये बुद्धि सारिखें ॥ १ ॥ तुम्ही तो देवा कृपामूर्ती । सकळां आर्ति पुरवितां ॥ २ ॥ पशुपक्षी सांभाळिले । स्मरतां नेले निजधामा ॥ ३ ॥ निळा म्हणे तुमच्या घरीं । वाढे थोरी दासाची ॥ ४ ॥

१७९ उगाचि नसे क्षणही भरि । व्यभिचारी हरि चित्ताचा ॥ १ ॥ मनचि गोवी चरणापाशीं । अवघेचि यासी मग मुक्त ॥ २ ॥ धरिचे घरीं जीवींचे जीवीं । उघडि हा ठेवी जुगादीच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे धरिली खोडी । मुळींची न सोडी कल्पवरि ॥ ४ ॥

१८० एकपणाचा घेउनि त्रास । नेंदीच दुसऱ्यास आड येऊं ॥ १ ॥ ऐसा मुळींचाचि चोरटा हरि । चोरिचिवरी मन याचें ॥ २ ॥ पंचामृतें पांचहि विषयें । चाटुनियां जाय बरावरी ॥ ३ ॥ निळा म्हणे याचे शोधितांहि मार्ग । न लगेचि अनंग हातींचि हा ॥ ४ ॥

१८१ एक एकाहुनी आगळे । ओविले संत कंठमाळे ॥ १ ॥ नेणों विराजलेती हरि । प्रभा फांकली दिगांतवरी ॥ २ ॥ संत चरित्रें सुंदरें । परिधान केलीं दिव्यांबरें ॥ ३ ॥ संतनामें निळा म्हणे । मुगुट कुंडलें करकंकणें ॥ ४ ॥

१८२ एका पासुनियां हरी । घाली आणिका पदरीं ॥ १ ॥ ऐसे खेळ याचे निके । खेळे आलके हेलके ॥ २ ॥ रडवी हासवी एका । दाऊनि लपवी पाडी चुका ॥ ३ ॥ निळा म्हणे खेळा । नाहीं रूप याच्या ताळा ॥ ४ ॥

१८३ ऐसा आपी आपरूप । करूनि त्रैलोक्या साटोप ॥ १ ॥ नाहीं वेंचला उणा झाला । जैसा तैसाचि संचला ॥ २ ॥ दाउनीयां चराचर । लपवी अंगीं न मानी भार ॥ ३ ॥ निळा म्हणे नट लाघवी । नेदी कळो ठेवाठेवी ॥ ४ ॥

१८४ ऐसे याचे आकळ खेळ । जाणतां पांगुळ वेदश्रुती ॥ १ ॥ काय फोडुनि चांदिश्या केल्या । गगनीं बांधल्या कीं हुक्त ॥ २ ॥ कासयाचे पर्वत धोंडे । घडिले अपाडे अमर्यद ॥ ३ ॥ निळा म्हणे पर्जन्य धारा । केल्या अपारा त्या कैशा ॥ ४ ॥

१८५ अंतरींचा जाणे भेद । प्रगटी आनंद त्या तैसा ॥ १ ॥ देव म झा चतुर ऐसा । जैसा तैसा क्षणमात्रे ॥ २ ॥ भाविकांचे आंगींचि लोळे । शहाण्या नदळे अभाविकां ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणे परी । सर्वांतरीं साक्षी हा ॥ ४॥

१८६ कांहींचि सदैव दुबळे । न म्हणे हा बाळे नारीनर ॥ १ ॥ जया परी तैसा होय । बापमाय सकळांचा ॥ २ ॥ शरणांगताचिया नावें पशुहि उध्दरावे पाक्षिया ॥ ३ ॥ निळा म्हणे जीव जीवा । वंद्य हा देवा मानवांसीं ॥ ४ ॥

१८७ काळ्यासर्प गजेंद्रनाग । जटायु पतंग उद्धरिला ॥ १ ॥ कुब्जादासी गणिकावेश्या । व्याधहि मांसाहारि तो ॥ २ ॥ भिल्ल पापी अजामेळ दोषी । पूतना राक्षसी उद्धरिली ॥ ३ ॥ निळा म्हणे तुमचा ऐसा । कीर्तीचा ठसा तिहीं लोकीं ॥ ४ ॥

१८८ कासियाचीं बीजे घडलीं । लावणी केली वृक्ष तृणा ॥ १ ॥ नेणवे महिमा तुमचा देवा । देवा मानावा दानवासी ॥ २ ॥ काय मर्दुनी घातले बहळ । नाना परिमळ पुष्पयाति ॥ ३ ॥ निळा म्हणे नानापरिचे । घोष तरुचे फळें पर्णें ॥ ४ ॥

१८९ कैसेनि आकळतें मन। देवावीण भक्ताचें ॥ १ ॥ काम क्रोध लो-
भा शांती ॥ कैसेनि होती मग त्याची ॥ २ ॥ काळदंड चुकविता । कोण
होता देवावीण ॥ ३ ॥ निळा म्हणे मोकळा भक्ता । करूनी ठेविती
कोण पदीं ॥ ४ ॥

१९० कैसी वानूं त्याची थोरी । ज्याची चराचरीं जीवनकळा ॥ १ ॥
आदिकरूनी ब्रह्मादिक । शेवटील कीटक धरुनियां ॥ २ ॥ चंद्र सूर्य ता-
रांगणा । दीप्ति हुताशना ज्याचेनी ॥ ३ ॥ निळा म्हणे महिमा ज्याचा ।
वर्णितां वाचा वेद मुके ॥ ४ ॥

१९१ कोण करितें समाधान । देवावीण भक्ताचें ॥ १ ॥ ब्रह्मसनातन
पाववितां । कोण या होता भक्तासी ॥ २ ॥ नाना कल्पनेची व्यसनें ।
तोडितें बंधनें कोण सांगा ॥ ३ ॥ निळा म्हणे जन्मजरा । यातना अघो-
रा न चुकत्या ॥ ४ ॥

१९२ कृपाळु भक्तांचा कैवारी । क्रोध दैत्यांदनावांवरी ॥ एका तारी
एका मारी । एका उद्धरी नाममात्रें ॥ १ ॥ एका घरीं एका दारीं ।
एका हृदयीं एका परवरी ॥ एका धुंडितां अष्टही प्रहरीं । न संपडे मा-
झारी त्रैलोक्या ॥ २ ॥ एकापत्नीव्रत दशरथा घरीं । रेणुकानंदन हा ब्र-
ह्मचारी ॥ मुंजिया बटु बळिच्या द्वारीं । महा व्यभिचारी नंदाचा ॥ ३ ॥
मोहनी रूपें सुंदोपसुंद । मोहुनी परस्परें करवीला वध ॥ वृंदेसी करुनियां
शकट भेद । वधिला जालंधर रणरंगीं ॥ ४ ॥ मत्स्यें केला शंखोद्धार । कूर्में
घेतला धराभार । वराहें हिरण्याक्ष असुर । मर्दुनी धरा धरिली निजदंतीं ॥ ५ ॥
नृसिंहें हिरण्यकश्यप विदारिला । वामनें बळी पाताळीं घातला ॥ परशुरामें
सहस्त्रार्जुन वधिला । पृथ्वीचा केला दान धर्म ॥ ६ ॥ रामें रावणाचें म-
र्दन । केलें देवांचें बंदीमोचन ॥ कृष्णें काळयवना जाळून । कंस चाणूर
निवटिले ॥ ७ ॥ बौध्यें मोडविला दैत्ययज्ञ । वेदनिंदा निजमुखें करून ।
कलंकिया म्लेंछांचें निकंदन । पुढील कार्यार्थ हा असे ॥ ८ ॥ ऐसें अ-
वतार घेउनीं हरि । भूभार हरिलें नानापरी ॥ आपुलिया दासाचें रक्षण
करी । संत चराचरीं गर्जती ॥ ९ ॥ चतुराननरूपें सृष्टीचें सृजन । विष्णु-

रूपें प्रतिपाळण ॥ इंद्ररूपें परम क्षोभोन । करील संहार सकळांचा ॥ १० ॥ शंभु त्रिपुरातें संहारी । गजासुराचा मस्तक उतरी । गणेशरूपें नृत्याच्या गजरीं । एका दैत्या चुरी पदघातें ॥ ११ ॥ ऐसीं हे चरित्रें श्रवण करिता । ठावो नुरेचि दोषा दुरिता ॥ ब्रह्मानंदें श्रोता वक्ता मुक्ति सायोज्यता पावती ॥ १२ ॥ नानारूपें नाना नामें । नाना अवतार नाना कर्में ॥ धर्म रक्षिले ते सुखसंभ्रमें । निळा सप्रेमें गर्जत ॥ १३ ॥

१९३ खग मृग राक्षस वानर । दैत्य दानव निशाचर । सिद्धा चारण विद्याधर । नागविखार कीटकादी ॥ १ ॥ चतुष्पदें जळचरें मनुष्ययाती दासी वेश्या भिल्लिणीं किती ॥ कोळी अंत्यज अधम जाती । उद्धारिले श्रीपती सत्संगें ॥ २ ॥ न विचारितां कुळयाती । धर्माधर्म त्यांचीं रीती । शरण येतांचि ते निश्चिती । निजधामाप्रती पाठविले ॥ ३ ॥ न म्हणोनी नरनारी बाळकें । उत्तम अधम कनिष्ट लोकें ॥ नामेंचि पाचारितां मुखें नेले ते निजसुखें वैकुंठा ॥ ४ ॥ निळा म्हणे ब्रीदें चरणीं । वागवी म्हणवी भक्तांचा ऋणी ॥ ऐसी आख्या जे वेदीं पुराणीं । तेचि रहाटी चालवी ॥ ५ ॥

१९४ गोड नाम तुमचें देवा । गोड सेवा तुमची ते ॥ १ ॥ गोड तुमची कीर्ती वाणीं । गोड श्रवणीं ऐकतां ॥ २ ॥ गोड तुमचे रूप दृष्टी ॥ ॥ गोड पोटीं प्रेम तें ॥ ४ ॥ गोड निळा तुमचे पायीं । ॥४ ॥ गोड डोयी ठेवितां ॥ ४ ॥

१९५ गोड गोड तुमचें नाम । गोड जन्म स्मरणें त्या ॥१॥ गोड वाचा पढतां गीत । गोड चित्त चिंतनें ॥२॥ गोड ध्यानें तुमच्या मनें । गोड स्तवनें गुण वाणी ॥३॥ गोड निळा कीर्तन संगीं । गोड रंगीं नाचतां ॥ ४ ॥

१९६ गाइलेचि गातां गीतीं । पवाडे तुमचेचि श्रीपती ॥ सहसा धणी न पुरे चित्तीं । सारितां रात्रिदिवस युगें ॥ १ ॥ अनंता युगीं अनंत खेळ । अनंता नामा रुपांचे मेळ ॥ अनंत संपादिले जे निर्मळ । पढतां वचे उल्हासु ॥ २ ॥ क्षीराब्धिशयन वैकुंठवास । अमरावती सत्यलोक कैलास ॥ अष्टाहि दिक्पाळांचे वेष । भरले सावकाश निजात्मरूपें ॥ ३ ॥ मच्छ कच्छ वराह रूपें । नृसिंह वामन परशुराम प्रतापें ॥ राम कृष्ण बौध्यादि

अमूपें । मिरविलीं स्वरूपें क्षुल्लकादि ॥ ४ ॥ नाना स्वर्गें सृष्टी रचना । नाना ऋषीरूपें वसवूनी स्थाना ॥ नाना सतरूपा नारायणा । निळा विज्ञारना करी तुमची ॥ ५ ॥

१९७ घनःशाम मूर्ति राजीवलोचन । सांठवलें त्रिभुवन उदरामाजी ॥ १ ॥ कौस्तुभ पदक तुळसीमाळा कंठीं । कास हे गोमटी पीतांबरें ॥ २ ॥ लेईला अलंकार भूषणें परवडी । दिव्य रत्नें चोरखडी । खेवणें तयां ॥ ३ ॥ निळा म्हणे माझें निवालें तनुमन । देखतांचि सुप्रसन्न वदन याचें ॥ ४ ॥

१९८ जिहीं अवलोकिला डोळां ॥ हरील्या त्यांच्या जीवनकळा ॥ १ ॥ ऐसा अनादि हा बुडवणा । आहे ठावा विचक्षणा ॥ २ ॥ चित्तें वित्तें आपणा ऐसें । करूनी ठेवी निजध्यासें ॥ ३ ॥ निळा म्हणे पडिल्या गांठीं । न सोडी नष्टहा शेवटीं ॥ ४ ॥

१९९ ज्याचे जैसे भाव तैसा त्या दाविनी । स्वानुभवें बोलती आपुल्याला ॥ १ ॥ परी तो एकला सकळांसी पुरला । ज्याच्या परी झाला तैसा तेथें ॥ २ ॥ एकचि स्वातीजळ विषें मुक्ताफळ । पालटे स्थळास्थळ होय तैसें ॥ ३ ॥ निळा म्हणे गंध उपाधी निराळा । दावी पुष्पीं कळा उमलता ॥ ४ ॥

२०० जेणें मंथुनि क्षीरार्णव । काढिलीं अपूर्व दिव्य रत्नें ॥ १ ॥ त्याचा महिमा वर्णूं कैसा । भरोनी आकाशा कोंदला तो ॥ २ ॥ जेणें धरूनियां दांती । आणिली वसुमती समुद्रांतूनि ॥ ३ ॥ निळा म्हणे जेणें भानु । ठेविला उगवु न मैळेसा ॥ ४ ॥

२०१ तारुनियां प्रचंड शिळा । उतरला पाळा मकटांचा ॥ १ ॥ करुनी सिंधु पायवाटा । वधिले थाट राक्षसांचे ॥ २ ॥ गोवळवेषें कौंसादिकां । लाविल्या शिका मारिले ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मचारी । भोगोनियां नारी सोळा सहस्र ॥ ४ ॥

२०२ तुमच्या कृपामृतजळीं ॥ माझी वचनवल्ली अंकुरली । मती विस्तारें फांकली । फळ सुंभारीं हरिनामें ॥ १ ॥ नवल कृपामृतघन । वरुषला तुमचें हें वरदान । माझी वाचा आणि मन । केल्यां पावन कीर्तनें ॥ २ ॥ एकट एकलेचि श्रीपती । पुरोनि-उरलेति त्रिजगतीं । अपूर्व चरित्रें अपूर्व ख्याती ।

संत गर्जती स्वानंदें ॥ ३ ॥ शुक सनकादिक नारद। व्यास वाल्मीक आणि प्रऱ्हाद। साहि शास्त्रे चारी वेद। पुराणें पवाडे वर्णिता ॥ ४ ॥ परि तुम्हां नकळा त्याचिये मती। अपार म्हणोनियां गुणसंपत्ती। जेथिंचे तेथेंचि भक्त स्तविती। अपार म्हणती विस्तारला ॥ ५ ॥ सगुण गोकुळीं गौळियां घरीं। निर्गुण योगियां हृदयमंदिरीं। विसाळ ब्रह्मांडा बाहेरी। महर्षी देव स्तविताती ॥ ६ ॥ शिव आवुलिये हृदयभुवनां। नित्य निमग्न तुमचे ध्यानीं। भोळ्या भाविकां लागुनी। आवडी ऐसें रूप धरा ॥ ७ ॥ कामिनी भावें कांतातुर। मदनमूर्ति मनोहर। वैरसंबंधीं कंसचाणूर। तया तैसाचि ते ठायीं ॥ ८ ॥ गोवळांमाजीं गाई पाठीं। वानरांमाजीं मेळवुनी थाटी। रावण निःपातनीं परम हटी। आतुर्बळी कळिकाळा ॥ ९ ॥ नित्य नूतन तुमचे गुण। चरित्रें गाती वैष्णव जन। निळा झाला सुखसंपन्न। चरणीं मस्तक ठेवितां ॥ १० ॥

२०३ दीनबंधु आत्मयारामा। सुखविश्रामा विश्वजनका ॥ १ ॥ परात्परा पुरुषोत्तमा। आगमानिगमा जगवंद्या ॥ २ ॥ निर्विकल्पा निरंजना। सुख-निधाना गुणमूर्ती ॥ ३ ॥ अगा ये निळ्याच्या दातारा। रुक्मिणीवरा श्रीविठ्ठला ॥ ४ ॥

२०४ देवावीण भक्तांचें संकट। कोण तें अरिष्ट निवारितें ॥ १ ॥ कोणासी शरण जातें तेव्हां। कळी काळ जेव्हां आकळूं येता ॥ २ ॥ संसार जेव्हां करिता ओढी। तडातोडी भंवताली ॥ ३ ॥ निळा म्हणे तें चुकविलें। अनर्थ वारिले कृपावंतें ॥ ४ ॥

२०५ देव नसतां भक्तांचीं विघ्नें। कोण जन्ममरणें निवारितें ॥ १ ॥ कोणासी म्हणतें धावां धवां। करितां कुडावा कोण दुजा ॥ २ ॥ कोण नेता वैकुंठासी। आपुले विश्रांतीसी निज भरा ॥ ३ ॥ निळा म्हणे देवा-वीण। संसारबंधन न तुटतें.

२०६ धराल जरी चित्तीं न लगेचि तरी वेळ। आहे ती सकळ कळा हातीं ॥ १ ॥ क्षणेंचि सगुण क्षणेंचि निर्गुण। क्षणेंचि प्रसन्न होता दासा ॥ २ ॥ क्षणेंचि निर्मिले चतुर्दशलोक। देव ब्रह्मादिक चौदा

धनु ॥ ३ ॥ झकवाल तरी ठकडे देवा ब्रम्हादिकां । भेटाल तरि भाविका नव्हो वेळ ॥ ४ ॥ ऐसे संत मुनी जाणती सकळ । क्रीडा तुमचा खेळ दास तयां ॥ ५ ॥ निळा म्हणे माझें अंतरींचें आर्त । जाणतां सतत साक्ष तुम्ही ॥ ६ ॥

२०७ न कळती तुझिया मावा ॥ दैत्या देवा आणि मानवा ॥१॥ कैसें तुझें रूप नाम । कोण कूळ याति धर्म ॥२॥ जागृत आहेसी कीं निजलेला । उपवासीची कीं धाला ॥३॥ निळा म्हणे जीत कीं मेला । न वजसी कोणीही देखिला ॥ ४ ॥

२०८ नगरी नेली वैकुंठासी । किर्ती हे ऐसी अद्भुतचि ॥ १ ॥ कंस वधिला भोमासुर । महिमा अपार हा घोष ॥ २ ॥ तारुनी शिळा उद्धरि कटका । हाही नेटका पुरुषार्थ ॥ ३॥ निळा म्हणे नाथिला सर्प । भंगिला दर्प रावणाचा ॥ ४ ॥

२०९ नारायणा तुमच्या चरणीं । भुक्ति मुक्तीचिया खाणी ॥ १ ॥ मोक्ष सर्वदां तिष्ठत । चरणीं जोडूनियां हस्तक ॥ २ ॥ रिद्धी सिद्धी बोळंगती । चरणी तुमचिया श्रीपती ॥ ३ ॥ निळा म्हणे अवलोकितां । पाउलें सुकुमार सायुज्यता ॥ ४ ॥

२१० नरकासुरा वधिलें जेणें । मुरूसी मर्दुनी घेतलें ठाणें ॥ वृत्रासुराचें हरिलें जिणें । तारकासुरा प्राणहानी केली ॥ १ ॥ मधुदैत्याचें सूदन । हिरण्याक्षाचे घेतले प्राण ॥ हिरण्यकश्यपा विदारून । काळयवन दग्ध केला ॥ २ ॥ रिठासूर दाढें चाविला । अघबकासुर तो चिरीला ॥ तृणासुर सहजेंचि मर्दिला । शकट मोडिला पादघातें ॥ ३ ॥ उपटिली धेनुकासुराची शिंगें । कंस चाणूर ते वधिले रागें ॥ केशियाचीं मोडिलीं दांगें । गोकुळीं श्रीरंगें बाळपणीं ॥ ४ ॥ परशुरामें वधिला सहस्रार्जुन । एकवीस वेळां क्षत्रियांचें कंदन ॥ रामें ताटिका खरदूषण । नासीक छेदन शूर्पनखे ॥ ५ ॥ रावण कुंभकर्ण रामें मर्दिलें । कित्येक निशाचरातें आटिलें ॥ ऐसे पवाडे संपादिले । बहु वेळां उतरिले धराभार ॥ ६ ॥ निळा म्हणे ते अवतारी । भक्त रक्षुनी दैत्यां मारी ॥ ऐसिया चरित्राची हारी । [illegible] कल्पादी ॥ ७ ॥

२११ परात्परा सच्चिदानंदा । परिपूर्णा जी आनंदकंदा ॥ जगदीशा विश्ववंद्या । विश्वव्यापका अनंता ॥ १ ॥ भक्तवत्सला कृपासिंधु । तापत्रयहरणा दीनबंधु ॥ तुझ्या नामीं अगाध बोधु । भक्त पावती भाविक ॥ २ ॥ परमपुरुषा गुणातीता ॥ अव्यया अक्षरा जी अव्यक्ता ॥ विश्वमंगळा रुक्मिणी कांता । पुंडलिकवरदा पंढरीशा ॥ ३ ॥ निरंजना निर्विकारा । निर्विकल्पा जगदोद्धारा ॥ वेदवेदांतसागरा । विश्वंभरा कल्पादि ॥ ॥ ४ ॥ भावाभावविवर्जिता । सगुणनिर्गुणा गुणातीता ॥ निळयास्वामी कृपावंता । चरणीं माथा तुमचिये ॥ ५ ॥

२१२ पाचारितां यावें बोलवितां जावें । हें तों न संभवे तुम्हांपाशीं ॥ १ ॥ जेथिल तेथेंचि प्रगटाल रूपडे । आपुल्या सुरवाडें भक्तांचिया ॥ २ ॥ जाणें येणें नाहीं तुम्हां कदाकाळीं । असा भूमंडळीं व्यापूनिया ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसें जाणोनियां मनीं । कारितों अनुदिनीं स्तवन तुमचें ॥ ४ ॥

२१३ बहुतां येणें नागविलें । हरुनी स्वर्वस्वही नेलें ॥ १ ॥ करूं आतां याची गांठी । जिवीं जिवा घाली मिठी ॥ २ ॥ पाहिलाचि पुरे । उरों नेदी त्या दुसरें ॥ ३ ॥ निळा म्हणे चेटकी ऐसा । स्वभाव त्याचा सांडिल कैसा ॥ ४ ॥

२१४ भक्त आवडो ऐसें रूप । धर्म हा बाप मदनाचा ॥ १ ॥ नेदी पडो अंतर कोठें । पाहिजे नेटें त्याचि ऐसा ॥ २ ॥ एकापदें कटीकर । श्यामसुंदर विटेवरी ॥ ३ ॥ निळा म्हणे नरसिंहरूपें । प्रगटे प्रतापें शुष्ककाष्ठीं ॥ ४ ॥

२१५ मागें तुम्ही वांटिलें लोकां । सनकादिकां पर्यंत ॥ १ ॥ अधम तेहि थोराविले । आपणा केले सारिखे ॥ २ ॥ नाहीं विचारिली याती । धरिलें हातीं प्रीतीनें ॥ ३ ॥ काय त्याचें क्रियाकर्मे । कांहीं धर्म न विचारा ॥ ४ ॥ उदारपणा नाहीं सीमा । पुरुषोत्तमा तुमचिया ॥ ५ ॥ निळा म्हणे सरते पुरते । केले किती वर्णावे ॥ ६ ॥

२१६ म्हणविते शरणागत । कोणाचे भक्त देवावीण ॥ १ ॥ कोणापाशीं हा परिहार । देते संसारयातनेचा ॥ २ ॥ कोण देवाविण येते

भक्तांसी सोडविते भयांतुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे देव आणि भक्त । येर-येरा होत साह्य सदा ॥ ४ ॥

२१७ येतो जातो ना दिसेपरी । नित्य व्यभिचारी चित्ताचा ॥ १ ॥ ऐसाचि याचा चोरटा खेळ । आहे चक्रचाळ मुळींचाची ॥ २ ॥ नेदी कळों न दावीच अंग । उमटोचि माग केला तो ॥ ३ ॥ निळा म्हणे सायास करितां । होतात वृथा आमुचे ते ॥ ४ ॥

२१८ सर्वज्ञ सर्वदा तुम्ही सर्वसाक्षी । म्हणऊनि कैपक्षी हरिभक्तांचे ॥ १ ॥ खरें खोटें कळे तुम्हां बरावरी । संकल्प अंतरीं उठितांचि ॥ २ ॥ जया तैसें फळ नेमुनी ठेवितां । जोडूनियां देतां काळा हातीं ॥ ३ ॥ कर्मा ऐसें फळ भोगविता सकळ । करूनियां काळ पुढें सत्ता ॥ ४ ॥ निळा ह्मणे जैसें माझें आचरण । तैसें करा दान कृपा निधी ॥ ५ ॥

२१९ हरीविण आहे कोण । सान मोठें वेगळें ॥ १ ॥ सर्वांसाक्षी । अध्यक्षी हें नाम त्या ॥ २ ॥ कर्मा ऐसें देतां फळ ॥ सत्ता केवळ हे ज्याचे ॥३॥ निळा ह्मणे वांटेउभा ॥ परि हा नभाव्यापक ॥ ४ ॥

---

## भगवंताचें षड्गुण वर्णन.

२२० अगा ये षड्गुण भाग्यवंता । समग्र लक्ष्मीचिया कांता ॥ समग्र यशातें तूं धरितां । समग्र ऐश्वर्यता तुज अंगी ॥ १ ॥ समग्र औदार्य लक्षणीं । समग्र वैराग्याची खाणी । समग्र ज्ञानशिरोमणी । समग्र षड्गुणी संपन्ना ॥ २ ॥ यशें थोरविला मारुती । बिभीषणकेला लंकापती । औदार्य देऊनी कर्णा हातीं । कीर्ती दिगांती फिरविली ॥ ३ ॥ ज्ञानें उपदेशीला चतुरानन ऐश्वर्यें वाढविला अर्जुन ॥ वैराग्यशुकातें बोधून । ब्रम्ह सनातन पावविला ॥ ४ ॥ निळा म्हणे ईहीं अगाध लक्षणीं । वंद्य सुरांसुरां तूं त्रिभुवनीं । माझी अलंकारुनियां वाणी । प्रवर्तवावी स्तवनीं आपुलिया ॥ ५ ॥

## देवाची स्तुति.

२२१ अगा ये नरकासुरमर्दना । कुशदैत्यनिकंदना । अगा कौंसमधु-कैटभसूदना ॥ अगा मर्दना हिरण्याक्षा ॥ १ ॥ अगा वृत्रासुरनिहंत्या हिरण्यकश्यपा विदारित्या ॥ अगा रावण संहारित्या । कुंभकरणादीराक्षसां ॥ २ ॥ अगा रिठासुराच्या वैऱ्या । सहस्त्रभुजांच्या वधणारा । अगा निर्वाटि भोमासुरा । सत्यभामावरा गोविंदा ॥ ३ ॥ अगा ये कालियादमना । शकटासुर विध्वंसना ॥ अगा शिशुपाळवक्रदंतहनना । जरासंधभंजना कागबगा ॥ ४ ॥ अगा बळी बंधनाअसुरारि । अगा अरिमन्मथ तमारी ॥ अगा ताटिकापूतनारी गोवर्धनधारी बाळिवंता ॥ ५ ॥ अगा ये केशियादमना । तृणासुरधेनुकहनना ॥ अगामरिचा सुबाहु उद्धरणा । त्रिशिराखर दूषण प्राणहर्त्या ॥ ६ ॥ अगा येविरोचन जाळंधरअंतका । अहिरावणमहिरावणघातका । कबंध वाळीच्या हंतका । रघुकुलटिळकासांबहरणा ॥ ७ ॥ अगा ये शंखासुराचिरणारा मच्छरूपिया पोहणारा । शुंभनिशुंभाचिया घातणारा॥ मोहनीरूपधरा दैत्यांतका ॥ ८ ॥ अगा ये अपार भक्तपाळका । पंढरी भुवैकुंठनायका विश्व चराचर व्यापका । अभय वरदायका निळ्याच्या ॥ ९ ॥

२२२ वस्तुचा जो स्वभावगुण । वोसंडू नेणे तो आपणा ॥ १ ॥ तेविं हा परमात्मा श्रीहरी । सांडूं नेणें आपुली थोरी ॥ २ । जेवीं कस्तुरी परिमळ । शीतळपणा मलयानिळ ॥ ३ ॥ निळा म्हणे परिसपणा नेणें सांडूं आपुल्या गुणा ॥ ४ ॥

२२३ मच्छ कच्छ वराह झाला । खुजाहि शोभला विक्राळ ॥ १ ॥ भक्तप्रिया प्रियोत्तम ॥ सदा अविश्राम दासाविशीं ॥ २ ॥ फरशधारी धनुर्धर । स्वरूप सुंदर गोपवेषीं ॥ ३ ॥ निळा म्हणे बौध्य कलंकी । धरी नेटकीं रूपें ऐशीं ॥ ४ ॥

२२४ महिमा अद्भुतची पाहतां । चरणीं उद्धार झाला पतिता ॥ १ ॥ अहिल्या शिळा झाली शापें । चरणस्पर्शे ते निष्पाप ॥ २ ॥ उद्धरिले विमळार्जुन । अगाध चरणांचे महिमान ॥ ३ ॥ निळा म्हणे तारिल्या शिळा । हाही प्रताप आगळा ॥ ४ ॥

२२५ रसना एकी रस तो नाना । कैसी विवंचना रचिली हे ॥ १ ॥ न कळे लाघव तुमचें हरी । करितां भरोवरी जाणिवेच्या ॥ २ ॥ काय पिंजुनी मेघ पडळ । घडिलें ज्वाळ विजुवाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे तडक भारी । फुटे अंबरीं कासियाचा ॥ ४ ॥

२२६ वीज पडे गगन गडाडी । रचिली परवडी कशाची ॥ १ ॥ अद्भुत प्रकाशाचा लोळ । पडतां अंतराळ दाणाणीत ॥ २ ॥ काय हे तुमची कैसी लीळा । नेणवे सकळां चोजवितां ॥ ३ ॥ निळा म्हणे गर्भी बाळा । वाढवा गोपाळा कैशा परी ॥ ४ ॥

२२७ वेदवक्ता नारायण । तोचि आपण सर्वद्रष्टा ॥ १ ॥ वदसी सेवकाची वाणी । आपुल्या गुणी प्रवर्तवूनी ॥ २ ॥ परम गुह्यार्थ तोचि प्रगटी । आपण पोटीं संचारोनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे विठ्ठल हरीं । वक्ता वैखरी तो वाचा ॥ ४ ॥

२२८ शकटासुर काळ यासी । प्रताप ठाऊका हा तयासी ॥ १ ॥ बळिसी झाला विद्यमान । देतां तीन पांड दान ॥ २ ॥ लवणासुरा अनुभव । कुशा गोमाताचळा सर्व ॥ ३ ॥ निळा म्हणे चतुरानना । नित्य करी पुजा ध्याना ॥ ४ ॥

२२९ सकळचिया नेत्रें तुम्हां सर्वही देखणें । सकळांचिया श्रोत्रें तुम्हां सर्वही ऐकणें ॥ १ ॥ ऐसे सर्वज्ञची तुम्हीं सर्वदां देवा । जेथिल तेथें ज्याच्या तैशा जाणतसा भावा ॥ २ ॥ सकळांच्याही रसना सर्वही रस सेवितां । सकळांच्याही चरणें लंघुनी जातां दिगंता ॥ ३ ॥ निळा म्हणे सकळांच्याही जीवाचें जीव । होऊनियां अलिप्त शेखीं रूप ना नांव ॥ ४ ॥

२३० सर्वांतरी वास याचा । महदादी अणूचा हृदयस्थ ॥ १ ॥ नाहीं दुरी जवळी ऐसा । कोंदोनी दिशा भरलासे ॥ २ ॥ एकवीस हीं स्वर्गांवरी । पाताळाभीतरी भुमंडळा ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वांतरी । वसोनी विटेवरी ठाकला ॥ ४ ॥

[illegible] नेणावे महिमा । [illegible] तमा न देखोनि

॥ १ ॥ क्षीरसिंधु नेणे तृप्ती कैसी असे । क्षुधेचे वळसे इतरांसी ॥ २ ॥ कल्पतरु नेणे औदार्य आपुलें । दैन्यचि देखिलें नाहीं तेणें ॥ ३ ॥ अमृता नाठवे अमरत्व कैसेंहा । मृत्युचि त्या नाहीं म्हणोनियां ॥ ४ ॥ कामधेनु नेणे कामनेचा सोस । अपूर्णता तीस नातळतां ॥ ५ ॥ निळा म्हणे तैसा तुम्ही पांडुरंगा । नेणांचि वियोगा व्यापकपणें ॥ ६ ॥

२३२ संत गाती सनकादिक । तुमचिये कौतुक कीर्तीचें ॥ १ ॥ तारिल्या शिळा गिळीला वन्ही । पर्वत उचलुनि धरिला वरी ॥ २ ॥ सागर सारुनी द्वारकापुरी । वसविली नगरी उदकांत ॥ ३ ॥ निळा म्हणे गोवळ वेषें । झाला निज इच्छें क्षणमात्रें ॥ ४ ॥

२३३ श्रीकृष्ण विचरे कुंजवनीं । तैसाची दंडकारण्यीं श्रीराम ॥ १ ॥ एकें वधिले खर दूषण । एकें मर्दन कागबगां ॥ २ ॥ नासिका छेदनें शूर्पनखा । येणें पूतना देखा शोषियेली ॥ ३ ॥ निळा म्हणे चरित्रमाला । रचिली स्वलीला रामकृष्णें ॥ ४ ॥

२३४ श्रुती देवाच्या कणिया खाणें । श्लाघ्य अन्नें विदुराच्या ॥ १ ॥ द्रौपदी हातींचें भाजीपान । मानी समान पंचामृता ॥ २ ॥ मुद्गला घरींचा वेचक पाक । मानी अधिक क्षीराब्धीहुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे नामयासवें बैसोनि जेवावें परम प्रीति ॥ ४ ॥

---

## करुणापर अभंग व देवापाशीं मागणें.

---

२३५ अगाध महिमा तुमचा देवा । काय म्यां वाणावा मूढमति ॥ १ ॥ उगाचि म्हणवी तुमचा दास । करुनिया आस पायांची ॥ २ ॥ शब्द चातुर्य कांहींचि नेणें । बोबडें बोलणें ध्याकांनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुला म्हणावा । भलतैसा ठेवा भलतेथें ॥ ४ ॥

२३६ आगा ये पुण्यवैकुंठपीठा । सकळां वरिष्ठा देवाचिया ॥ १ ॥

अनाथ मी शरणागत । करा स्थापित निज सेवे ॥ २ ॥ षड्गुण ऐश्वर्य भाग्यवंता । अहो रमाकांता श्रीविठ्ठला ॥ ३ ॥ निळा म्हणे विश्वंभरा॥ करुणाकरा मज तारीं ॥ ४ ॥

२३७ अथवा विनंती परिसा देवा । मज या निरवा संतजना ॥ १ ॥ राहेन त्यांचिया सहवासेसीं । सेवा मिरासी करुनिया ॥ २ ॥ देतील तो सेवीन ग्रास । होईल सपोश तेणें तनु ॥ ३ ॥ निळा म्हणे ते सांगती गोष्टी । धरीन कर्णपुटीं अर्थ त्यांचे ॥ ४ ॥

२३८ अनाथाची कोण पाववील हांक । तुम्ही तो नाईक ब्रम्हांडाचे ॥ १ ॥ मी एक दुर्बळ येतों काकुलती । नेणाची श्रीपती काय करूं ॥ २ ॥ कोण तुम्हांपासीं जागवील मात । होऊनी कृपावंत मजवरी ॥ ३॥ तुम्हासी तो धंदा बहुत बहुतांचा । तयामाजि कैसा आठव माझा ॥ ४ ॥ जेथें थोर थोर संत मुनीश्वर । सनकादिक सुरवर भीड त्यांची ॥ ५ ॥ निळा म्हणे व्यर्थ गेलों वांयाविण । केला उरला शिण जन्मवरी ॥ ६ ॥

२३९ अवघ्यांचि दुःखाचा परिहार । चरणीं थार झालिया ॥ १ ॥ आतां देवा नुपेक्षावें । आश्वासावें प्रीतीनें ॥ २ ॥ बहुत श्रमित होऊनी आलों । वांयां घडिलों न पाहिजे ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपावंता । चरणीं आतां मज रक्षा ॥ ४ ॥

२४० अवलोकुनियां माझिया भावा । करावा देवा अंगीकार ॥ १ ॥ जेणें तुमची घडेल सेवा । होईन देवा पात्रभूत ॥ २ ॥ धरिल्या जन्माचें सार्थक । घडेल लोक मानावती ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसें करा । अहो दातारा पंढरीच्या ॥ ४ ॥

२४१ असतें उत्तम सुकृत जरी गाठीं । तरी कां ऐसी आटी पडती देवा ॥ १ ॥ लाजोनीया आजि पळतसा माघारे । ऐकोनी उत्तरें करुणेची हीं ॥ २ ॥ नये कांहीं मना सेवा माझी भक्ति । तरिच धरिलें चित्तीं उदासीन ॥ ३ ॥ निळा म्हणे माझा पुरता आला वीट । देखोनी आदा कर्मबळी ॥ ४ ॥

२४२ असाधारण माझे बोल । तुमचे फोल कृपेवीण ॥ १ ॥ म्हणोनियां धांवा करी । करा सामोरी दृष्टी आतां ॥ २ ॥ काय करूं तैसा

व्युत्पत्ती । तुम्हां जल्पती नेणोनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे नामोच्चारीं । तुम-चीये मोहरी कृपेतें ॥ ४ ॥

२४३ अहो अज्ञानतिमीरनाशा । जगदाधीशा आदिसूर्या ॥ १ ॥ देवा विठोजी कृपावना । लेववा अंजनां निज नेत्रीं ॥ २ ॥ आपुलियेरूपी सौरसु करा । हातीं धरा मज आतां ॥ ३ ॥ निळा म्हणे चिंतन चित्तीं । हेंचि दिवस राती राहिलें ॥ ४ ॥

२४४ अहो निर्विकल्पतरु देवा । फळे पुरवा इच्छिली ॥ १ ॥ तरी द्या हो चतुर्भुज । स्वरुप निच निजाचें ॥ २ ॥ करीन पूजा समाधान । निश्चळ मनें आपुलीया ॥ ३ ॥ निळा म्हणे आवडी ऐसी । पायांपाशी जाणाविली ॥ ४ ॥

२४५ अहो देवा कृपामूर्ती । गुणसंपत्ती निधाना ॥ १ ॥ पिंड पदीं समर्पिला । आम्ही आपुला जीवभाव ॥ २ ॥ न मागों कांहीं अणु-मात्र । कृपापात्र करावें ॥ ३ ॥ निळा म्हणे विज्ञापना । परिसा दीना रंकाची ॥ ४ ॥

२४६ अहो देवा कृपावंता । करा मज अनाथा सनाथ ॥ १ ॥ निरवुनिया संतजना । करा मना बोध माझ्या ॥ २ ॥ अरुप वाणी बोबडीं वचनें । केली स्तवनें परिसावी ॥ ३ ॥ निळाम्हणे आवडी जाणा । करीं विज्ञापना म्हणवुनी ॥ ४ ॥

२४७ आठवितां तुमची लिळा । करितां दासाचा सोहळा ॥ १ ॥ ऐसा स्वभाविक गुण । वसे तुम्हां अंगी पूर्ण ॥ २ ॥ शरणांगताचिया नांवें । तुम्हां उत्साह दुणावे ॥ ३ ॥ निळा म्हणे वत्सा धेनु । जेंवि पान्हावें देखोनु ॥ ४ ॥

२४८ आतां कधीं सांभाळाल । आम्हा ठेवाल चरणापें ॥ १ ॥ दिवसरात्रि खंति वाटे । हृदय फुटे वियोगें ॥ २ ॥ येउनी आतां भेटी द्यावी । यावरी गोसावी प्रीतीनें ॥ ३ ॥ निळा म्हणे चरणीं माथा । कृपावंता ठेवितों ॥ ४ ॥

२४९ आतां पुरवा मनीचा हेत । कराहे उदित भेटीसी ॥ १ ॥ रूप पहावया डोळे । माझे भुकेले बहु काळ ॥ धृ० ॥ चरण [illegible]

करी तळमळ आखंड ॥ २ ॥ निळा म्हणे पुरवा कोड ॥ आणा चाड अंतरीची ॥ ३ ॥

२९० आतां यात्रा घेउनी त्रास । आलों तुम्हांस शरण हरि ॥ १ ॥ घ्याल तरी सोडवून । या काळापासून पुण्य तुमचे ॥ २ ॥ आम्हासी तो न कळे गती । कैसी निर्गती करावी तें ॥ ३ ॥ निळा म्हणे ध्या हो धर्म । काढा अकर्म कर्मांतुनी ॥ ४ ॥

२९१ आतां यावरी संदेहउरी । नका श्रीहरी लोटूं मज ॥ १ ॥ लाउनियां आपुलिये कासे । न्या मज तैसे परपरा ॥ २ ॥ कर्माची तो न कळे गती । नेणों पावविती कोण्या ठाया ॥ ३ निळा म्हणे तुमचे हातीं । आहे श्रीपति मोकळिक ॥ ४ ॥

२९२ आतां येउनी सांभाळीं । करा माझा लळा पाळीं ॥ १ ॥ होसील तूं कृपावत । तरि कां ऐसे विपरित ॥ २ ॥ बाळकासी मोहे । निति पाळविसी आहे ॥ ३ ॥ निळा म्हणे आतां । नाहीं धीर माझ्या चित्ता ॥ ४ ॥

२९३ आतां माझा अंगिकार । करा थार पायापें ॥ १ ॥ लाउनिया आपुलया गुणीं । माझी वाणी रंजवा ॥ २ ॥ बाळी भोळी करीन सेवा । तुमची देवा ते घ्यावी ॥ ३ ॥ निळा म्हणे विनवूं नेणें । तरी पोसणे मी तुमचे ॥ ४ ॥

२९४ आपुलिया मनोगते । गाईन तुमचे गुण वाणी ॥ १ ॥ अहो देवा कृपानिधि । माझिये बुद्धी साह्य व्हावें ॥ २ ॥ नका घेऊं देऊं आड मतिवाद नाड बुडवणा ॥ ३ ॥ निळा म्हण नावडो मात । आणखी हा हेत वाड करा ॥ ४ ॥

२९५ आपुलें तुम्ही न संडावें । कर्म स्वभावें आहे तें ॥ १ ॥ सांभाळाव नामधारका । निरसुनी पातका भेटी द्यावी ॥ २ ॥ सूर्य न संडी प्रकाश जेवी । रश्मी पदवी ज आह ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यापरी देवा । आमुचा करावा प्रतिपक्ष ॥ ४ ॥

२९६ आशाबद्ध देखोनियां विटताती लोक । धावयासी भीक नाहीं म्हणुन ॥ १ ॥ तैसे तुम्ही नव्हे लक्ष्मीचे कांत । सदा भाग्यवंत औदा-

येसी ॥ २ ॥ आपुल्या संसारें आपणचि दुःखी । करिती काय सुखी इतरासी त ॥३ ॥ निळा म्हणे येतों तुम्हा काकुळती । नुपेक्षाल श्रीपती म्हणोनिया ॥ ४ ॥

२५७ आम्हा ताराल जरि श्रीहरि । कीर्ती तुमची वाढेल तरी ॥ १ ॥ पुढेंहि चोखाळती वाटा । भाव भक्तिचा चोखटा ॥ २ ॥ विश्वासें त्या दृढवर्ती । आमुचि देखोनि उत्तम गति ॥ ३ ॥ निळा म्हणे जा सर्व जाणा हाती तुमच आवघ्या खुणा ॥ ४ ॥

२५८ आम्ही तो आपुलें निवेदिलें पायीं । अंतरीचें नाहीं बांचि ठेलें ॥ ॥ १ ॥ तुम्ही सर्व जाणा जाणतां अंतर । काय पारिहार बाउगाची ॥ २ ॥ सोंडाविलीं ऐसीं बहुतें आनाथें । आनुसरतां नामाते तुमचीया ॥ ३ ॥ निळा म्हणे मी ही झालों शरणांगत । एकोनिया मात मागिलाची ॥ ४ ॥

२५९ आम्ही दासीं कीजे दास्य । सहसा उपाहस न करावें ॥ १ ॥ नेणों कां हे पाडिलें दृष्टीं । आली गोष्टी वाचे त ॥ २ ॥ निरोपाध तुमचे लेणें । निर्विकार गुणें संपन्न ॥ ३ ॥ निळा म्हणे गुणातीता । रूपमंडिता विठोबा ॥ ४ ॥

२६० आम्ही देवा भक्तीहीन । नेणों ज्ञान योगाचें ॥ १ ॥ म्हणोनि येतो काकुळती । पुढतोपुढतीं । तुम्हासी ॥ २ ॥ भाव नाहीं न कळे ज्ञान । कैसें साधन करावें तें ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवस राती । उद्वेग चित्तीं राहिला हा ॥ ४ ॥

२६१ आम्ही नेणतीं नेणतीं । सुजाण तुम्ही कमळापती ॥ १ । अवघे अंतरींचे जाणा । सर्वसाक्षी तूं देखणा ॥ २ ॥ माझ करितां समाधान । लाभ कोणा होईल मान ॥ ३ ॥ कां हे बोलयेला निळा । तुम्ही जाणतां कळवळा ॥ ४ ॥

२६२ आम्ही न मागों ऐसा कधीं । कृपानिधी वर घाल ॥ १ ॥ आपुल्या पायीं जमवीं चित्त । माझें अखंडीत दुजें न मागें ॥ २ ॥ युगें जाता कल्प कोडी । न करूं जोडी आणिक ॥ ३ ॥ निळा म्हणे राहो ध्यानीं । तुमचे मनीं रुपडें ॥ ४ ॥

२६३ आम्ही नेणों भाव कैसा भक्तिरस । म्हणवूं तुमचे दास अवघ्या

गुणें ॥ १ ॥ मुखें गाऊं नाम पवाडे श्रीहरी । उभे महद्वारीं ठाकोनिया ॥ २ ॥ नेणों ज्ञान ध्यान मंत्र योगकळा । आसन मुद्रा डोळा लक्ष कैसें ॥ ३ ॥ तत्व संख्या नेणों नित्यानित्य ज्ञान । आठऊं चरण सकुमार ते ॥ ४ ॥ निळा म्हणे अगा रुक्मादेविवरा । आतां उचित करा आपुलें तें ॥ ५ ॥

२६४ उचित अनुचित आम्ही नेणों नेणतीं । सर्वाविशीं मुढाचे मती विदीत असावें ॥ १ ॥ म्हणोनियां आतां कृपादृष्टी अवलोका । वैकुंठ नायका नका उपेक्षा करूं । हीन दीन मूर्ख परि शरण तुम्हासी । आलों हृषीकेशी आंगिकरावा ॥ ३ ॥ निळा तुम्ही देवा कृपासागर मी तव किंकर रज रेणू सानसा ॥ ४ ॥

२६५ एकदां तरी दाखवा डोळां । तोचि वेळोवेळां आठवीन ॥ १ ॥ स्वरुप तुमचें पुरुषोत्तमा । अहो मनोरमा विश्वाचिया ॥ २ ॥ मग मी तुम्हां न करीं पीडा । संदेह येवढा निवारिल्या ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतर जाणा । यदर्थी कृपणा नये होऊं ॥ ४ ॥

२६६ एकदां तरी देखिल्याविण । कैसेनि मी कोण ओळखें ॥ १ ॥ अमृताची ऐकिल्या गोडी । रसनें ते फुडी केवि लाभे ॥ २ ॥ क्षीराब्धी हे शेषशयन । जगीं न देखोन अनोळखा ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यापरि देवा । नये स्वनुभवा काय करूं ॥ ४ ॥

२६७ एक देशी आम्ही एकट एकले । आशेचे बांधले जन्मोजन्मीं ॥ १ ॥ म्हणऊनी इच्छुं तुमचा आश्रय । पाहावेसे पाय वाटताती ॥ २ ॥ बहु काळवरी वियोगें पीडलों । जराव्याधी केलो कासाविस ॥ ३ ॥ निळा म्हणे आतां सोडवणें हरि । तरि मज संसारीं होंचि भवे ॥ ४ ॥

२६८ कराल सांभाळ तरि ते तुमची कीर्ति । मी तो बाळमति नेणें कुमें ॥ १ ॥ बैसलों विश्वास आळवित नांवा । तुमच्या दयार्णवा निरंतर ॥ २ ॥ नुपेक्षाल मज हा वाटे भरवसा । आहे कीर्तिठसा तुमचा जगीं ॥ ३ ॥ निळा म्हणे नेणें दुजी परी आतां । येईल तें चित्ता सुखें करा ॥ ४ ॥

२६९ [illegible] तरि [illegible] । [illegible] ॥ १ ॥ मग [illegible]

राहीन निश्चितें । तुमच्या दानें वरदाच्या ॥ २ ॥ धरुनियां राहेन कंठीं । नाम पेटी उच्चार ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसा हेत । उत्कंठित मानसीं ॥ ४ ॥

२७० करूं येईल अंगिकार । तरि करा फार काय बोलों ॥ १ ॥ नाहीं घोकिलें ऐकिलें कांहीं । सेवा घडली नाहीं वैष्णवांची ॥ २ ॥ स्वधर्म विधी न कळे आचार । कैसा तो प्रकार साधनाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे आहें मूढ दगड । ठायींचीच जड बुद्धी माझी ॥ ४ ॥

२७१ कैळासुत्री तुम्ही नाटका नटक । देव ब्रम्हादिक आज्ञाधार ॥ १ ॥ न सांगतां कळे सर्व अंतरीचें । सकळही जीवाचें मनोगत ॥ २ ॥ माझेविशीं कां हा मांडिला आळस । भेटीचा वोरस वांया धाडीं ॥ ३ ॥ जिवित्वाचा ऐसी मांडिली फरारी । झालों भूमीवरी भार वृथा ॥ ४ ॥ श्लाघ्यची न वाटे जिणें झालें ओस । धरिलें उदास तुम्ही देवा ॥ ५ ॥ निळा म्हणे धीर नुपजेची आतां । तुम्ही तों आनता मोकलिलें ॥ ६ ॥

२७२ काय करूं वो भुलविलें भुली । चित्त माझें या विषयाचे चालीं । आड कल्पना ठाकोनि राहिली । त्याणें संगती वो याची अंतरली वो ॥ १ ॥ पायां पडतें वो दाखवा मज वाट । कर्माकर्मा चुकनियां घाट । कामक्रोधाचे ऐकोनि बोभाट । भय वाटे तें हें देखोनि दुर्घट वो ॥ २ ॥ मज तो विचार न सुचे आपुल्या मतें । न्याल तुम्ही त्या येईन सुपंथें । घेउनि धर्म मज पाववा वो तेथें । जेथें असति सांवळे गोपिनाथ वो ॥ ३ ॥ कोठें गेले या करूं वोरबारा । आगी लागो या अघोरा संसारा । पडत गुंति हा अधिकाचि पसारा । भेटवा आतां मज न्या वो सारंधरा ॥ ४ ॥ येथें होती हे बहुताचे उत्पात । जन्म जरा या व्याधींचे आघात । भुलले वाट वो न मिळतां संघात । तुम्ही पाववा वो रमानाथ जेथें वो ॥ ५ ॥ आहे भरंवसा हा तमचाचि मज । संत जाणतसां अंतरींचें गुज । आले शरण ते पावती सहज । निळा म्हणे आतां राखा माझी लाज वो ॥ ६ ॥

२७३ काय नेणों आचरण केलें । जया आलिंगिलें हृदयेंसी ॥ १ ॥ हें तो न कळे माझिये मती । वाचि लाणीं चित्तीं व्यापिलें ॥ २ ॥

कोण्या भजनें प्रसन्न व्हाल । आपुला म्हणवाल शरणागत ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवाभीता । जेंवि कां साविता उगावला ॥ ४ ॥

२७४ कीर्ति ऐकोनि आलों दास । माझा करा सांभाळ ॥ १ ॥ जतन करिन तुमचें नाम । धरुनी प्रेम निज कंठीं ॥ २ ॥ भाव माझा बोलेसी ठेवा । घ्या हो सेवा दिननिसी ॥ ३ ॥ निळा म्हणे संकल्पेसीं । पायांपासीं कंठीन ॥ ४ ॥

२७५ केव्हां भेटी देसी जीवाच्या जीवना । सुखाच्या निधाना पांडुरंगा ॥ १ ॥ वोरसलें मन नित्य वाट पाहे । नयनीं नीज नये दिवसरात्रीं ॥ २ ॥ आला जातो दिवस मास घटिका पळ । प्राण हा विठ्ठल तुजलागीं ॥ ३ ॥ हुरहुरी चित्त सदा उत्कंठित । न पुरेचि हा हेत चिंता वाटे ॥ ४ ॥ केव्हां येईल सार्थकाची वेळ । येसी कृपाळ धांवोनियां ॥ ५ ॥ निळा म्हणे आतां न लावावा उशीर । भेटोनी अंतर निववावें ॥ ६ ॥

२७६ कोठें विगुंतली । नेणो कोणें गोंवियली ॥ १ ॥ माझे न करीं आठवण । गेली बाळका विसरोन ॥ २ ॥ न लावावा उशीर । नेणों कां झाली निष्ठुर ॥ ३ ॥ निळा म्हणे काय माझें । फार मानियलें ओझें ॥ ४ ॥

२७७ कृपावंता दया मोठी । आदर पोटीं दासाचा ॥ १ ॥ म्हणोनियां सांभाळ करा । नेंदा अविचारा आतळों ॥ २ ॥ आपुलाये सेवेवांण । न ठेवा क्षण पळ एक ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रेमरसें । जववा सरिसें सांगातें ॥ ४ ॥

२७८ कृपा करुनी माझी मती । वाढती केली तुम्हीं प्रीती ॥ १ ॥ तरी पाववाजी पार । कोलिये कथेचा विस्तार ॥ २ ॥ वदवावी वैखरी । देहा अवसान तोंवरी ॥ ३ ॥ निळा म्हणे न सांडावा । अभिमान आपुला जी देवा ॥ ४ ॥

२७९ गाईन कीर्तनीं गुण नाम अवघे । तुमचे तुम्हांपुढें आवडीनें

॥ १ ॥ भावा ऐसे माझ्या व्हावी पांडुरंगा । मग मी अलिंगा करीन तें ॥ २ ॥ नाचेन सन्मुख चरणावरी दृष्टी । धरूनी प्रेम पोटीं आळवीन ॥ ३ ॥ निळा म्हणे तुम्ही चरित्रें अपार । केलीं ते प्रकार आठवीन ॥ ४ ॥

२८० गोड माझी वाणी तुम्ही करूनि श्रीहरी । लावावा वैखरी कीर्तनस्तवनीं आपुलिये ॥ १ ॥ इतुलेंनिचि सार्थक माझ्या होईल जन्माचें । अभयदान तुमचें ऐसें झालियावरी ॥ २ ॥ बहुत दिवस आस्था मनीं वाहिली हेचि । करावी तुमची सेवा स्तुती निजभावें ॥ ३ ॥ निळा म्हणे चरणावरी ठेविली डोई । अपराध ते माझे कांहीं मना नाणावे ॥ ४ ॥

२८१ गोपीवल्लभा कमलाकांता । अनाथनाथा श्रीविठ्ठला ॥ १ ॥ तुमचा दास झालों आतां । करावि सरता पायांसें ॥ २ ॥ गाऊनियां नामावळी । नाचेन टाळी वाजवित ॥ ३ ॥ निळा म्हणे घ्याल सेवा पात्र देवा तैं झालों ॥ ४ ॥

२८२ गोपाळपुरनिवासिया । अगा ठाकलिया विटेवरी ॥ १ ॥ पद्मनाभा शेषशयना । अगा ये सूदना दैत्यकुळा ॥ २ ॥ चतुर्दशभुवनव्यापका देवा । माझिया भक्ति भावा चित्त द्यावें ॥ ३ ॥ निळा म्हणे अपरमिता । अगा ये अनंता महदादा ॥ ४ ॥

२८३ चिंतीतों मी चिंतनीं । रूप तुमचें अनुदिनीं ॥ १ ॥ कराल कृपा म्हणोनियां । विठो पंढरीच्या राया ॥ २ ॥ मागें उद्धरिले बहुत । लहान थोर पतित ॥ ३ ॥ नेले वैकुंठाप्रती । महा पापी महा दोषी ॥ ४ ॥ ऐसी ऐकोनियां मात । चरणीं विगुंतला हेत ॥ ५ ॥ निळा म्हणे याचि लागीं । घेतों लाहो करितों सलगी ॥ ६ ॥

२८४. जरी अवगुणी अन्यायी । बाळा तुमेची कीं आई ॥ १ ॥ झाल्या अपराधाच्या कोटी । घालुनियां साहे पोटीं ॥ २ ॥ कुरवाळुनी मोहें । तया पाजी प्रेमपेहें ॥ ३ ॥ निळा म्हणे अंकीं । घेउनी पहुडे पारियंकीं ॥ ४ ॥

२८५. जाणें पाळूं लळा । आदि अवसान सोहळा ॥ १ ॥ आपुलिया बाळकातें । मोहें प्रतिपाळी त्यातें ॥ २ ॥ [illegible] ॥ ३ ॥ [illegible] ॥ ४ ॥

२८६. आणे भाकूं करुणा । माता स्नेहातुर बाळा ॥ १ ॥ ऐसें कळवळसां [illegible] । तरि कां लाविला वेळ ॥ २ ॥ उपेक्षिलें ये परदेशीं । एकलेंचि मज उपवासी ॥३॥ निळा म्हणे यावरी करा । समाधान हृदयीं धरा ॥४॥

२८७. जाणोनिया मनोगत । ठेवा हात मस्तकीं ॥ १ ॥ करा माझें समाधान । देउनी वचन अभयाचें ॥ २ ॥ आहे देवा तुम्हां हातीं । उगवू गुंती जाणतां ॥ ३ ॥ निळा म्हणे वचनाधीन । नारायण तमचिया ॥ ४ ॥

२८८. जिहीं भाव धरिला ठायीं । बुद्धी दिधली तुमच्या पायीं ॥ त्यासी करुणेची करूनी सोई । आपणादारीं बैसविलें ॥ १ ॥ प्रल्हाद संकटीं रक्षिलें । ध्रुवासी अढळपदीं बैसविलें ॥ उपमन्या नेउनियां रक्षिलें ॥ क्षीराब्धी वैभव देउनी ॥ २ ॥ उद्धवासी । ब्रह्मरस पाजिला । अर्जुना निजबोध अर्पिला ॥ द्रौपदीचा लळा पाळिला । वस्त्राभरणें पुरविलीं ॥ ३ ॥ गौळणीचे प्रिय संवाद । नित्य भक्षणें त्यांचें दुग्ध ॥ गोवळ्यांसवे हुंबरी साद । केलें तुम्हीं ॥ ४ ॥ सर्व सुखांचा आराम । जिहीं गाइलें नाम । त्याचा करूनियां संभ्रम । निजानंदा पात्र केलें ॥ ५ ॥ नामदेवा ज्ञानदेवा । निवृत्तीनाथा चांगदेवा ॥ एकोबा तुकोबाचायाभाव । तैसेची वर्ता श्रीहरी ॥ ६ ॥ निळा म्हणे मी तों दीन । सकळ संताचा चरणरेण ॥ तुमच्या स्तवनीं ठेविलें मन । येईल चित्ता तैसें करा ॥ ७ ॥

२८९. जे जे तुम्हां शरण आले । ते ते नेले निजधामा ॥ १ ॥ पुढें जे आणिक भजती नवे । त्यांच्या भावें त्यां देसी ॥ २ ॥ ऐसे अपार युगायुगीं । करितां जगीं उपकार ॥ ३ ॥ निळा माझा चिंता । असों द्या अनंता विनवितों ॥ ४ ॥

२९० तुमचे चरणीं राहो मन । करा हें दान कृपेचें ॥ १ ॥ नामीं तुमचे रंगो वाचा । अंगीं प्रेमाचा अविर्भावो ॥ २ ॥ हृदयीं तुमची राहो मूर्ती । वाचे कीर्ती पवाड ॥ ३ ॥ निळा म्हणे ठेवा ठायीं । जीवभाव पायीं आपुलीये ॥ ४ ॥

२९१. तुमची नामें गाऊं सुखें । तुम्हीं ती सुखें ऐकावीं ॥ १ ॥

नका यासी व्यवधान । मेळवा नयन नयनासी ॥ २ ॥ हाकेसवें धांवोनी यावें । नुपेक्षावें सर्वथा ॥ ३॥ निळा म्हणे हृदयीं कास । करा सावकाश आमुचिये ॥ ४ ॥

२९१ तुमचीया बळें तुम्हासवें खेळावें । आपल्या नाडावें मतिवादें धांवता ॥ १ ॥ याचिसाठीं क्षणक्षणां विनंती करी । ठेवावें मजवरी अवलोकन कृपेचें ॥ २ ॥ तुम्हासी न भजतां योगयाग सायास । तेचि भवपाश होती फळें देऊनी ॥ ३ ॥ निळा म्हणे जप तप ध्यान संपत्ती ॥ कृपेवीण तुमचे होती बंधना मूळ ॥ ४ ॥

२९२ तुमच्या पायीं हित । होईल निश्चित हेंचि वाटे ॥ १ ॥ आणखी कोणा शरण जाऊं । आहे उपाऊ तुम्हां हातीं ॥ २ ॥ सहज कृपा अवलोकाल । तरी पाववाल निजठाया ॥ ३ ॥ निळा म्हणे संचित माझे । आड श्रीराजे न घालावें ॥

२९४ तुम्ही देवा प्रत्यक्ष असा । परि मी कैसा ओळखों ॥ १ ॥ जेव्हां प्रगटोनी भेटी द्याल । तेव्हांचि फावाल सुरवाडें ॥ २ ॥ निर्धना निक्षेप असोनी धन । जेंवि तें न देखोन दैन्य भाकी ॥ ३ ॥ निळा म्हणे झाली परी तैसीच मज हरि नेणतां ॥ ४ ॥

२९५ तूंचि पंढरीनाथा । संचर तत्त्वतां हृदयांत ॥ १ ॥ ऐसा प्रताप आणिका आंगीं । नाहीं ये युगीं विचारितां ॥ २ ॥ संगती अन्यत्र देव ते भुतें । अशा लोलिंगते ते काये ॥ ३ ॥ निळा म्हणे जन्ममरणा । करी निवारणा एक हरी ॥ ४ ॥

२९६ तुमचे पायीं आमुचें निज । नाहीं काज लौकिकीं ॥ १ ॥ रिद्धीसिद्धी फुकासाठीं । नेघों गोठी नाईकों त्या ॥ २ ॥ लेववा भक्तांचीं लक्षणें । तींहि भूषणें आवडतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपानिधी । फेडा आधि हे माझी ॥ ४ ॥

२९७ त्रिभुवनपति अहो देवा । दीनबांधवा विठोजी ॥ १ ॥ भावा माझ्या द्या जी थार । आपुल्या निरंतर चरणावें ॥ २ ॥ तेणें सार्थक होईल काळ । सुमंगळ देह माझा ॥ ३ ॥ निळा म्हणे सुफळ जिणें । होईल स्मरणें नामाचिया ॥ ४ ॥

२९८ दीन मी अनाथ तुमचें रंक । मागतों भीक मन द्यावी ॥ १ ॥ नेऊनि घाला पायांवरी । निरवा श्रीहरी कृपावंता ॥ २ ॥ उपेक्षावें शरणागता । तरी मी नेणता दास तुमचा ॥ ३ ॥ निळा म्हणे अवघे संत । मिळोनि स्वहित करा माझें ॥ ४ ॥

२९९ दोहीं डोळां घालुनी वाती । पाहे वाट दिवसरातीं ॥ १ ॥ केव्हां येशील वा धांवोनी । प्रेमपान्हा पाजिसी स्तनीं ॥ २ ॥ पंचहि प्राण ठेविले कंठीं । तुजचि भेटावयासाठीं ॥ ३ ॥ निळा म्हणे माझी आई । न धरी निष्ठुर वो विठाबाई ॥ ४ ॥

३०० दंभ मान नको । देऊं वैकुंठनायका ॥ १ ॥ तुमचीं गाऊं द्या निश्चळ । गुण नामें सर्वकाळ ॥ २ ॥ शांती क्षमा दया । त्याहि नको पंढरी राया ॥ ३ ॥ निळा म्हणे निरुपाधी । ठेवा माझी चरणीं बुद्धी ॥ ४ ॥

३०१ दृष्टी देखावयासचि वाटे । हृदय फुटे त्यालागीं ॥ १ ॥ उभा कटावरी कर । मूर्ती सकुमार गोमटी ॥ २ ॥ भेटीलागीं मन व्याकुळ । न लोटे पळ युग वाटे ॥ ३ ॥ निळा म्हणे न तुटे आधी । कृपानिधी न भेटतां ॥ ४ ॥

३०२ धर्म तरी आहे ऐसा । मार्ग सहसा रक्षावा ॥ १ ॥ नाहीं तरी भांबावती । अवघी भरती आडरानें ॥ २ ॥ म्हणोनिया माझा करा । विश्वंभरा सांभाळ ॥ ३ ॥ निळा म्हणे येतां लोकां । अनुभव शंका फिटेल ॥ ४ ॥

३०३ धांवोनी मी येतों परि नेणें मारग । तूचि लागवेग करीं अता ॥ १ ॥ अनाथ मी दीन रंक शरणांगत । म्हणऊनियां त्वरित सांभाळावें ॥ २ ॥ अहो दीनानाथा दीनबंधु देवा । मनींचा हा उगवावा हेत माझा ॥ ३ ॥ तुम्हां तों यावयां न लगती सायास । प्रगटावया दिवस मास पळ ॥ ४ ॥ मी तो सर्व भावें आहें बुद्धिहीन । नेणें करूं ध्यान स्तवन पूजा ॥ ५ ॥ निळा म्हणे तुम्ही कृपेचे सागर । जाणता अंतर सर्वसाक्षी ॥ ६ ॥

३०४ धांवोनियां येसी । प्रेम पान्हा तूं पाजिसी ॥ १ ॥ तरीच वाचतील प्राण । नाहीं तरी आलें मरण ॥ २ ॥ मायेविण बाळा ।

वरी कोणाचा कळवळा ॥ ३ ॥ निळा म्हणे निज निगुती । पाळण पोषण तुझ्या हातीं ॥ ४ ॥

३०५ धांवोनियां वाडेंकोडें । आलों भेटी तुम्हांपुढें ॥ १ ॥ झडकरी उठोनियां आतां । क्षेम द्या हो पंढरीनाथा ॥ २ ॥ न करितां उदास । वाटेल आगळा हा रस ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रेमा । न खंडावा पुरुषोत्तमा ॥ ४ ॥

३०६ नको पाहों अंत । उडी घाली वो त्वरित ॥ १ ॥ माझे वांचतील प्राण । क्षुधे तृषे बोळवण ॥ २ ॥ वेळा जाणसी उचित । माउली तूं कृपावंत ॥ ३ ॥ निळा म्हणे गंगे । माये माझे पांडुरंगे ॥ ४ ॥

३०७ नाहीं भजन पूजन केलें । पूर्वीं हें आलें स्वानुभवा ॥ १ ॥ तुम्हीं अव्हेरिलें देवा । करितां धांवा नाईका ॥ २ ॥ कैसेनि करुणा कराल आता । मजवरी अनंता मी नेणें ॥ ३ ॥ निळा म्हणे गेलों वायां । आजी या ठाया पावोनी ॥ ४ ॥

३०८ नाहीं तुम्हांपाशीं कवणेविशीं उणें । नांदतसां गुणें संपत्तीच्या ॥ १ ॥ न करावा अव्हेर तुम्हीं अनाथाचा । बडिवार तुमचा हाचि असे ॥ २ ॥ देऊं म्हणाल तरी ब्रम्हांड तुमचें । अंगीं ऐश्वर्याचें सामर्थ्यही ॥ ३ ॥ निळा म्हणे भेटी न लावा उशीर ॥ क्षणेंची अवतार धरोनी टाका ॥ ४ ॥

३०९ नाहीं कोणा उपेक्षिलें । बहुतां केलें सनाथ ॥ १ ॥ माझेचि विशीं आळस केला । कां जी विठ्ठला मी नेणें ॥ २ ॥ प्रालब्धाचा ठेवा जैसा । आम्हां तैसा ओढवला ॥ ॥ ३ ॥ निळा म्हणे गेलों वायां । तुमच्या पायां न देखतां ॥ ४ ॥

३१० नाहीं घडली कमाई तैसी । मागें जैसी संतांची ॥ १ ॥ म्हणोनियां उपेक्षिलें । ऐसिये लोटिलें भवार्णवीं ॥ २ ॥ जे काम क्रोध ऐसे । कवळती भासे जळचर ॥ ३ ॥ निळा म्हणे काढील कोण । येथें धांवोन मज आतां ॥ ४ ॥

२११ नेणसी अव्हेरु । तरि कां केला वो उशिरु ॥ १ ॥ माझे विकळ झाले प्राण । वियोग न साहे दारुण ॥ २ ॥ किती करूं शोक । तहान लागली भूक ॥ ३ ॥ निळा म्हणे वेगें । धांव घाली पांडुरंगें ॥ ४ ॥

२१२ नेत्रांची वासना । तुज पाहावें नारायणा ॥ १ ॥ करी याचें समाधान । काय पहातोसी अनुमान ॥ २ ॥ भेटावें पंढरीराया । हेंचि इच्छिताती वाह्या ॥ ३ ॥ म्हणती जावें पंढरीसी । हेंचि ध्यान चरणासी ॥ ४ ॥ चित्त म्हणे पायीं । तुझे राहीन निश्चयीं ॥ ५ ॥ ह्मणे बंधु तुकयाचा । देवा भाव पुरवा साचा ॥ ६ ॥

२१३ पाचारितां धांवोनि यावें । ऐसें द्यावें वरदान ॥ १ ॥ मग मी तेणें राहेन सुखें । चिंतन मुखें करीं तुमचें ॥ २ ॥ आळवीन आवडी नामें । गाईन प्रेमें गुण गीतीं ॥ ३ ॥ निळा ह्मणे उदारपणें । करा हो देणें कृपेनें ॥ ४ ॥

२१४ पोटींचेंचि परी नेणतें बाळ । नेणे काळ वेळ मागतां ॥ १ ॥ आळी त्याची देखोनियां । पुरविती थाया मायबापें ॥ २ ॥ जरी उदंड आहेती पोरें । तरी ते थोरे जाणतीचि ॥ ३ ॥ निळा म्हणे मी निटपणें वेडें । बोलणें बोबडें कानीं ध्यावें ॥ ४ ॥

२१५ पांडुरंगे पांडुरंगे । वेगीं येई माझे गंगे ॥ १ ॥ तुजवांचूनि मजला । कोण सांभाळी दयाळा ॥ २ ॥ तूंचि आमुचा आधार । धावुनि येई वा सत्वर ॥ ३ ॥ निळा म्हणे पांडुरंगा । घेई बळा तुं वोसंगां ॥ ४ ॥

२१६ ब्रम्हादिकां न लभे तुमचें दर्शन । तेथें काय दीन अनाथ मी ॥ १ ॥ कर्मोनी इच्छिनों भेटीचें गौरव । भक्तिहीन भाव अपुरता ॥ २ ॥ काजवे पाचारी जेंवि दिनकरा । निज परंपरा नाठवुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे क्षमे अपराध हे माझे । न धरावे श्रीराजें मनावरी ॥ ४ ॥

२१७ भक्तप्रिये येवो आई । विठाबाई कृपाळे ॥ १ ॥ न साहे वियोग प्राण फुटे । उदास वाटे तुजविण ॥ २ ॥ कोणा जीवन भोजन मागों । कोणा सांगों अहर्भारी ॥ ३ ॥ निळा म्हणे धांवोनि यावें । मज हें द्यावें अभयदान ॥ ४ ॥

३१८ भोळा भाव माझा । जाणा तुम्ही गरुडध्वजा ॥ १ ॥ काय जाणें वेद नीती । योगकळा आत्मस्थिती ॥ २ ॥ करितों कीर्तन । नामीं तुमचें अनुसंधान ॥ ३ ॥ निळा म्हणे कराल कृपा । म्हणोनियां वैकुंठ-भूपा ॥ ४ ॥

३१९ भोगायतन शरीर माझें । व्यर्थचि ओझें वागविलें ॥ १ ॥ सार्थक होय याचें तसें । कराचि सौरसें आपुलिया ॥ २ ॥ करूनियां कृपा-दान । सांभाळा दान अनाथा ॥ ३ ॥ निळा म्हणे चरणीं ठेवा । स्मरणीं देवा नामाचे ॥ ४ ॥

३२० माझी पूजा हेंचि अर्चन । तुमचें नाम संकीर्तन । नेणें करूं वेदाध्ययन । नेणें आसन योगाचें ॥ १ ॥ म्हणोनि येतों काकुलती । अ-त्यंत मूढ आहे माझी मती । नेणें करूं तमची स्तुती । अहो जगत्पती पुराणपुरुषा ॥ २ ॥ कैसें होईल तें मी नेणें । भूत भविष्य वर्तमाने । अ-ल्पबुद्धी माझें जिणें । मूढपणें वर्तणूक ॥ ३ ॥ यालागीं तुमचें धरिलें नाम । तुमचें स्तवनीं ठेविलें प्रेम । न कळे आणिक न चले नेम । साधन दुर्गम मज वाटे ॥ ४ ॥ नेणें तिर्थी पलायन । नेणें मंत्राचें पुरश्चरण । नेणें योगयाग सांख्यज्ञान । नेणें करूं ध्यान तुमची पूजा ॥ ५ ॥ नेणें कैसी माझी करुणा । येईल तुम्हां नारायणा ॥ नेणें वर्णूं तुमच्या गुणा । नेणें धारणा व्रत निष्ठा ॥ ६ ॥ नाहीं वाचा संस्कार । नाहीं घोकिलें जी अक्षर ॥ नेणें करूं यज्ञाचार । स्वधर्म तोहि विधियुक्त ॥ ७ ॥ निळा म्हणे सर्वापरी । आहें मूर्ख मी श्रीहरी ॥ ताराल ऐसिया नवल तरी । तुमची थोरी प्रगटेल ॥ ८ ॥

३२१ माझीया मना समाधान । द्यावें वचन अभयाचें ॥ १ ॥ नि-र्भय तेणें राहेन सुखें । हरिनाम मुखें आळवित ॥ २ ॥ नलगे महिमा मान प्रतिष्ठा । न म्हणे वैकुंठा मज न्या हो ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुल्या पायीं । ठेवाल ठायीं राहेन ॥ ४ ॥

३२२ माझिया भावाचें खंडन । नव्हे ऐसें करा दान ॥ मुखीं नाम तुमचें स्मरण । राहो चरणांवरी दृष्टी ॥ १ ॥ आणखी मी न मागें कांहीं । वसो प्रेम तुमच्या ठायीं ॥ करूनी कृपा आठव देई । आवडी कीर्तनीं सर्वदां ॥ २ ॥ सुखें भोगीन प्रालब्ध ठेवा । येईल तैसा वोढवोनि देवा

॥ मानामान न करीं हेवा । विसर न पडवा तुमचाची ॥ ३ ॥ काय करतील निंदक जन । आसना ठायीं सावधान ॥ तुमचें करितां नित्य चिंतन। केचें बंधन आम्हां दासां ॥ ४ ॥ गाईन गुण तुमचे गीती । विषयवासनादिकां शांती ॥ तुमच्या पायी जडतां प्रीती । निळा विनंति करी ऐसी ॥ ५ ॥

३२३ माझे बोल नव्हती फोल । जाणे विठ्ठल अंतरींचे ॥ १ ॥ पुरवील तेचि मनींचा हेत । येईल धांवत करुणाब्धी ॥ २ ॥ वागविती दया पोटीं । आम्हासाठीं कृपाळु ॥ ३ ॥ निळा म्हणे भरंवसेनि । नामें वदनीं आळवितां ॥ ४ ॥

३२४ माझें मस्तक तुझ्या पायीं । ऐसें करीगा विठाबाई ॥ १ ॥ अहर्निशीं तुझें ध्यान । मुखें नाम संकीर्तन ॥ २ ॥ हृदयीं वसावें येऊन । करी माझें समाधान ॥ ३ ॥ निळा म्हणे हे वासना । माझी पुरवी नारायणा ॥ ४ ॥

३२५ मी तो दीन नेणे रंक । परि तुम्ही चालक ब्रह्मांडा ॥ ॥ १ ॥ केले अपराध क्षमा करा । काय ग्यां दातारा विनवावें ॥ ॥ २ ॥ येवढेंचि आहे माझे हातीं । यावें काकुळती तुम्हांसी तें ॥ ३ ॥ निळा म्हणे उचित जागा । आपुल्या हो श्रीरंगा पंढरीच्या ॥ ४ ॥

३२६ येउनी केव्हां भेटी द्याल । समोखाल मज आतां ॥ १ ॥ वाट पाहे दिवसरातीं । नलगे चित्ती अन्न गोड ॥ २ ॥ धन मान होत वित्त । न रुचे मात मज त्याची ॥ ३ ॥ निळा म्हणे जीवदान । द्या मज भेटोन आतां ॥ ४ ॥

३२७ राहोनियां सत्संगतीं । गावी कीर्ती तुमचीच ॥ १ ॥ हेंचि देई नलगे दुजें । अंतर माझें जाणोनी ॥ २ ॥ धन मान नलगे देवा । अवघा ठेवा गुंडुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे जगदीशा । हेचि आशा बहु काळ ॥ ४ ॥

३२८ वाचा नामसंकीर्तनीं । मानस तुमच्या निश्चयें ध्यानीं ॥ नेत्र तुमच्या अवलोकनीं । चालावें चरणीं तीर्थयात्रे ॥ १ ॥ करीं करावें तुमचें पूजन । श्रवणीं करावें गुणांचें श्रवण ॥ चित्तें सदा तुमचें चिंतन । घ्राणीं अवघ्राण निर्माल्य तुळसी ॥ २ ॥

बुद्धीसी तुमची बोधकता । मीवीं तुमची राहो आस्था । तुमचे चरणीं निःश्चळ माथा । अखंडता अखंड ॥ ३ ॥ सकळ इंद्रियां तुमची प्राप्ती । भगवद्भावना राहो भूती ॥ द्वैषाद्वेष तो तुमचे विरती । द्यावें श्रीपती हें दान ॥ ४ ॥ कामक्रोधाचें न व्हावें दर्शन । मका आशातृष्णेचें बंधन । ठेवा आपुल्या पायीं जीवन ॥ द्यावें समाधान सर्वदां मना ॥ ५ ॥ कीर्तन नित्य काळ देवा तुझें । उतरीं मी हें माझें ओझें ॥ आपुल्या गुणीं नाचवी भोजें । जिव्हा नामीं रंगों द्या ॥ ६ ॥ निळा म्हणे कृपानिधी । माझी मोडावी द्वैतबुद्धि । अवघी तो उपाधी । स्थापा निज पदीं शरणागता ॥ ७ ॥

३२९ विश्वास अंतरींचा जाणोनी । नाम ठेवा माझ्या वदनीं । रूप मनाचे आसनीं । कृपा करूनी बैसवा ॥ १ ॥ करीन तैसी घ्यावी सेवा । विश्वास पालटों न द्यावा ॥ आईका विनविलें तें देवा । अहो पंढरीनिवासा ॥ २ ॥ माझिये बुद्धीसी धैर्य द्यावें । सेवेसी इंद्रियां राबवावें ॥ आपुल्या पदीं बैसवावें । वृत्तीसी माझ्या दातारा ॥ ३ ॥ निळा म्हणे पांडुरंगा । देई मज अंगसंगा ॥ चित्त राहो उगा । माझें तुमच्या पायांपें ॥ ४ ॥

३३० विश्वास माझा जतन करा । विश्वंभरा पायांपें ॥ १ ॥ मग मी तुम्हां न वचें दुरी । ठेवीन वरी जीवभाव ॥ २ ॥ आळवीन उत्तम नामें । तुमचींच प्रेमें सन्मुख ॥ ३ ॥ निळा म्हणे कूर्मदृष्टी । करा वृष्टी अमृतें ॥ ४ ॥

३३१ वियोगाच्या दुःखें । आळवितो करुणा मुखें ॥ १ ॥ कृपावंते माझे आई । धांव घाली वो विठाई ॥ २ ॥ देऊनियां भेटी । आतां अवलोकावें दिठी ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रेमपान्हा । माजी लावूनि स्तना ॥ ४ ॥

३३२ सर्वकाळ चित्त ठायीं । राहो पायीं तुमचिये ॥ १ ॥ ऐसें करा कृपादान । कर जोडून विनवितों ॥ २ ॥ सर्वकाळ ध्या ध्यानीं मनीं । न पडो चिंतनीं विसर ॥ ३ ॥ निळा म्हणे पंढरीराजा । करा हो माझा अंगीकार ॥ ४ ॥

२३३ सर्व गुणीं गुणमंडिता । सर्व रूप रूप शोभिता । सर्वी सर्व तूं अनंता । यश वागविता निज कीर्ति ॥ १ ॥ ऐसी असोनियां शक्ति । दवडना कां माझी आर्ती ॥ चरण पहावया चित्तीं । वर्ते चिंता अनिवार ॥ ॥ २ ॥ काय नाहीं तुमच्या हातीं । सकळ ब्रम्हांडाच्या व्यक्ती ॥ पडा मोडा निमिषाप्रती । धरा आवडतीं रूपें तैसीं ॥ ३ ॥ मासा कासव डुकर होणें । नृसिंह वामन रूप ठेंगणें ॥ ब्रम्हचर्य आणि फरश धरणें । वंश निपातनें क्षत्रियाचा ॥ ४ ॥ परमात्मा आणि राज्य करी । एक पत्नीव्रत शिळातारी ॥ सत्यवचना एक बाणधरी । रावणारी मदनमूर्ति ॥ ५ ॥ नंदानंदन गुणातीत । लीलाविग्रही ऐश्वर्यनाथ । कामिनी भोगूनी कामातीत ॥ उच्छिष्टें स्वीकारित गौळियांचीं ॥ ६ । बौध्य कलंकिया हयग्रीवा । नामें रूपें नटलेति देवा ॥ निळा म्हणे माझिया भावा । रूप भेटवा चतुर्भुज ॥ ७ ॥

२३४ सत्य आणि मिथ्या जाणा अंतरींचें । तुम्ही सकळांचें सर्व जाणां ॥ १ ॥ म्हणऊनियां करा अनाथाचा धावां । उठाउठी देवा पाचारितां ॥ २ ॥ नचले झांकिलें तुम्हांपुढें कांहीं । असा अंतर्बाही व्यापूनि-यां ॥ ३ ॥ जिवीं एक दावी बोलोनि आणीक । तरि मज सकळिक दुषिती संत ॥ ४ ॥ निळा म्हणे माझें सबाह्य अंतर । तुम्ही निरंतर जाणतसां ॥ ५ ॥

२३५ सांगावें उगवुनी न कळे तयासी । तुम्ही तो मानसीं साक्ष माझें ॥ १ ॥ विश्वाचे व्यापक चाळक चित्ताचे । साक्षी अंतरींचे जेथें तेथें ॥ २ ॥ ब्रम्हादिक देव तेहि आज्ञाधार । तुमचें किंकर काळ काम ॥ ३ ॥ निळा म्हणे माझा करा अंगीकार । हेंचि निरंतर विन-वितसें ॥ ४ ॥

२३६ सेल दिली मागा ऐसी । जें जें तुम्हांसी आवडे ॥ १ ॥ तरी द्याहो आपुलें नाम । अखंडित प्रेम नैसर्गीक ॥ २ ॥ सर्वकाळ राहो चित्तीं । सगुण मूर्ती तुमची हे ॥ ३ ॥ निळा म्हणे नित्य नवी । कीर्तनीं द्यावी नित्य आवडी ॥ ४ ॥

२३७ सोरत आलों तुमच्या नावें । पुरें ग्रामें ठाकित ॥ १ ॥ आंता चरण दावा दृष्टी । घालों कंठीं निर्वाण्य ॥२॥ असंतिसां रानें

धनें । पुरलें पेणें येथवरी ॥३ ॥ निळा म्हणे आलिंगन । द्याहो घालून कर कंठीं ॥ ४ ॥

३३८ हेचि चिंता दिवस रातीं । राहिली चित्तीं न ढळे ते ॥ १ ॥ कराल माझा अंगीकार । किंवा दूर भोवंडाल ॥ २ ॥ बहुत जन्म घेतां कष्टी । झालों त्रिपुटी दुःख शोकें ॥ ३ ॥ निळा म्हणे यावरी आतां राखा अनंता चरणापें ॥ ४ ॥

## आपल्या स्थीती संबंधानें देवास उद्गार.

३३९ ॐ नमोजी पंढरिराया । हृत्कमलवासीया गुरुनाथा ॥ १ ॥ तुमचा अनुग्रह लाधलों । पात्र झालों महा सुखा ॥ २ ॥ सकळ संत करिती कृपा । दाविला सोपा निज मार्ग ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवस रातीं । गातों वक्रीं गुण नाम ॥ ४ ॥

३४० अनुसरलों जिवें भावें । नेणों आपुलें परावें ॥ १ ॥ तुम्हांविण पंढरीनाथा । नाठवे कांहींच सर्वथा ॥ २ ॥ चित्तें मनें काया वाचा । जिहीं संकल्प हा तुमचा ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवस रातीं । नाहीं विसराची भ्रांती ॥ ४ ॥

३४१ अमृताहुनि गोड हरी । नाम उच्चारितां वैखरी ॥ १ ॥ घेतां न विटाचि हे रसना । अधिक अधिक आवडी मना ॥ २ ॥ चित्ताभि विश्रांती । इंद्रियें सुखावलीं ठाती ॥ ३ ॥ निळा म्हणे गोडागोड । सेवितां सरे अवघी चाड ॥ ४ ॥

३४२ अवघा काळ हेंचि ध्यान ॥ तुमच्या चिंतन नामाचें ॥ १ ॥ करूं देवा हे सूचना । ठउनी चरणांवरी दृष्टी ॥ २ ॥ गुण चरित्रें श्रवण करूं । अर्थ विचारूं मानसीं तें ॥ ३ ॥ निळा म्हणे अवघा धंदा । कीर्तन गोविंदा तुमचें तें ॥ ४ ॥

३४३ आणिलीं उपायें । सांडीयेले ते अपाय ॥ १ ॥ तुमच्या नामा-

विण हरी । नेणों दुजी कांहीं परी ॥ २ ॥ सांगती साधनें । परी ते वाटती बंधनें ॥ ३ ॥ निळा म्हणे देवा । जैसी तैसी घ्यावी सेवा ॥ ४ ॥

३४४ आतां माझिया भक्तिभावा । पावला देवा नेदावा ॥ १ ॥ मग मी नाचेन कीर्तनमेळीं । नामावळी आळवित ॥ २ ॥ ओंवाळुनि सांडीन काया । वरुनि पायां जिव प्राण ॥ ३ ॥ निळा म्हणे वाढतां प्रेमा । पुरुषोत्तमा करावा ॥ ४ ॥

३४५ आठवितांचि रूप मनीं । जाय कल्पना विरोनी ॥ १ ॥ आता तूंचि तूं अवघा । मीं हें नुरे माझिया भागा ॥ २ ॥ बुद्बुद आपुला पाहे । तंव तो सिंधुचि होऊनि राहे ॥ ३ ॥ निळा म्हणे बोलवा बोली । बोला तुम्ही ते आपुली ॥ ४ ॥

३४६ आवडोनि रूप मनीं । धरिलें वदनीं हरिनाम ॥ १ ॥ नलगे आणिक कांहीं चिंता । गोडचि आता यावरी ॥ २ ॥ काय करूं ते आसनमुद्रा । कृपासमुद्रा तुजविण ॥ ३ ॥ निळा म्हणे दिधलें संतीं । नाम एकांतीं तेंचि गोड ॥ ४ ॥

३४७ आबद्ध वाचा मतिहीन । बुद्धी मळीण विषयलोभें ॥ १ ॥ परि तुम्ही कृपावंत । कां हें वदवितां मी नेणें ॥ २ ॥ नकळे अर्थप्रमेय तंतु । हेतु मातु दृष्टांतही ॥ ३ ॥ निळा म्हणे पुरुषोत्तमा । जाणा महिमा तुमचा तुम्ही ॥ ४ ॥

३४८ आहे आरुष बोलणें । नव्हे नाणें टांकसाळी ॥ १ ॥ नका घेऊं खर्‍यासाठीं । यईल तुटी एखादी ॥ २ ॥ पाहतां ठसा कळवरी । अभ्यंतरीं गैरसाळ ॥ ३ ॥ निळा म्हणे निवडुनी ठेवा । आतां देवा एकीकडे ॥ ४ ॥

३४९ आंधळिया उगवोनी रवी । न दिसेचि तेवि मज झालें ॥ १ ॥ तेंवी तुम्ही स्वतःसिद्ध हरी । परि मी माझारी भ्रांतीतरा ॥ २ ॥ रोग्या रसने कैंची गोडी । जे ते निवडी रसस्वाद ॥ ३ ॥ निळा म्हणे वेडिया गोत । नाढळे धन वित्त दरिद्रिया ॥ ४ ॥

३५० इतर साधनीं उपाव । करिती ते ते आह्मां देव ॥ १ ॥ काय जाणिलें तिहीं । पडिले साधनांचे वाहीं ॥ २ ॥ कोण लाभ कैसी गती काय पावती ते अतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे नेणों आम्ही । तुमच्या नामें-विण स्वामी ॥ ४ ॥

३५१ उगाचि वदवितां कां गा । बाबा माझी पांडुरंगा ॥ १ ॥ कोणा न रुचे ऐकतां । हांसों लागती तत्वतां ॥ २ ॥ म्हणती रचिलें हें पाखांड । सैरा वाजविलें तोंड ॥ ३ ॥ निळा म्हणे आतां ठेवा । दिल्हा थोकार तो हा देवा ॥ ४ ॥

३५२ उदंडाचें धांवणें केलें । तुम्ही तें ऐकिलें पुराणीं ॥ १ ॥ म्ह-णोनिया विश्वास झाला । संतींही सांगितला बहुता परी ॥ २ ॥ माझेंहि मज हिताचि वाटे । करितां गोमटें कीर्तन ॥ ३ ॥ निळा म्हणे न सोडीं पाय । होईल काय हो तें सुखें ॥ ४ ॥

३५३ एकचि अक्षर वाचेसि येतां । पुढें वाढवितां विस्तारें ॥ १ ॥ कां हे चेष्टविली वाणी । माझी चक्रपाणी मी नेणें ॥ २ ॥ आईता जोडुनियां रस । लावितां सारांश निवडूना ॥ ३ ॥ निळा म्हणे आतां तर जाणा । तुम्ही सुजाणा कृपाब्धी ॥ ४ ॥

३५४ एवढासा माझा भाव तो कायी । तेवढाचि तुमचिये ठेविला पायीं ॥ १ ॥ परी तुमचें अगाध देणें । जाणवलें यावरि उदारपणें ॥ २ ॥ एवढिसी माझी मति ते किती । तेवढिचि वाढवुनि केली सरती ॥ ३ ॥ ए-वढेंसे तुम्हां गाईलें जि देवा । तेवढेंचि स्वीकारुनी तोषलेति भावा ॥ ४ ॥ एवढीशी माझी वाचा ते किती । तेवढिचि आपुलिये लाविली स्तुति ॥ ५ ॥ एवढासा निळा एवढीसी भक्ती । अपारचि तुम्हीं मानिली प्रीती ॥ ६ ॥

३५५ ऐशा परि नमन माझें पंढरीनाथा । तूंचि होऊनि तुजमाजि झालों मी सरता ॥ १ ॥ नये कळों कांहीं आतां . एकानेक भाव । तुजमाजि मीही मजमाजि तूं सर्व ॥ २ ॥ नाम रूप तूंचि माझें क्रिया कर्तव्य । का-

यिक वाचिक मानसिक जे निपजती भाव ॥ ३ ॥ निळा म्हणे मी तूं उपाधी सारुनियां परती । राहों जैसे होतों तसे निजरूप एकांतीं ॥ ४ ॥

३५६ ऐसा नीळा नित्यानंदीं निमग्न केला । देऊनीयां नामस्मरण चरणीं स्थापीला ॥ १ ॥ तेणें ब्रम्हानंदें गर्जे नाम वैखरी । आठवूनी रूप तुमचें हृदय मंदिरी ॥ २ ॥ नेणे आपपर नेणे जन विजन । नेणोनियां कांहींचि नुरवी देहाचें भान ॥ ३ ॥ निळा म्हणे हाचि माझा ऐश्वर्य भोग । काया वाचा मानस अवघा पांडुरग ॥ ४ ॥

३५७ ऐसिया बेगडी नका गोऊं आम्हांसी । अनुसरलों सेवेसी तुमचें नामचिंतनी ॥ १ ॥ नाना मतांतरें त्यांचे अर्थ विपरीत । नेऊनियां घालित मुखीं काळाचे सर्व ॥ २ ॥ नाना तर्कवाद भेदबुद्धी जल्पन । कैचें समाधान तेथें दर्शन तुमचें ॥ ३ ॥ निळा म्हणे देखोनी ऐसें वाटतसे भय । न सोडूं ते पाय तुमचे सापडलें विटे ॥ ४ ॥

३५८ ऐसिये सांपडलों संदी । सर्वदा द्वंद्वीं काळाचे ॥ १ ॥ कैसा सुटका होईल आतां । न लक्षेचि सत्ता कर्मगती ॥ २ ॥ नैष्कर्म्य ऐसें भासे । परि तें नेतुमे सकामी ॥ ३ ॥ निळा म्हणे देखोनि भ्यालों । ह्मणोनि आलों शरण तुम्हां ॥ ४ ॥

३५९ करीन कैवाड हाचि अनुदिनीं । तुमच्या चिंतनीं पांडुरंगा ॥ १ ॥ नेदी जाऊं वांया घटिका एकी पळ । करूं सर्वकाळ हेचि चर्चा ॥ २ ॥ संतसमागमें गाऊं नित्य नामें । आपुलिया प्रेमें आवडिच्या ॥ ३ ॥ आठवूं सुंदर रूप मनोहर । कटावरी कर ठेविले ते ॥ ४ ॥ निळा म्हणे मंझीं मनींची आवडी । दाविली उघडी करुनियां ॥ ५ ॥

३६० कवण्या योगें तल्लिनता ॥ ऐशी जडोनी ठेली चित्ता ॥ १ ॥ हें मी नेणे गा श्रीपती । तुमची करणी तुम्हा हातीं ॥ २ ॥ बुद्धि इंद्रियाचें कोड । पुरउनी वाचा केली वाड ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवसरातीं । न कळे केव्हां जाती येती ॥ ४ ॥

२६१ कवळुनियां कृपामोहें । माझे संदेह निरासले ॥ १ ॥ लांचाविली माझी वाणी । आपुल्या गुणीं वळुनियां ॥ २ ॥ नाचों शिकवितां पुढें । धरूनियां कोडें करकमळीं ॥ ३ ॥ निळा म्हणे माझी गात्रें । तुम्हीं सूत्रें चेष्टविलीं ॥ ४ ॥

२६२ काय घाल तुम्हीं देवा । घ्यावी सेवा आमुचीच ॥ १ ॥ पूर्वींपासुनि करित आलों । कळाहृलों अभ्यासें ॥ २ ॥ घाल तें तें अवघें मिथ्या । आम्हां सत्या न रुंडूं ॥ ३ ॥ निळा म्हणे जीवन आह्मा । पुरुषोत्तमा दास्यत्व ॥ ४ ॥

२६३ काय सांगों सुखानंद । झाला अंतरीं तो बोध ॥ १ ॥ भजतां तुम्हांसी विठ्ठला । मनीं प्रेमा वोसंडला ॥ २ ॥ नाठवेची कांहीं आतां । ऐसा मेघ झाला चित्ता ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशी परी । झाली नवलचि वाटे हरी ॥ ४ ॥

२६४ कांहीं मानदंभासाठीं । नाहीं केली म्यां हे अटी ॥ १ ॥ तुम्ही तों जाणता अंतर । काय तेथें परिहार ॥ २ ॥ लोकनिंदा वाटे बरी । आम्हा भूषण तें श्रीहरी ॥ ३ ॥ निळा म्हणे वहातीं करा । वाट पुढें जगदोद्धारा ॥ ४ ॥

२६५ कांहीं चमत्कार देखती । विश्वासें तरि वाटे प्रीती ॥ १ ॥ ऐसा विपरित आहे मोळा । जाणा येथींचा जी गोपाळा ॥ २ ॥ येऱ्हवीं काणी पुकासाठीं । नाम नुच्चारिती ओठीं ॥ ३ ॥ निळा म्हणे नारायणा । म्हणोनि दाविली सूचना ॥ ४ ॥

२६६ कोटी जन्म घेईन देवा । करीन सेवा तुमचीच ॥ १ ॥ भुक्ति मुक्ति नका आड । घालूं सांकड मज वाटे ॥ २ ॥ काय करूं ते आत्मस्थिति । खंडन करिती भजनाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे राहो ठायीं । विश्वास पायीं तुमचिये ॥ ४ ॥

२६७ चित्त टेउनि पायावरि । रूप धरूनियां अंतरीं ॥ १ ॥ सुखें

याच्या नामावळी । आठवीन नित्यकाळीं ॥ २ ॥ करीन ऐसाची कैवाड । शंका येऊं नेदी आड ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवसराती । तुम्हां आठवीन श्रीपती ॥ ४ ॥

३६८ चुबकळूनि काढिलीं । अक्षरें घोळिलीं ब्रम्हरसें ॥ १ ॥ ऐसे तुष्टलेती देवा । माझिया भावासारिखे ॥ २ ॥ अर्थ चातुर्य तें मी नेणें । तुमचें करणें तुम्ही जाणा ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वत्र साक्षी । याला गीं कै पक्षी दीनाचें ॥ ४ ॥

३६९ जाणतसां जगीं अंतरींचें । तरी कां हे वाचे वदवितां ॥ १ ॥ केविलवाणे तुमचे दास । देखतां उपहास होतील ॥ २ ॥ जग निंद्य आधीं करा । मग तुम्ही धरा निज करीं ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशी रीत । नाहींचि शोभत संतांसी ॥ ४ ॥

३७० जाणों जातां तुम्हा जाणींवचि विरे । तुमच्या निजध्यासें मनाचि मुरे ॥ तुमचिये भेटीं अंगचि नुरे । वाचाहि वोसरे स्तवितां तुह्मा ॥ १ ॥ ध्यानें तुमच्या जिवचि हारपे । तुह्मासी जाणता बुद्धीचि करपे । तुमच्या चिंतनें चित्तहि विसर्पे । मिसळे चिद्रूपें चैतन्येंसी ॥ २ ॥ तुमच्या आठवें निळाची नाहीं । तुम्हीचि अवघे अंतर्बाहीं ॥ तुम्हाविण दुसरें नुरेचि कांहीं । नाम रूप तेंहि अवघें तुम्ही ॥ ३ ॥

३७१ जाणोनिया मनोभाव । केला सर्व परिपूर्ण ॥ १ ॥ ऐसेचि तुम्ही कृपासिंधु । दीनबंधु सर्वदां ॥ २ ॥ करूनियां कृपादृष्टी । केली वृष्टि अमृतें ॥ ३ ॥ निळा म्हणे देउनी वर । मतिविस्तार वाढविला ॥ ४ ॥

३७२ जीवाचा ही जीव तूंचि प्राणांचा प्राण । नयनाचेंहि नयन तूंचि घ्राणाचें घ्राण ॥ १ ॥ सर्वही इंद्रियभाव तूंचि माझे श्रीहरी । तुजविण न दिसे पाहतां मज मी माझारीं ॥ २ ॥ चित्ताचेंहि चित्त तूंचि मनाचें मन श्रवणाचेंहि श्रवण तूंचि रसनेची रसना ॥ ३ ॥ निळा म्हणे तूंचि माझा सर्वहि व्यापक । देहादेहीं शोधूनि पाहतां न दिसे आणिक ॥ ४ ॥

३७३ जीवें भावें जोडिलें होतें । पूर्वफळातें आजीं आलें ॥ १ ॥ अंगीकार तुम्हीं केला । मुखींचा दिधला प्रसाद ॥ २ ॥ अभयदानें सुखी केलें । दाखिलीं पाउलें सतेज ॥ ३ ॥ निळा म्हणे चरणीं थारा । दिधला किंकरा अनाथा ॥ ४ ॥

३७४ जे जे बोलवितां बोल । अर्थ सखोल त्यांमाजीं ॥ १ ॥ आवडी ऐसें आपुलें देवा । वदवा रंजवा आपणिया ॥ २ ॥ सारूनियां लौकिक लाज । नाचवा भोज कवतुकें ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपातरणी । प्रकाशवाणी करुनियां ॥ ४ ॥

३७५ जेववाल तेंचि जेवीन सुखें । पांघरवाल सुखें पांघरेन ॥ १ ॥ बैसवाल तेथें उगाचि बैसे । न करूनिया आस आणिकांची ॥ २ ॥ निळा म्हणे जें कराल तें तें । होईन आज्ञेतें तुमच्यां ॥ ३ ॥

३७६ ठेवा पायांपाशीं । राहेन मी सावकाशी ॥ १ ॥ करूनियां तुमचें ध्यान । मुखीं नामाचें चिंतन ॥ २ ॥ नेदीं कांहीं आड येऊं । आशा कल्पनेचा भेऊ ॥ ३ ॥ निळा म्हणे तुमचीं करूं । सेवा चरण हृदयीं धरूं ॥ ४ ॥

३७७ ठेवाल तेथें राहेन सुखें । यावरी हारिखें आपुलिया ॥ १ ॥ न वेंची मी हे सेवेसी काया । धाडाल ठाया जाईन त्या ॥ २ ॥ घाल ग्रास तो घालिन मुखीं । न करीं आणखी सोस कांहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कराल आज्ञा । न मोडीं प्राज्ञा तुमची ते ॥ ४ ॥

३७८ ठेऊनियां भाव तुमाचिये चरणीं । बैसेन श्रवणीं वैष्णव करितां कीर्तन ॥ १ ॥ याचिपरी सार्थक हा करीन काळ । जाऊ नेदीं निर्फळ ऐसें आयुष्य नरदेह ॥ २ ॥ यथामती वर्णीन तुमचे कीर्ति पवाडे । नाचों-नी बागडे निर्लज्ज होउनी मानसीं ॥ ३ ॥ निळा म्हणे हेंचि आर्त निरं-तर माझें । चरण यासी साक्ष तुझे पंढरीनाथा ॥ ४ ॥

३७९ ठेउनी चित्त पायांवरी । करीन चाकरी मनोभावें ॥ १ ॥

भोगवांछे तें भोगीन भोग । न वेचीं अंग तिळतुल्य ॥ २ ॥ आज्ञा तुमची वंदीन शिरीं । धरीन अंतरीं सांगितलें ॥ ३ ॥ निळा म्हणे अखंड निरत राहेन सतत सेवेचिये ॥ ४ ॥

३८० तप साधन हेंचि माझें । गाईन तुझें नाम हरी ॥ १ ॥ आणिका साधनीं उबग आला । विश्वास उपजला येचिविशीं ॥ २ ॥ कळा कुसरी न येती मना । वांचुनी चिंतना तुमचिया ॥ ३ ॥ निळा म्हणे वाचे बोली । पडिली चाली याची परी ॥ ४ ॥

३८१ तुम्ही ये संगत । आम्ही लागलों नेणतीं ॥ १ ॥ परि तूं कृपावंत हरि । सांभाळिसी सर्वां परि ॥ २ ॥ शहाणे तूंतें चोजविती । उदासी तूं तयांप्रती ॥ ३ ॥ निळा म्हणे भाविकाला । म्हणवी अंकीत मी त्याला ॥ ४ ॥

३८२ तुमच्याचि चरणाचा महिमा । नेणा तुम्ही पुरुषोत्तमा ॥ १ ॥ आम्हा दासांचें जीवन । घडे अमृताचेंचि पान ॥ २ ॥ वृक्ष नेणती फळांची गोडी । भोक्तेचि जाणती ते आवडी ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणती संत । भक्त तुमचे ते भाग्यवंत ॥ ४ ॥

३८३ तुमच्या बळें निःशंक मनीं । गाऊं वदनीं हरिनाम ॥ १ ॥ कळिकाळ तोंही वंदी माथा । तुमच्या शरणांगता भिऊनियां ॥ २ ॥ नुपेक्षी त्या पंढरिनाथा । जाणोनि स्थापित संताचा ॥ ३ ॥ निळा म्हणे भूमंडळीं । संत महाबळी विदीत ॥ ४ ॥

३८४ तुमच्या पायीं जडतां मन । नाहीं प्रयोजन शब्दांचें ॥ १ ॥ तरि हे कां जी चेतविली । गुणीं प्रेतविली मति माझी ॥ २ ॥ दिवस रात्रीं न पुरे लिहितां । उठती चळथा अक्षरांच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे लाविला धंदा । न कळे गोविंदा लीला तुमची ॥ ४ ॥

३८५ तुमच्या पायीं ठेवितां. चित्त पुरले हेतु सकळ ॥ १ ॥ बरवें र्म हें हातां आले । संतीं दिधलें दाखवूनि ॥ २ ॥ बरवें उच्चारिलें नाम

जिव्हें काम मारूनी ॥ ३ ॥ निळा म्हणे आठव धरिला । बरवा सांगितला तो संती ॥ ४ ॥

३८६ तुम्हां आम्हां नित्य भेटी । नाहीं तुटी कल्पांती ॥ १ ॥ प्रभा केवि सांडी भानु । हुताशनु दिप्तीतें ॥ २ ॥ मृत्तिकेतें करूनी घटु कैचा पटु तंतुविण ॥ ३ ॥ निळा म्हणे आम्हांवीण । नाहींच देवपण तुम्हांसी ॥ ४ ॥

३८७ तैसे तुमच्या योगें थोर । आम्ही पामर जीवजंत ॥ १ ॥ गाऊं वानूं तुमच्या गुणा । तेणें भूषणा वाढलों ॥ २ ॥ कस्तुरीसंगें मृत्तिका जैसी । विकें कनकेसी समान ॥ ३ निळा म्हणे पुरुषोत्तमा । अपार महिमा हा तुमचा ॥ ४ ॥

३८८ दुजें नणोनियां कांहीं । आठवितो तूतें देहीं ॥ १ ॥ यासी साक्षी तूंचि कीं गा । अंतरींचा पांडुरंग ॥ २ ॥ जे जे उठती संकल्प । मनीं तें तें तुमचें रूप ॥ ३ ॥ निळा म्हणे चित्ते वित्ते । होतें जें जें कांहीं जातें ॥ ५ ॥

३८९ दुरी ठेली कर्माकर्मे । तुमच्या धर्मे विठोबा ॥ १ ॥ आळवितां मुखी नाम । सकळही काम परिपूर्ण ॥ २ ॥ होतें संचित जोडलें कांहीं । ठेविलें पायीं तुमचे तें ॥ ३ ॥ निळा म्हणे माझें मन । वाटे गुज आतुडलें ॥ ४ ॥

३९० देतां घेतां येतां जातां । सदा तुझी सन्निधता ॥ १ ॥ नाहींचि कल्पांतीं वियोग । ऐसें व्यापियलें अंग ॥ २ ॥ स्वप्न निद्रे आणि जागृती । अवघे ठाहीं तुझीचि स्तुती ॥ ३ ॥ निळा म्हणे देखे ऐके । संगें तुझ्या जें जें चाखे ॥ ४ ॥

३९१ दोन्ही डोळां अवलोकितां । धणी न पुरे पंढरीनाथा ॥ १ ॥ चित्त वेधलें चिंतनें । मनहि तदाकार ध्यानें ॥ २ ॥ वाचा कुंठित राहिली । बुद्धीहे [illegible] प्रज्ञाचि ठेली ॥ ३ ॥ निळा म्हणे अवघेंच अंग । रंगलीं त्याचीं विठ्ठलरंगें ॥ ४ ॥

३९२. दोरीचाचि सर्प परि होय मारक। संदेहकारक नोळखतां ॥ ॥ १ ॥ तैसी परी केली तुम्हां माझ्या कर्मे । सांडविलें नेमें स्वधर्मासि ॥ ॥ २ ॥ लटक्याचि झकवणें दचक बैसला । परि तो प्राण हरूनियां ॥ ॥३॥ निळा म्हणे तुम्हां कुंठिताचि केलें । ऐसें माझें झालें कर्म बळी ॥४॥

३९३ धाडाल तेथें जाईन देवा । सांगाल सेवा तेचि करीन ॥ १ ॥ लेववाल तें लेईन लेणें । मिरवीन भूषणें कराल तें ॥ २ ॥ सांगाल तेचि ऐकेन गोष्टी । धरुनियां पोटीं राहेन अर्थ ॥ ३ ॥ निळा म्हणे गेईन मार्गे । तुम्ही न्याल संगें त्याचि स्थळां ॥ ४ ॥

३९४ ध्यानीं रंगलें मानस । जिव्हे नामाचा उल्हास ॥ किर्तन आवडे श्रवणांस । नेत्रहीं स्वरूपास भाळले ॥ १ ॥ वाचा लांचावली गुणा । तुमच्या नाम संकिर्तना । देह घालि लोटांगणा । मस्तक चरणां सोकावला । २ ॥ ऐसी अवयवींच अवघ्या ठायीं । पडलीं तुमचिये प्रवाहीं । तुम्हांवीण दुजें कांहीं । कोणा नाठवे सर्वथा ॥ ३ ॥ देखिलें तें विटेवरी । राहिलें डोळियांभीतरीं । ते अवघिया एकचि सरी । वेधुनिया ठेविलें ॥ ४ ॥ निळा म्हणे नव्हे आतां । पालट केलियाही सर्वथा । नामें रूपें पंढरीनाथा । लाविलें पंथा आपुलिया ॥ ५ ॥

३९५ न घालीं मी सांकडें । तुम्हां संसाराचें कोडें ॥ १ ॥ नाम गाईन आवडी । पुढें नाचोनी बागडी ॥ २ ॥ ध्याईन मानसीं । रूप तुमचें अहर्निशीं ॥ ३ ॥ निळा म्हणे यावरि करा । कृपा रुक्मादेवीवरा ॥ ४ ॥

३९६ न पडे आतां दिवसराती । विसर तुमचा श्रीपती ॥ झाली इंद्रियां विश्रांति । रंगली नामचिंतनें ॥ १ ॥ वदनीं सुंदर तुमचें नाम । डोळिया रूप मेघश्याम । श्रवणीं ऐकता उत्तम । गुण तुमचे गोविंदा ॥२॥ हातें वाजवितां टाळी । चरणें नृत्य कथाकाळीं । गोजिरें ध्यान हृदयकमळीं । तेंचि ठसावोनि राहिलें ॥ ३ ॥ मस्तक म्हणे चरणांवरी । माझा ठाव निरंतरीं । जिव्हा रंगली नामोच्चारीं । न राहे क्षणभरी आठवितां ॥ ४ ॥

निळा म्हणे माझा हेत । होउनी ठेला मुद्रांकित । सदा सर्वदा गावें गीत । हेंचि चिंतूनि राहिला ॥ ५ ॥

३९७ न मागों कांहीं तुम्हां धन वित्त संपत्ति । सोसुनी विपत्ती नाम गाऊं आवडी ॥ १ ॥ न घेऊनियां भार जाणीव शहाणीव माथां । करूं तुमची कथा नित्यकाळ आवडी ॥ २ ॥ बसउनि संतसमुदाय भोंवतें । गाऊं नाचूं प्रेमें आठवुनि तुमतें ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशापरी सारूं आयुष्य । करूनिया दास्य राहों तुमचे चिंतनीं ॥ ४ ॥

३९८ न सांडाल तुम्ही आपुल्या विहिता । परी मी करितों चिंता मूर्खपणें ॥ १ ॥ रवि केवीं सांडी आपला प्रकाश । अमृता मिठांश जीवविता ॥ २ ॥ परी मीं अधीर न धरितां धीर । करीं करकर रुसोनिया ॥ ३ ॥ निळा म्हणे झाले अपराध ते क्षमा । करा पुरुषोत्तमा विनवूं काय ॥ ३ ॥

३९९ नाम वाचें आठविलें । रूप मनीं सांठविलें ॥ १ ॥ आता फिरुनियां घरा । येशी आपणचि माघारा ॥ २ ॥ लाविला मोकळ । भाव मागें सर्वकाळ ॥ ३ ॥ निळा म्हणे आतुडलें । बरें वर्म हातां आलें ॥ ४ ॥

४०० नामीं गोंवियली वाचा । मनीं संकल्प हा तुमचा ॥ १ ॥ ऐसा वेष्टलों जी हरी । हातें पायें अवघ्यापरी ॥ २ ॥ देखों जाय रूप तें दिठीं । श्रवणीं त्याही तुमच्या गोष्टी ॥ ३ ॥ निळा म्हणे घरीं दारीं । देशीं तूंचि देशांतरी ॥ ४ ॥

४०१ नामें तुमचीं गाउनि छंदें । ब्रम्हानंदें वाचेन ॥ १ ॥ धरूनियां दृष्टीपुढें । पाहीन रूपडें सुरेख ॥ २ ॥ वारंवार क्षणक्षणां । ठेवीन चरणावरी माथा ॥ ३ ॥ निळा म्हणे पुरवा कोड । तुम्हीचि चाड जाणोनी ॥ ४ ॥

४०२ नामें तुमचीं गाऊं मुखें । राहों सुखें चिंतनीं ॥ १ ॥ आणखी नेत्रीं घाल तरी । पढों वैखरी गुण तुमचे ॥ २ ॥ ठाकों उभा संतमेळीं । करूं धुमाळी हरिकथा ॥ ३ ॥ निळा म्हणे नित्य नवी । सेवा द्यावी कुनाळुवा ॥ ४ ॥

४०३ नाडें तें जना देवा । कांहो वदवा मज हातीं ॥ १ ॥ आइते प्रसाद संतवाणी । अमृत झरवणी सुस्वाद ॥ २ ॥ सत्यस्वानुभव बोलिलें

जें जें । प्रगटुनि सहजें सिद्धांत ॥ ३ ॥ निळा म्हणे तुमच्या वरदें यथानुवादें वचनें तिये ॥ ४ ॥

४०४ नावडे आणिक । बुद्धि झाली तदात्मक ॥ १ ॥ तेंचि बैसलें रूपडें । माझी डोळियां निवाडें ॥ २ ॥ लांचावली वाणी । न निवे ते तुमच्या गुणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे श्रवणीं कीर्ति । हृदयीं अखंड सगुण मूर्ती ॥ ४ ॥

४०५ नाहीं उरविलें दुजें । तुमच्या तेजें झांकोळिलें ॥ १ ॥ माझीचि मज न दिसती । निजांगें दीप्ति प्रकाशें ॥ २ ॥ मी माझें हें नाडळेचि कांहीं । देहादेहीं विसर ॥ ३ ॥ निळा म्हणे एकीएक । भोंदितां लेख पूर्णत्वें ॥ ४ ॥

४०६ नाहीं लौकिकासी काम । गाईन नाम सर्वदां ॥ १ ॥ हेंचि माझें भांडवल । विठ्ठल विठ्ठल खरें नाणें ॥ २ ॥ नेघों भुक्ति नेघों मुक्ति । प्रेम विरक्ति हरिनामीं ॥ ३ ॥ निळा म्हणे साधन सार । तुमच्या उच्चार नामाचा ॥ ४ ॥

४०७ नित्य नूतन तुम्ही नवे । आम्हीं तों जिवें वेंचतां ॥ १ ॥ जाणें येणें आम्हां आटी । कल्पकोटी तुह्मां जिणें ॥ २ ॥ सुखदुःख आह्मां भोग । तुम्ही तो अनंग निजरूपें ॥३॥ निळा म्हणे जगदधीशा । आम्हीं आशा बांधलों ॥ ४ ॥

४०८ नित्य नूतन गाऊं गुण । करूं जागरण कीर्तनीं ॥ १ ॥ तेणें तुमची होईल कृपा । निरसन तापा भवरोगा ॥ २ ॥ जाती खंडोन जन्मांतरें । पुढेंही फेरे खावे ते ॥ ३ ॥ निळा म्हणे विश्वास चित्तीं । हाचि श्रीपती मानियेला ॥ ४ ॥

४०९ निंदील कोणी मज तो निंदू । अथवा स्तुतिवादु करोत सुखें ।१। पारे मी गाईन पंढरीनाथा । गुण तत्वतां तुमचेचि ॥ २ ॥ आवडी आईक तूं कानीं । अथवा त्यागुनी वोसंडी तूं ॥ ३ ॥ निळा म्हणे देऊनि बळ ।

४१०. निरंतर नाम वदनीं । निजरूप ध्यानी आठवितों ॥ १ ॥ आणीक देवा कांहीं नेणें । मिरवूं भूषणें भक्तीचीं ॥ २ ॥ योग साधन न कळें मंत्र । निगमशास्त्र व्युत्पत्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे अज्ञान हरि । आहे परी सर्व मी ॥ ४ ॥

४११. निरंतर तुमच्या नामाचें स्मरण । आठवीन गुण वेळोवेळां ॥ १ ॥ रूप दृष्टीं पाय ध्याईन मानसी । हाचि अहोनिशीं निजध्यास ॥ २ ॥ आवडी बैसली अविट अंतरीं । नव्हे क्षणभरी विसरु ते ॥ ३ ॥ निळा म्हणे चित्ता चिंतनाचा लाहो । रुक्मादेवीनाहो साह्य झाला ॥ ४ ॥

४१२. निराश्रित वाटे मनीं । पडिलों जनी एकला ॥ १ ॥ कृपेविण तुमच्या देवा । हळहळ जीवा बहु वाटे ॥ २ ॥ आजींचा दिवस उद्यां नये । आयुष्य जाय क्षणक्षणां ॥ ३ ॥ निळा म्हणे करूं काय । न दिसे उपाय प्राप्तीचा ॥ ४ ॥

४१३. निवेदिलें पायांपाशीं । जें जें मानसीं होतें तें ॥ १ ॥ आतां उचित तैसें करा । आम्ही तों संसारा आंचवलों ॥ २ ॥ काय नाहीं तुमच्या हातीं । वचनीं तिष्ठती महा सिद्धी ॥ ३ ॥ निळा म्हणे तुमच्या संगें । पांडुरंगें वर्तिजे ॥ ४ ॥

४१४. पायापाशीं जीव । ठेवियला तुमच्या भाव ॥ १ ॥ दयाळ म्हणोनिया सदना । विठ्ठल देवा कृपाघना ॥ २ ॥ आळवितों नामें । लाहो करूनियां प्रेमें ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवसरातीं । दुजें नेणोनिया चित्तीं ॥ ४ ॥

४१५. पावो माझी हेचि सेवा । करितों नित्यानित्य देवा ॥ १ ॥ तुजचि आवडीच्या सुखें । गातों वाणितों तें मुखें ॥ २ ॥ पढतों ज्या ज्या नामावळी । वाजवूनियां हातें टाळी ॥ ३ ॥ निळा म्हणे ध्यानीं मनीं । जें कां चिंतितों चिंतनीं ॥ ४ ॥

४१६. स्फूर्ति माझी चेतविली । गुणीं लाविली आपुलिये ॥ १ ॥ आणखी दुजें नावडे कांहीं । येचि प्रवाहीं सुखावलों ॥ २ ॥ नाना परी-

चे अर्थभेद । वाचें विद्गद उमटती ॥ ३ ॥ निळा म्हणे मांडितों बोळी । वदवा मुखकमळीं तुह्मी ते ॥ ४ ॥

४१७. बरवा ओढावला रंग । भक्ति प्रसंग तुमचा ॥ १ ॥ तेणें सुखें मातली वाचा । नित्य कीर्तनाचा नट नाच ॥ २ ॥ गाऊं वानूं आपुल्या छंदें । तुमचीं पदें आवडीं ॥ ३ ॥ ॥ निळा म्हणे गळती नयन । प्रेमें स्फुंदन सद्गद ॥ ४ ॥

४१८. बरा केला अंगीकार । माझा तुम्हीं घेतला भार ॥ १ ॥ नाहीं तरी जातों वायां । नाना योनि भोगावया ॥ २ ॥ गाईन यावरी चोखडे । तुमचे कीर्तीचे पवाडे ॥ ३ ॥ निळा म्हणे ध्यानीं चित्तीं । धरूनि राहे तुमची मूर्त्ति ॥ ४ ॥

४१९. बहुतां दिवसां भेटीं आलों । सांभाळिलों पाहिजे ॥ १ ॥ आलिंगनें निवती प्राण । सुफळ जिणें मग माझें ॥ २ ॥ हेत मनींचा होईल पूर्ण । दृष्टीं चरण देखतां ॥ ३ ॥ निळा म्हणे हरेल शीण । बोळवण जन्माची ॥ ४ ॥

४२०. बुद्धि जिहीं अढळ केली । चरणीं तुमचे निक्षेपिली ॥ १ ॥ तया विसंबाल कैसे । कळविलेति निजमानसें ॥ २ ॥ प्राणापानांची ही गती । कुंठित केल्या इंद्रियवृत्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे कायावाचा । नेमूनि निर्धारीं तुमचा ॥ ४ ॥

४२१. बैसलें आसनीं । रूप चित्तातें चिंतनीं ॥ १ ॥ दुजें नाठवे सर्वथा । आण तुझी पंढरीनाथा ॥ २ ॥ डोळियां आवडी । रुपीं तुमच्या तया गोडी ॥ ३ ॥ निळा म्हणे जीवनकळा । वेधीं वेधलया त्या सकळा ॥ ४ ॥

४२२. मागण्याची न करूं गोष्टी । तुम्हां पोटीं भय वाटे ॥ १ ॥ नामचि तुमचे पुरे देवा । न करूं हेवा आणिक ॥ २ ॥ माझें आहे स्वाधीन मन । न इच्छीं मान धन कांहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे सत्य साचा । हाचि संकल्पाचा निर्धार ॥ ४ ॥

४२३. मागें उदंड जोडी केली । कोठें आली सांगातें ॥ १ ॥ आतां पुरे नाम वाचें । सार्थकाचें कारण ॥ २ ॥ कोठें जाऊं खाऊं फेरे । मतांतरें अनेक ॥ ३ ॥ निळा म्हणे नारायणा । भाव जाणा अंतरीचा॥४॥

४२४. मागें उदंड साधनें केलीं । उत्तीर्ण ती झालीं कर्मफळें ॥ १ ॥ परि तुमचें नेदितीच प्रेम । वाढविती श्रम संसारींचा ॥ २ ॥ जया नाहीं मार्गची ठावा । काय तें गांवा पाववितीं ॥ ३ ॥ निळा म्हणे काटवणी । घालिती घालणीं जाणिवेच्या ॥ ४ ॥

४२५. माझी मजचि वो पडियली भुली । गेलें मर्यादा वो विसरोनि आपुली । याची अणुमात्र पडतांचि साउली । वृत्ति तदाकार होऊनियां ठेली वो ॥ १ ॥ आलें वाचें तेंचि करितें बडबड । नये भ्रांतीचें वो वस्त्र दृष्टी आड । मना आलें तैसा नाचतें धुमाड । नेणों काय पुरें आरंभत्रा नाड वो ॥ २ ॥ नाहिं देखिलें तें येऊनि पडे दृष्टीं । तेंचि उच्चारे वो येऊनि वाचें ओठीं ॥ नेणोनि अनुभवा ज्ञानाची कसोटी । नेणों काय येऊनि सांठवलें पोटीं वो ॥ ३ ॥ वाचें अनिर्वाच्य येऊनि आदळे । हृदयीं वाउगेची होताती सोहळे ॥ उठिति स्फूर्तिचेचि क्षणक्षणा उमाळे । माझिय जाणिवेचें फोडूनि पेंडोळें वो ॥ ४ ॥ होतें तैसें तुम्हा निवेदिलें पाईं । नकळे यावरी तुमचे कृपेची नवाई ॥ ठेवाल जैसें तेथें राहावें ते ठायीं । कैंची सत्ता आम्हा बोलावें तें काई वो ॥ ५ यावरी कराल तें तुम्हीं करा देवा । मी तों नुरोनियां उरलें देहभावा ॥ कांहींचि नेणोनियां हिताहित तेव्हां । निळा म्हणे साक्षी तुम्हीचि या सर्वा वो ॥ ६ ॥

४२६. मूढमती परि मी वाचें । नाम तुमचें उच्चारीं ॥ १ ॥ नेणें कांहीं न कळे हित । परि मी भक्त म्हणवितों ॥ २ ॥ अज्ञानाचे परि मी दास । धरिली कास न सोडीं ॥ ३ ॥ निळा म्हणे भलत्या परि । अंगीकारी विठोबा ॥ ४ ॥

४२७. म्हणोनियां विटलें मन । आलें पतोन माघारिया ॥ १ ॥ तुमचिया नामस्मरणीं । रतलें चरणीं सुखावलें ॥ २ ॥ नाहीं येथें घात पात ।

पाववी निभ्रांत निजठाया ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसिया आशा । राहिलें भरंवसा मानूनियां ॥ ४ ॥

४२८. यावरी बोलती गोवळ । तूंचि सकळ जाणता ॥ १ ॥ कैसें जाणें येणें आह्मां । पुरुषोत्तमा तुजवीण ॥ २ ॥ धन वित्त आमुचें गोत । तुम्हीं सतत जीवप्राण ॥ ३ ॥ निळा म्हणे वरदळ बोली । केली साहिली पाहिजे ते ॥ ४ ॥

४२९. रूप राहिलें चिंतनीं । सर्वकाळ ध्यानीं मनीं ॥ १ ॥ वाचा गुणीं लांचावली । मती विस्तारें फांकली ॥ २ ऐसी केली तुम्हीं दया । कृपाळुवा पंढरीराया ॥ ३ ॥ निळा म्हणे भूक तहान । गेली ठायींच हारपोन ॥ ४ ॥

४३०. वाचा गुणीं लांचावली । मति विस्तारें फांकली ॥ १ ॥ ऐशी केली तुम्हीं दया । कृपाळुवा पंढरीराया ॥ २ ॥ सर्वकाळ ध्यानीं मनीं । रूप राहिलें चिंतनीं ॥ ३ ॥ निळा ह्मणे भूक ताहान । गेली ठायींचि हरपोन ॥ ४ ॥

४३१. विजयध्वज उभारला । तुमचा मिरवला तिहीं लोकीं ॥ १ ॥ कारितां दामाजीचें धावणें । एकाचि स्मरणें नामाच्या ॥ २ ॥ संतहि बाडिबार वर्णिती । हाचि श्रीपती नित्यानीं ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐकोनि वचनें । धरिला मनें विश्वास ॥ ४ ॥

४३२. विठ्ठल विठ्ठल म्हणोनी छंदें । ब्रम्हानंदें नाचेन ॥ १ [illegible]
नियां दृष्टी पुढें । रूप चोखडें सुरेख ॥ २ ॥ वा[illegible]
चरणांवरी माथा ॥ ३ ॥ निळा म्हणे पु[illegible]
माझी ॥ ४ ॥

४३३. वेडें वांकुडें बोलिलें । निळ[illegible]
तुम्ही रमाकांत । भक्त तुमचे चरणां[illegible]
सागर लहरी तों समान ॥ ३ ॥ [illegible]
क्षुल्लक ॥ ४ ॥

४३४ वोवाळूनियां सांडीन काया । वरुनी पायां तुमचीया ॥ १ ॥ जीवभाव ठेवूनी वरी । राहेन द्वारीं तिष्ठत ॥ २ ॥ जोडूनियां कृतांजुळी । मामावळी आठवीन ॥ ३ ॥ निळा म्हणे करीन सेवा । अहोरात्रीं देवा चरणांची ॥ ४ ॥

४३५. सत्याक्षरें माझी वाणी । प्रवर्तली गुणीं तुमचिया ॥ १ ॥ दाविले ते तुम्ही अर्थ । बोळी यथार्थ मांडियेले ॥ २ ॥ नाहीं कांहीं मतांतरीं । वदली वैखरी हे माझी ॥ ३ ॥ निळा म्हणे हे वाक्यपूजा । गरुडध्वजा प्रीत्यर्थ ॥ ४ ॥

४३६. सत्य कैचे गांठीं । जेणें संवसादी तुम्हांसी ॥ १ ॥ म्हणोनि देवा वाटे भय । कैसेनि अपाय चुकती हे ॥ २ ॥ यज्ञें स्वर्ग न चुके कदा । अध्ययनें संपदा सत्य लोक ॥ ३ ॥ निळा म्हणे रजतमें योनी भोगायतनीं चौऱ्यायशी ॥ ४ ॥

४३७. सर्वकाळ जागवीन । आळवीन सुस्वरें ॥ २ ॥ नामें तुमचीं अहो देवा । श्रीमाधवा गोविंदा ॥ २ ॥ करीन हेचि दास्य कोडें । कीर्तन पुढें आवडी ॥ ३ ॥ निळा म्हणे येईल मना । द्या हो वरदाना तेव्हां मज ॥ ५ ॥

४३८. संत कैसेनि भेटती । कैसेनि होती कृपावंत ॥ १ ॥ सांगा निगुती हें आम्हांसी । तुमच्या पायांसी लागतों ॥ २ ॥ काय तें करावें
[illegible] काय तें धन समर्पावें ॥ ३ ॥ निळा म्हणे शरण जावें । कैसें
[illegible] ४ ॥
[illegible] ातां पात्र झालों देवा ॥ १ ॥ माझ्या
[illegible] ातन चोखडी ॥ २ ॥ जगादीचे जुनें ।
[illegible] ळा म्हणे माझ्या देवें । हातीं लागलें
[illegible]
[illegible] आम्हासी जगें जाणिजे ॥ १ ॥
[illegible] गासी ॥ २ ॥ जेवीं वोहळासी

प्रतिष्ठा । पावतां तटा गंगोदका ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रकाश दीप्ति चंद्रज्योती वन्हिसंगें ॥ ४ ॥

---

## आपल्या स्थिति संबंधानें जनास उद्गार.

४४१. अखंडता ते झाली ऐसी । विठ्ठल राहिला मानसी । ध्यानीं मनीं लोचनासीं । अहर्निशीं निज बोध ॥ १ ॥ जनीं वनीं जनार्दन । नाढळे त्या भिन्नाभिन्न । एकात्मता अनुसंधान । नित्य दर्शन विठ्ठलीं ॥२॥ देहीं असोनी देहातीत । गुणीं गुणातें नातळत । विषयीं विषयापासुनी मुक्त । भोगी भोगासक्त नव्हती ते ॥ ३ ॥ नित्य निरामय निर्गुण । जगदात्मा जो आनंदघन । विटेवर पाउलें समान । लाधलें चरणीं मन त्या ॥४॥ निळा म्हणे विठ्ठल जपें । सांडिले ते पुण्यपापें । संकल्प सोडिले विकल्प । त्रिवितापें स्वानुभवी ॥ ५ ॥

४४२. अवघाची गुणीं आहे हा भला । पारि हा याला लोभ कां॥१॥ कांहींच उरो नेदी माझें । संचितपुंजे भरियेलें ॥ २ ॥ बरें वाईट हा न म्हणेचि कांहीं । पाप पुण्य तेंहि लुंचियेलें ॥ ३ ॥ निळा म्हणे जें जें देखें । तें तें हा सुखें भरितुची ॥ ४ ॥

४४३. अवघींच अंगे वेष्टोनि टेलीं । हारीचिये रंगलीं निज सेवे॥१ ॥ तेणेंचि वोट कृतकृत्यार्थ । चुकले अनर्थ जन्मजरा ॥ २ ॥ सर्व काळ सुखीं सुख । हारिखीं हरिख कोंदला ॥ ३ ॥ निळा म्हणे पुरले नवस । आलिया नरदेहास फळ झालें ॥ ४ ॥

४४४. अवघ्या अंगे अवघें झालों । अवं[illegible]
अवघ्या ठायीं अवघ्या देहीं । अवघ्यां नाहीं[illegible]
वळी अवघ्यां दुरी । अवघ्यां ध्वनि बीज[illegible]
ऐलाडी ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणों [illegible]

४४५. असो आतां हें बोलणें [illegible]
सांगितलें करूं काम । हातें टाळी[illegible]

आज्ञा त्याची वंदुनी शिरीं ॥ ३ ॥ निळा म्हणे राजा धरी । हातीं तया समांग्य करी ॥ ४ ॥

४४६. असोतु ऐसियाच्या गोठी । काय करुनी लाभ तुटी ॥ १ ॥ गाऊं विठलु सावळा । आठवूं तो वेळोवेळां ॥ २ ॥ जया चरणीं ब्रीद भार । वांकि किंकिणी झणत्कार ॥ ३ ॥ निळा म्हणे तुळसीमाळा । पदक एकावळी गळां ॥ ४ ॥

४४७. असो त्याची मात । गाऊं गीतीं पंढरीनाथ ॥ १ ॥ जेणें मनासीं विश्रांती । फावे इंद्रिया सुखशांती ॥ २ ॥ आळवितां नामें । भुवनें चौदाही संगमें ॥ ३ ॥ निळा म्हणे वैकुंठवासी । करी कृपा राहे पासीं ॥ ४ ॥

४४८. आटी तो आटणी । करुनी इंद्रियां दाटणी ॥ १ ॥ कवळुनिया नामापाशीं । तुमच्या टेवितो सायासी ॥ २ ॥ नेदी घेऊं वावो । दुजा न देऊनिया ठावो ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्योती । जागवितो दिवसराती ॥ ४ ॥

४४९. आठवाला तो माझिये मनीं । कटीं दोन्ही वसविता ॥ १ ॥ न गमे दिवस न गमे राती । लागते खंती प्राण फुटे ॥ २ ॥ जीवही होतो कासावीस । कै तें रूप देखेन ॥ ४ ॥ लिळा म्हणे भेटवा आतां । ठेवितो माथा चरणावरी ॥ ४ ॥

४५०। आठवितां याचे पाय । गेलें निरसोनी संसारभय ॥ १ ॥ अवघा काळ अवघी वेळ । स्मरणें याचिया सुमंगळ ॥ २ ॥ सदैव आम्ही [illegible] हरिच्या नामावळी ॥ ३ ॥ निळा म्हणे यावरी आतां । [illegible] ४ ॥

[illegible] सुखाची संतुष्टी । लाभें लाभ कोटी मुक्- [illegible] घेउनियां छंद । गातुसे गोविंद विठ्ठल [illegible] द्वैतबाध । अवघाचि उपाध माया [illegible] णवां साधन । हेंचि अनुसंधान दि-

४९२. आम्ही स्वामीचिया बळे । येथें असों खेळें मेळें ॥ १ ॥ नामें गाउनी आवडी । करूं पदाच्या चढामोडी ॥ २ ॥ करून कीर्तन सोहळा । रंजवूं नारीनरबाळां ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवसराती । केव्हां नेणों येती जाती ॥ ४ ॥

४९३. आरतीचें आरत होतें माझ्या मनीं । बहुत दिवस नयनीं प्रकाशलें तें ॥ १ ॥ भरोनियां कोंदलीं चौदाहि भुवनें । सुतेज केलीं गगनें याचेनि तेजें ॥ १ ॥ आवडीचें निज प्रकाशलें गुज । आतां नाचेन भोज येणें छंदें ॥ ३ ॥ निळा म्हणे दिशा व्यापुनियां मही । प्रकाश माझ्या देहीं संचरला तो ॥ ४ ॥

४९४ आर्त माझें पूर्ण झालें । याचीं पाउलें देखतां ॥ १ ॥ आतां कोठें न धावें मन । राहिलें होउन अचंचळ ॥ २ ॥ याविण कांहीं नलगे जोडी । पुरली आवडी विषयाची ॥ ३ ॥ निळा म्हणे ध्यानीं मनीं । राहो चिंतनीं हेंचि रूप ॥ ४ ॥

४९५ आतां आठवूं पाउलें । सकुमार चांगले इटे ते ॥ १ ॥ तेणें प्रसन्न होती गुरु । संत मुनिश्वरु करुणाब्धी ॥ २ ॥ आदर त्याचा इटे-वरी । तो मज निर्धारी जाणवला ॥ ३ ॥ निळा म्हणे जिवीं ते ध्यातां । कृतकृत्यता कारितलि ॥ ४ ॥

४९६ आम्हां सांपडलें वर्म । हरिभक्तीचें सुगम ॥ १ ॥ त्याचें आळवावें नाम । हृदयीं धरुनियां प्रेम ॥ २ ॥ वाजउनी टाळी । सुखें नाचावें राउळीं ॥ ३ ॥ निळा म्हणे संती । दाविलें हें कृपावंती ॥ ४ ॥

४९७ आम्हां सुखा नाहींचि उणें । सेवा गुणें स्वामीचिया ॥ १ ॥ अवघ्या ब्रम्हांडाच्या सूत्रीं । गाउं वक्त्रीं गुण त्याचे ॥ २ ॥ जेणें उदंड अमान्य केले । निज दास आपुले सुमंडळीं ॥ ३ ॥ निळा म्हणे उपेक्षूं नेणे । आपुलिया स्मरणें आमाच्या ॥ ४ ॥

४९८ आळवीन क्षणक्षणां । नारायणा या नामें ॥ १ ॥ या हो या हो पंढरीनाथा । कृपावंता सामोरे ॥ २ ॥ आळियाचा हरा सिण । द्यावें आलिंगन धांवोनी ॥ ३ ॥ निळा म्हणे परस्परें । अत्यादरें आदर ॥ ४ ॥

४५९ आळवूं आम्ही विठोबासी । नेणो आणिकासी रंजवूं ॥ १ ॥ राग कळा घात मात । स्वर संगीत मूर्छना ॥ २ ॥ ताळ ग्राम छंद बंद । गीत प्रबंध कंपित ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रेमें वाणी । गर्जवूं गुणीं श्री हरिच्या ॥ ४ ॥

४६० आज्ञापिलें जें श्रीहरी । तेंचि वदली हे वैखरी ॥ १ ॥ नाहीं माझें येथ वीर्य । जाणे ज्याचें तोचि कार्य ॥ २ ॥ येईल जरी हे प्रतिती । धरा तरी हें हितचि चितो ॥ ३ ॥ निळा म्हणे सांडिजे येरी । नास्तिक वादी परते दुरी ॥ ४ ॥

४६१ ईसारे गोंविला । अवचा आंखुनी ठेविला ॥ १ ॥ देउनिया अहंभावो । भक्ति सांठविला देवो ॥ २ ॥ नामाचें चिंतन । करुनि केला हा स्वाधीन ॥ ३ ॥ निळा म्हणे जिवेंसाठीं । करुनिया सामाविला पोटीं ॥ ४ ॥

४६२ उगेंच आतां बैसेन मी म्हणे । तंव हा करण चेष्टवीतो ॥१॥ दृष्टीपुढें हा उभाचि ठाये । ऐकणें होउनी राहे श्रोत्रत्रिळी ॥ २ ॥ मनहीं नेणों व्यापउनी ठेवी । चित्तासी हा गोवी आपणापासीं ॥ ३ ॥ निळा म्हणे बाई हृदयींच राहिला । अवघाचि रोधिला जागा येणें ॥ ४ ॥

४६३ उतरिला माझा भार । येणें कैवार धरुनियां ॥ १ ॥ आपुला आपण सोहळा करी । पाहिजे संसारी पुरवि तें ॥ २ ॥ नेंदि पडों उणें कोठें । आली संकटें निवारी ॥ ३ ॥ निळा म्हणे झाला ऋणी । चक्र-पाणी आम्हां घरीं ॥ ४ ॥

४६४ उमटलें वरी । होतें तैसें ते अंतरी ॥ १ ॥ आतां नवजाय झाकिलें । बुद्धी वाचे वोसंडलें ॥ २ ॥ दीप अंधारीं ठेविला । प्रकाश न झाकें फाकला ॥ ३ ॥ निळा म्हणे पांडुरंगें । चेतविली माझी अंगें ॥४॥

४६५ ऐसा जोडियला दातार । करुनी नामाचा उच्चार ॥ १ ॥ आम्हीं भाग्यवंतीं । पायी याचे विश्वासेंनी ॥ २ ॥ नेदी जाऊं कोठें दुरी । पुरवी अवघेंचि हा घरीं ॥ ३ ॥ निळा म्हणे त्वरित आला । फळा अर्थ तो चिंतिला ॥ ४ ॥

४६६ काय करूं तैसें ज्ञान । जेणें अभिमान खवळे तें ॥ १ ॥ राहो भाव तुझ्या चरणीं । गर्जो वाणी गुण कीर्ती ॥ २ ॥ काय करूं व्युत्पत्ती तैसी । जेणें वादासी मूळ होय ॥ ३ ॥ निळा म्हणे अहंकार वाढे । नलगे वेडे वैराग्य तें ॥ ४ ॥

४६७ काय काज कोणासवें ॥ विठ्ठल देवें वांचुनी ॥ १ ॥ काय नाहीं चरणापासीं । पाहिजे ज्यासी तें तेथें ॥ २ ॥ ह्मणोनियां जीवें साठीं । करुनी नेहटी बैसलों ॥ ३ ॥ निळा म्हणे सभाग्य धणी । पुरवील आयणी सकळ ही ॥ ४ ॥

४६८ काय विघरुनी केले पाणी । घडिली अवनी कास्याची ॥ १ ॥ महिमा जाणे त्याचा तोचि । नेणे विरंची जरी ज्ञाता ॥ २ ॥ काय पिंजुनी केलें गगन । निर्मिला हुताशन कासयाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे भरोनि अंबरा । निर्मिला वारा कासयाचा ॥ ४ ॥

४६९ कांहींच जाणिव न करावी । आहे जिवी हें ठावें ॥ १ ॥ परि मज बोलवी देवो । तेथें उपावो कोणाचा ॥ २ ॥ नव्हे कांहीं बहुश्रुत । वक्ता पंडित वाचाळ ॥ ३ ॥ निळा म्हणे श्रीविठ्ठल । बोलवी बोल ते बोलें ॥ ४ ॥

४७० कृपाघनें वृष्टी केली । माझी निवाविली निजांगें ॥ १ ॥ ह्मणोनिया वांवेवार । त्याचे उपकार आठवितों ॥ २ ॥ न घडुनि कांहीं सेवा । धांविले कुणवा आपुलिया ॥ ३ ॥ निळा म्हणे सुखी केलें । हातीं धरिलें वरदानें ॥ ४ ॥

४७१ कृपादीप प्रकाशिला । विलया नेला अलंकार ॥ १ ॥ आतां दृष्टीपुढें दिसे । जेथें असे तें तैसें ॥ २ ॥ सत्यासत्य मिळणी झाली । अवघी फावली निवडितां ॥ ३ ॥ निळा म्हणे उदयो केला । रवीचि उगवला नयनांत ॥ ४ ॥

४७२ कृपा तुमची फळा आली । बुद्धी [illegible] निश्चळ ॥ १ ॥ नामचि एक उच्चारिले । तेथेंचि बैसले मन माझें ॥ [illegible] इंद्रियांची पुरली

जतन कोण करी यावरी ॥ १ ॥ नयनांचेंहि नयन माझ्या घ्राणाचें घ्राण । श्रवणाचेंहि श्रवण तोचि रसनेची रसना ॥ २ ॥ त्वचेचीहि त्वचा माझे वाचेची वाचा । बोलविसी बोलाचा तोचि अर्थ तात्पर्य ॥ ४ ॥ कराचेहि कर माझ्या चरणाचे चरण । चैतन्याचे चैतन्य तोचि मनाचें मन ॥ ५ ॥ निळा म्हणे भुक्ति मुक्ति विरक्ति ज्ञान । शांति क्षमा दया तोचि सिद्धी साधन ॥ ६ ॥

४८६ जीवभाव ठेवूं पायीं । तरि तो काय लटिकाचि ॥ १ ॥ याचिलागीं लिगठलों । पायीं जडलों न ढळेसा ॥ २ ॥ जेथें संतचरणरज । पडती सहज मी तेथें ॥ ३ ॥ निळा म्हणे याविण आतां । न दिसे अर्पितां उत्तीर्णपणा ॥ ४ ॥

४८७ जेणें माझी वाचा अती । आपुल्या कृपें केली सरती ॥ १ ॥ त्याचें उत्तीर्ण होउ म्हणतां । जीवपण नुसतें आतां ॥ २ ॥ अवघेंचि त्याचें घेणें देणें । मी हें माझें कांहींचि नेणें ॥ ३ ॥ निळा म्हणे ठेविलों ऐसा । जळिंचा बुद्‌बुद जळींचि जैसा ॥ ४ ॥

४८८ जेणें छत्र सिंहासन । दिधलें आसन त्रिणाचें त्या ॥ १ ॥ काय उत्तीर्ण होईजे रंके । तेणें त्यां मशकें संतचरणा ॥ २ ॥ ज्याचिया कृपा ब्रह्मानंद । पावलों अगाध अक्षयी तो ॥ ३ ॥ निळा म्हणे साम्राज्यें लेणें । लेवविलें ईक्षणें कृपेचिया ॥ ४ ॥

४८९ ज्याचा आहे त्या अभिमान । मी तों रंक अनाथ दीन ॥ १ ॥ नलगे देणें हा परिहार । होईल सत्याचा आदर ॥ २ ॥ जेणें केलेंसे पुढारें । त्याचे तया उणें पुरें ॥ ३ ॥ निळा म्हणे मी मापारी । उभा धणी शिरावरी ॥ ४ ॥

४९० झालें डोळिया पारणें । इंद्रियाही पुरतेपणें ॥ १ ॥ विठो देखतांचि दिठी । जिवीं जिवा पडली मिठी ॥ २ ॥ बुद्धिनिश्चयाचें घर । तेहि झाली तदाकार ॥ ३ ॥ निळा म्हणे काया वाचा । मना संकल्प हा तयाचा ॥ ४ ॥

४९१ डोळियाचाही डोळा बुद्धि । माझी उघडुनि । कृपानिधी । देखणी करुनियां त्रिशुद्धी । निजात्मपदीं स्थापिली ॥ १ ॥ तेणें दिसती ठाया ठावो । हृदय सकळांचेही भाव । संत दावी जे अनुभव । आणखीही सर्व मायाकृत ॥ २ ॥ नवल कृपेची हे जाली । फिटली मोह ममता भ्रांती ॥ उत्पति स्थिति प्रळय होती । ते ते निगुती आटले ॥ ३ ॥ देखणें झालें नयनानयन । देखती आपुलेंही वर्तन ॥ २ हेलें ठायींच ते जडोन । अभेद होउन देखती ॥ ४ ॥ निळा स्वामी सद्‌गुरुनाथा । देखणा तूंचि मी नाहीं आतां ॥ तोडुनी मी हे माझी ममता । आपणा आतौता मेळविलों ॥ ५ ॥

४९२ त्याचे पायीं माझी बुद्धि । जडली कधीं न ढळेसी ॥ १ ॥ ज्याचे ध्यानीं मनीं हरी । नामें वैखरी उच्चार ॥ २ ॥ नित्य कीर्तनांचें घोष । करिती उल्हास आवडीं ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांची गोष्टी । ऐकतां पोटीं सुख वाटे ॥ ४ ॥

४९३ दिवसरात्रीं हाचि धंदा । वर्णितों गोविंदा गुणकीर्ति ॥ १ ॥ स्वप्नामाजी सुषुप्ती आंत । जागृतीसे मात याचीचि ॥ २ ॥ खातां जेवितां बोलतां । आठवे कथा नित्य याची ॥ ३ ॥ निळा म्हणे लगटोनि आलें । पीक चांगलें असंभाव्य ॥ ४ ॥

४९४ दिसे तोचि जनीं वनीं । विठ्ठल हृदयीं त्रिभुवनीं ॥ १ ॥ लेणें नेसणें भूषणें । विठ्ठल वस्त्र परिधानें ॥ २ ॥ अन्न भोजन उदक पान । विठ्ठल सुषुप्ती शयन ॥ ३ ॥ निळा म्हणे वाचा बोली । विठ्ठल होऊनिया ठेली ॥ ४ ॥

४९५ न कळे केव्हां दिवस गेला । रात्रीं झाला तमनाश ॥ १ ॥ निद्राचि नाहीं स्वप्न तें कैचें । निःशेष जागृतीचें विस्मरण ॥ २ ॥ भोक्ताचि नाहीं कैचा भोग । अनंगी अनंग हारविले ॥ ३ ॥ निळा म्हणे ठाईं ठावो दुवीं देव मावळले ॥ ४ ॥

४९६ न पडे विसर याचा मना । झाली तद्रूप वासना ॥ मही व्या-

पूनिया गगना । दि.। नयनां रूप पुढें ॥ १ ॥ जें जें आढळे दृष्टीपुढें । तें तें याच्या स्वरूपें मांडें । व्यापुनी सकळांमाजिवडें । वसें अंतरीं सकळांचे ॥ २ ॥ स्वरूप सांवळे सगुण । अंगकांति मेघवर्ण । करीं धरुनियां जघन । दृष्टी अवलोकी पुंडलिका ॥ ३ ॥ कर्णी कुंडले विशाळ डोळे । जैसीं विकासलीं दिव्य कमळें । हृदयावरी कंठमाळे । पदकी रत्ने झळकती ॥ ४ ॥ कास पितांबरें घातली । मेखळा कटीं सूत्रें रोखिलीं । पाउलें विटेवरी शोभलीं । निळया झाली प्रसन्न तीं ॥ ५ ॥

४९७ न धरी आतां शंका । कशासाठीं भिऊं लोकां ॥ १ ॥ ज्याचें ओझें तयावरी । मज हे ऐशी काय थोरी ॥ २ ॥ सांगितलें करूं काज । ज्याची तया चिंता लाज ॥ ३ ॥ निळा म्हणे गेला भेवो । जाणोनि साह्य पंढरिरावो ॥ ४ ॥

४९८ नाहीं उपेक्षिले कोणा । थोरा लहाना निवडुनी ॥ १ ॥ ऐसी संत देती ग्वाही । पुराणेही गर्जती ॥ २ ॥ आम्ही आतां न फिरों मागें। करूं वेगें वेगुचि ॥ ३ ॥ निळा म्हणे पळे पळ । साधु काळ भेटीचा ॥४॥

४९९ नाहीं ऐसें उणेंचि कोठें । भरतो पोट तोंडवरी ॥ १ ॥ बाहेर येती वोसंडोन । चाऱ्ही कोन उथळोनी ॥ २ ॥ झाली आनंदाची दाटनी । गर्जे वाणी त्या सुखें ॥ ३ ॥ निळा म्हणे माझी सत्ता । नाहीं वदतां विठ्ठल ॥ ४ ॥

५०० नाहीं कोठें गोंविला हेत । ठेविलें चित्त याचिवरी ॥ १ ॥ सगुण सुंदर देखिले दिठी । विटे नेहटी तेंचि पुरे ॥ २ ॥ वामभागीं विराजमान । स्वरूपी समान रुक्मिणी ॥ ३ ॥ निळा म्हणे लाभला छंद । याचाचि वेध मानसीं ॥ ४ ॥

५०१ नाहीं माझा उरविला । संदेह अवघाचि फेडिला ॥ १ ॥ म्हणोनियां त्याच्या सुखें । नाचें कीर्तनीं मी हरिखें ॥ २ ॥ बोलविती जें जें वाचें । तें तें अक्षर निश्चयाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे मी नेणें गति । अर्थ त्याचा ते जाणती ॥ ४ ॥

५०२ नाहीं लौकिकाशीं काज । माझें गुज तो जाणे ॥ १ ॥ अंत- । र्बाह्य ठावें तया । येईल बाह्या पसरुनी ॥ २ ॥ हाचि निश्चय माझा मनीं विश्वास वचनीं संतांच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे निर्भय चित्तें । भेटी त्यातें पाचारी ॥ ४ ॥

५०३ निजध्यास लागला मनीं । हाचि चिंतनीं दिवसराती ॥ १ ॥ न सुटेचि करूं कैसें । लाविलें पिसें गोवळें ॥ २ ॥ येऊनि जाऊनि पुढें- चि उभा । लाविलें भांबा मन माझे ॥ ४ ॥ निळा म्हणे नवचे दुरि । भरला शरीरीं न सुटेचि ॥ ४ ॥

५०४ नीत नवा प्रेमा कृपेचिया बळें । अंतरीं हा वोळे आनं- दघन ॥ १ ॥ नाचती मयूरें रोमांचीत दाटी । अमृताची वृष्टी जीवन- कळा ॥ २ ॥ आकाशें दुमदुमी गर्जे अनुहत । सूर्नाळ तळपत विद्यु- ल्लता ॥ ३ ॥ पिकली भूमिका बीज आलें फळा । अद्वय निजकळा सवं- गिलें ॥ ४ ॥ भाग्यवंत निळा सांठवी निराळीं । आत्मया जवळी निक- टत्र सें ॥ ५ ॥

५०५ नुठेचि मन वरूनियां । जडोनी ठेलें हरीच्या पायां ॥ १ ॥ बुद्धि निश्चयेंसी राहिली । परम विश्रांति पावली ॥ २ ॥ डोळे न धाती पाहतां । चरणीं विगुंतले तत्त्वतां ॥ ३ ॥ निळा म्हणे न पुरे धणी । करीन जीवें वोवाळणी ॥ ४ ॥

५०६ नुरवूनि दुसरें आतां ठेलों चरणीं । नित्यानंद भोगी तूंचि दिन रजनीं ॥ १ ॥ आळवूनि वाचें याचीं उत्तम नामें । सारिन काळ याचि परि सुखसंभ्रमें ॥ २ ॥ धरूनियां रूप दृष्टीं हृदयभुवनीं । सांठवीन आपुलिया मनाचे मननीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जन्मोनियां केली हे जोडी विठोबाचि सेवा नित्य नविये आवडी ॥ ४ ॥

५०७ नेगों आम्ही कदा भुक्ति आणि मुक्ति । हरिनामीं विश्रांति सर्व जोडे ॥ १ ॥ काय करावा त्या रिद्धी आणि सिद्धी । वांउग्या उपाधी भजना गोवा ॥ २ ॥ न लगे आम्हा कांहीं मान्यता बहु मान ।

जेणें अभिमान खळ अंगीं ॥ ३ ॥ निळा म्हणे दूरी दुरावू जाणीव । न लगे शहाणीव नाडील ते ॥ ४ ॥

९०८ नेणतेंचि दैव उघडलें आजी । तो हा मजमाजी संचरला ॥ १ ॥ आतां कैसें करूं मी यासी । न वरेचि मनासी आवरितां ॥ २ ॥ सुदिन घटका सांपडली होती । ते पडिली अवचितीं याचें नामीं ॥ ३ ॥ निळा म्हणे मी मज माझें । हिरोनियां वोझें नेलें सकळ ॥ ४ ॥

९०९ पडताचि तें वचन कानीं । भरिती मनीं अत्यादरें ॥ १ ॥ सुकृताचीं उत्तम फळें । आजी एक वेळे ओढवोनि ॥ २ ॥ सुखीं सांठवलें सुख । हारिखा हरिख भेटला ॥ ३ ॥ निळा म्हणे कल्प कोटी । पडली गांठी हरीसवें ॥ ४ ॥

९१० पायीं लीन होता निळा । दिधली कळा प्रेमाची ॥ १ ॥ निववूनियां केला सुखी । ठेउनी मुखीं निज नाम ॥ २ ॥ माउलीची ऐशी जाती । बाळका प्रीति समजावी ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपावंत । साक्षभूत अंतरींची ॥ ४ ॥

९११ पुरातन मी शरणांगत । आहें स्थापित सद्गुरूचा ॥ १ ॥ म्हणोनिया संत पाळिती मातें । देउनी भातें प्रेमरस ॥ २ ॥ जेउनी उरला प्रसाद देती । निकट बैसविती जवळिकें ॥ ३ ॥ निळा म्हणे क्षणक्षणां । देती स्मरणा श्रीहरीच्या ॥ ४ ॥

९१२ पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसूनियां संदेह बुद्धिभेद ॥ १ ॥ येऊनी एकांतीं उपदेशिलीं कानीं । बीजमंत्रें दोन्ही निजाक्षरें ॥ २ ॥ जीवा शिवा सेज रचिली आनंदीं । आउटावें पदीं आरोहण ॥ ३ ॥ निजीं निजरूपीं निजविला निळा । अनुहातें बाळा हल्लरु गाती ॥ ४ ॥

९१३ फुटलें धरण आला लोंढा । नावरे तोंडा माझीया तो ॥ १ ॥ कृपाघनें वृष्टी केली । वाचा गर्जिन्नली बोधवरें ॥ २ ॥ प्रतीति विद्युल्लता झळकती । थेंबुटे पडती ब्रम्हरसें ॥ ३ ॥ निळा म्हणे पिकलें पीक आलें सकळीक भागासी तें ॥ ४ ॥

५१४ बरवें झालें बरवें झालें । आत्मराम हृदयीं आलें ॥ १ ॥ सद्गुरुनीं कृपा केली । वस्तु डोळां मै दाविली ॥ २ ॥ आनंदीं आनंद । पाहे तिकडे हा गोविंद ॥ ३ ॥ निळा म्हणे मी निष्काम । परिपुर्ण आत्माराम ॥ ४ ॥

५१५ बरवा झाला वेवसाय । शिर्त्ती आठवितां पाय ॥ १ ॥ राम हृदयीं राहिला । परमानंद प्राप्त झाला ॥ २ ॥ द्वैत तेंही मावळलें । परब्रह्म प्रकाशलें ॥ ३ ॥ निळा म्हणे धन्य झालों । गुरुकृपें भिरावलों ॥ ४ ॥

५१६ बैसला तो ध्यानीं मनीं । पाहतां लोचनीं विठ्ठल ॥ १ ॥ रूप गाजिरें सुंदर । वेधिलें अंतर मन बुद्धी ॥ २ ॥ नाठवेचि कांहीं आतां । याविण चित्तां दुसरें ॥ ३ ॥ निळा म्हणे लाविलें पिसें । मी मन तुमसें आठवितां ॥ ४ ॥

५१७ बैसला तोचि माझिये ध्यानीं । कटीं कर दोन्ही वसवितां॥१॥ नयनाचि माजीं नवचे दुरीं । आंतु बाहेरीं कोंदला ॥ २ ॥ याविण नाठवे आणिक कांहीं । देहादेहीं तोचि तो ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवस-राती । स्वप्नी सुषुप्तीं जागृतींत ॥ ४ ॥

५१८ बोलों आतां वचनाक्षरें । माजी संचरे निरोपण ॥ १ ॥ ए[illegible] दाटली दाटणी । वाचा गुणी पैं गुंतली ॥ २ ॥ नाना संकल्प ते मु[illegible] स्तवनींचि झाले सादर ॥ ३ ॥ निळा म्हणे निमिषोनिमिष । झाले[illegible] श्वास अक्षर ॥ ४ ॥

५१९. ब्रम्हानंदा भरणी आली । तेचि केली सामोग[illegible] नाहीं कोणापाशीं । होतें मानसीं धरिलें तें ॥ २[illegible] स्वरूप त्याचें ध्यानी मनी ॥ ३ ॥ नि[illegible] ठाके सन्मुख ॥ ४ ॥

५२०. भावे आळवितां देवा[illegible] आले दैवा । सुख विश्रांती पावल[illegible]

शोभती अळंकार ते लेऊं । आपुलें सुहृद गौरवूं । हरिभक्त वैष्णव साबड ॥ २ ॥ अपार संपत्ती आली घरां । नाहीं आतां वोढा वारा । नलगे जाणें आणिकाच्या घरां । कांहीं मागावें यासाठीं ॥ ३ ॥ खरे नाणें खरें कोणे । खरिया मोले घेणें देणें । खरें विके खरेपणें । न पडे उणें भरलेंसे ॥ ४ ॥ निळा म्हणे माझिया दैवें । जोडिले होतें पडिलें ठावें । कृपा केली विठ्ठल देवें । आइतें दिधलें भांडार ॥ ५ ॥

९२१. मजही भीड तुलंघंवे । जें त्या पुसावें मनोगत ॥ १ ॥ सर्वही भावें सेवाऋणी । मजचि करूनी सोडियलें ॥ १ ॥ आशा मात्र नाहीं याशी । जे कां देहासी नाठविती ॥ ३ ॥ निळा म्हणे घातली मिठी कल्पकोटी न सुटेशी ॥ ४ ॥

९२२. मस्तक माझा पायावरी । या वारकरि संताच्या ॥ १ ॥ प्रतिवर्षी पंढरपुरा । जाती महाद्वारा हरि भेटी ॥ २ ॥ भेटी त्याची इच्छी मन । करिती किर्तन अनुदिनी ॥ ३ ॥ निळा म्हणे लोटांगण । घालित जाईन सामोरा ॥ ४ ॥

९२३. महासुखा पारणें होये । आनंद राहे लिगटोनी त्या ॥ १ ॥ [illegible]रिया प.वळे विश्रांती । निमग्न वृत्ती इंद्रियाच्या ॥ २ ॥ मनही तेथुनी [illegible]चि नोहे । पांगुळले पाय प्राणाचे ॥ ३ ॥ निळा म्हणे रवि शशी । [illegible] निशी दिवस दोन्ही ॥ ४ ॥

[illegible] मावळली खंती । देही देहाची विस्मृती ॥ १ ॥ पांडुरंग [illegible] रूप बैसले लोचनी ॥ २ ॥ नये कळो दिवस राती । स्वप्न [illegible] निळा म्हणे अखंडता । विठ्ठलरूपी तादात्म्यता ॥ ४ ॥

[illegible] आतुडले गुज । नाहीं आणिकाचें कामा आलें [illegible] लाज । तेणें लाधलीये निजाचेही निज [illegible] । एकनिष्ठ वो शरण जातां भावें । [illegible] प्रसन्न हा देवाचाही देव वो [illegible] भवास । घेतले जन्म वो याचीच

केलो आस । नाहीं देखिले वो कोणाचे गुणदोष । म्हणोनि कृपावंत झाला हा परेश वो ॥ ३ ॥ जें जें अर्चिलें तें सुकृत याचिसाठीं । नाहीं वेंचिलें वो जतन केलें गांठीं । भोगी त्यागी वो याचि वरि दिठी । म्हणोनि आजि हा लाधला जगजेठी वो ॥ ४ ॥ धरिले जन्म तें सार्थक झालें माय । भेटवूनी याशी वो फळले उपाय । चुकले अवघेचि अवांत अपाय । म्हणोनि आलिंगन देती यादवराय वो ॥ ५ ॥ केलें ब्रीद वो साच येणें काळें अनाथबंधु हें दीनाच्या दयाळें । केली कृपा वो पुरविले सोहळे । म्हणोनि निळा नित्य चरणावरी लोळे वो ॥ ६ ॥

६२६ माझी बुद्धि झाली वेडी । दिधली बुडी हरि नामीं ॥ १ ॥ तुमचे येथें विगुंतली । न करी बोली आणिक ॥ २ ॥ सांडियेले वादावाद । छंद बंद आणिक ॥ ३ ॥ निळा म्हणे तुमच्यापायी । जडली ठायीं न ढळेचि ॥ ४ ॥

६२७ मीचि माझा विस्मय करा । नवल पार देखावा ॥ १ ॥ कैशी येणें पांडुरंगे । अंगें अंगें लपविली ॥ २ ॥ पळहीं मात्र विसर देहीं । न पडेचि ठायीं व्यापियेलें ॥३॥ निळा नाम वाचे । गुण त्याचे आठवती॥४॥

६२८ याचा आश्रय झाला आम्हां । या पुरशोत्तमा विठ्ठलाचा ॥ १ ॥ गाता वाचितां चरित्रें याची । न करी दासाची उपेक्षा हा ॥ २ ॥ आपुला संकेत सिद्धी न्यावा । करणे देवा हेचि सत्य ॥ ३ ॥ निळा म्हणे निष्ठा जाणे । तैसाचि करणें अदर त्या ॥ ४ ॥

६२९ याचिया रूपाचे चिंतन । करितां तनु मन वेधलें ॥ १ ॥ नादेहीं नुरता देहभाव । झाले स्वयमेव तेचि रूप ॥ २ ॥ नाईकती शद्वा श्रवण । दुजिया नयन देखति ॥ ३ ॥ निळा म्हणे बावरी ऐसी । दिसे लोकांसी प्रीती वरी ॥ ४ ॥

६३० याचिलागीं तुमचा करितसें धांवा । रात्रंदिवस देवा आळवुनि ॥ १ ॥ तेणें जप तप स्नान संध्या विधी । जड माझी बुद्धि प्रज्ञाहीन ॥ २ ॥ नाहीं आश्रमाचें घडेल विहित । न कळे उचित नित्यादिक ॥ ३ ॥ निळा म्हणे माझा कैसा परिपाक । वैकुंठनायक तुम्ही जाणा ॥ ४ ॥

९३१ याचिलागि वो त्यजियले भोग। याचिलागिं वो केले नाना याग। याचिलागीं वो अष्टांगादि योग। याचिलागिं या विषयांचे त्याग वो ॥ १ ॥ जन्मजन्मांतरी केली हे सुचना। याचिलागिं वो वसविलें निर्जना। भक्षूनि फळ मूळ प्राशिलें जीवन। याचिलागिं केलें तीर्थाटन वो ॥ २ ॥ याचिलागिं वो आसनीं शयनीं। केली निरंतर याचि चिंतवणी। बैसलें धरूनियां रूप निज ध्यानीं। नामीं नेमियेली नित्य याचे वाणी वो ॥ ३ ॥ याचिलागिं वो मंत्रजप केला। याचिलागिं वो वेदांत पाहिला। याचिलागिं निजधर्म अनुष्ठिला। याचिलागिं म्यां संसार त्यजिला वो ॥ ४ ॥ याचिलागिं वो सत्संग साधन। याचिलागिं हें नित्यनित्य ज्ञान। केलें सायास ते याचि वो लागून याचिलागि नियमीं निरविलें मन वो ॥ ५ ॥ याचिलागिं मी झालों ये उदास सांडूनि आपुलिया पारिख्याची आस। याचिलागिं याचा निज ध्यास। धरिला निळा म्हणे निशिदिनीं ध्यास वो॥ ६ ॥

९३२ येणें आपुलिया कृपेचिया गुणें। माझीं पोशिलीं वो सर्वांगजीवनें। देउनि क्षेम अवघीं निववली करणें यासी काय देउनि व्हावें म्यां उत्तीर्ण वो ॥ १ माझे जीवींजा हा जिवलग सोयरा। यासी करूनि काय पूजावें उपचारा। जें जें कीजे तो तो उपाधी पसारा। कैसेनि पावेल या निज निर्विकारा वो ॥ २ करूनि पूजूं जंव मंत्र तंत्र जप। तंव हा शब्दातीत निर्गुण अरूप। कोण करूं यासि न पवेचि वो तप ध्यानीं ध्यातां हा अरूपीं अरूप वो ॥ ३ ॥ यासि न पुरे वो जाणिवे जाणतां। यासी न चले वो शाहाणीव करितां। नाना तर्क वाद यापुढें वृथा। आतां कोणा करूं उपचार तत्त्वतां वो ॥ ४ ॥ करितां योगाभ्यास न पवे ती सिद्धी। करितां नाना याग वाढती उपाधी। नित्यनित्यज्ञानें अभिमानाची वृद्धी। आतां कोण्या युक्ति तोषवूं कृपानिधी वो ॥ ५ ॥ ऐसें जें करूं म्हणे आपुलिये मतीं। तें तें सांडी परतें न धरी हा हातीं। येकचि आवडे या शुद्ध भाव भक्ती। निळा म्हणे वर्म दाविलें हें संती वो ॥ ६ ॥

९३३ राहो ध्यानीं मनीं हेंचि नित्य रूपडें। जें कां वाडें कोडें आलें पुंडलिका भेटी ॥ १ ॥ ठेवूनियां विटे दोन्ही चरण सुकुमार। विराजले

कर सुंदर कटिप्रदेशीं ॥ २ ॥ ज्यातें चिंतिताती योगी मुनिजन मानसीं । संत ज्यात भजती नित्य कीर्तन आवेशीं ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याविण दुजें नलगे मज कांहीं । जाणें अंतरीचें पांडुरंग सकळही ॥ ४ ॥

६३४ रूप देखतांचि लोचनिं । राहिलें ते ध्यांनीं मनीं ॥ १ ॥ माझिया जिवाचें जीवन । विठ्ठल नामाचें मोहन ॥ २ ॥ चित्त विगुंतलें पायीं । देह भावहि नुरेचि देहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जीव प्राण तेथेंचि राहिला जडोन ॥ ४ ॥

६३५ वदन निमासुरें कटावरी कर । उभा विटेवरी पुंडलिका समोर । चरणीं ब्रीदावळी. रूळती असुर । वरी वाळे वाकी रुणझुणिती मधुर वो ॥ १ ॥ तेणें नवलचि केले वो साजणी । सहज अवलोकितां संचारला नयनीं । त्याविण न दिसेचि दुजें जनीं वनीं । जें जें दिसे तें तें हाचि भासे मनीं वो ॥ २ ॥ कांसे कसिला वो पिरवे सोनसळा । कटीं कटिसूत्र जडित मेखळा । उदरीं त्रिवळी वो तुळसी वनमाळा । कौस्तुभ पदकें द्विजचरणांकुश सोज्वळा ॥ ३ ॥ मुखमयंक पूर्णांशें उगवला । भक्त चकोरासी अमृतें वरुपला । दंत तिरयाचा प्रकाश फांकला । आधार सोज्वळ वो नासाग्र सरळ वो ॥ ४ ॥ निडळीं रेखिलें वो केशर झळके । श्रवणीं कुंडलाचें तेज फांके । नयनीं सुतेज विद्युल्लता चमके । माथां मुगुटावरी मयूरपिच्छ स्तवकें वो ॥ ५ ॥ सुंदर साजिरे वो स्वरूप ठाण माण । तेणें आकर्षिलें माझे पंचप्राण । नावडे आणिक वो त्याचीच मज आण । निळा म्हणे मी माझें याची झाली बोळवण वो ॥ ६ ॥

६३६ वदविली अरुषवाणी । वैदिक पुराणा मिश्रित ॥ १ ॥ म्हणोनियां संतसजन । करिती श्रवण बैसोनीं ॥ २ ॥ अर्थ तात्पर्याचे घेती । आणि डोलविती मस्तक ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसें केलें । मज या विठ्ठलें दयापत्रें ॥ ४ ॥

६३७ वर्णितां चरित्रें न पुरे धरणी । वाचा लांचावली हरिच्या गुणीं । स्वानंदाची उघडली खाणी । नामस्मरणीं मातली ॥ १ ॥ अधिक अधिक

स्फूर्तीचा प्रसर । आगळीं अक्षरें चालती फार । नेणों फुटलें हें चिदंबर । मेघवृष्टिन्यायें होतसे ॥ २ ॥ आवारताही नीवरे मती । लिहितां न पुरे हे दिवसराती । न कळे काय केलें संतीं । देउनी प्रसाद आपुला ॥ ३ ॥ अवघेंचि उघडुनियां भांडार । दृष्टी दाविलें सारासार । लेववूनियां ते ते अलंकार । केलें समोर बोलावया ॥ ४ ॥ अक्षरें वाचे येती । ते ते प्रमेयेंसीचि उठती ॥ ५ ॥ नाहीं वाचेसी गुंतागोवा । तात्पर्यार्थेचि हा अथवा । ऐसा योजूनियां बरवा । मुहूर्त दिधला समर्थीं ॥ ६ ॥ निळा आईत्या पिठावरी रेघा ओढीत बैसला घरीं । दैव मोडोनी आलें वरी । होतें संचिती म्हणउनी

६३८ वाम चरणीं वाहे नीर । गंगा अमृताचे पाझर ॥ १ ॥ आवडे ते माझ्या मना । धणी न पुरेचि लोचना ॥ २ ॥ महिम जोडला लामु-द्रिका । ध्वज वज्र अंकुश उर्ध्वरेखा ॥ ३ ॥ निळा म्हणे मंजुळ गाती । वाळे वांकी रुणझुणिती ॥ ४ ॥

६३९ वाउग्या खटपटा । नावडती तैशा चेष्टा ॥ १ ॥ जेणें भ्रंश बुद्धी । न पावती स्वरूपसिद्धि ॥ २ ॥ घालिती घालणीं । काय करूं तें बोलणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे मिथ्या वाद । काय करावे ते छंद ॥ ४ ॥

६४० वाचें बोलविलें देवें । मज हे काय होतें ठावें ॥ १ ॥ सहज नामें आळवितां । ओघ आला हा अवचिता ॥ २ ॥ संत जाणती अंतर । कीं हा रखुमाईचा वर ॥ ३ ॥ निळा म्हणे पुसिलि गोठी । न ये ओठीं तें पुन्हां ॥ ४ ॥

६४१ वाचा वेधली हरिकीर्तनीं । श्रवण श्रवणीं गोडावले ॥ १ ॥ नेत्रीं बैसलें हरीचें रूप । पूजनीं पडप उभय करां ॥ २ प्रदक्षणे सोकले चरण । अष्टांत आलिंगन नमस्कारा ॥ ३ ॥ निळा म्हणे हेंचि कोड । अवघिया चाड विठ्ठलीं ॥ ४ ॥

६४२ वेडा नव्हे मुका चतुर शहाणा । बोले अबोलणा मौनावस्था ॥ १ ॥ विष्णुदास निळा वाना विदेहता । अंगीं सप्रेमता आवडीची ॥ २ ॥ हृदयीं ते सुंदर चतुर्भुज मूर्ती । मुखी नामकीर्ति ब्रीदावळी ॥ ३ ॥ नेणता म्हणोनि संतीं आपंगिला । निळा निरविला पांडुरंगा ॥ ४ ॥

५४३. व्यापूनियां ठायां ठावो । अवघाचि देवो प्रगटला ॥ १ ॥ संतकृपा फळा आली । ते दरुशली स्वानंद ॥ २ ॥ विस्तारली सहजें गुणचर्या ॥ ३ ॥ निळा ह्मणे काणिसें दाट । नाहीं फल कट कणभारें ॥ ४ ॥

५४४. सत्यासाठीं माझी चाली । संतीं केली आज्ञा ते ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल म्हणों मुखें । वाणूं सुखें गुण त्याचे ॥ २ ॥ काय आम्हां दासा चिंता । धणी पुरवितां शिरावरी ॥ ३ ॥ निळा म्हणे निश्चितीनें । असो वचनें एकाचिया ॥ ४ ॥

५४५ सर्वकाळ तेंचि वाटे । रूप पहावें गोमटें ॥ १ ॥ जैंका पुंड-लिकाचें द्वारीं । उभें ठेलें विटेवरी ॥ २ ॥ पितांबराचें परिधान । मुगुट कुंडलें विराजमान ॥ ३ ॥ निळा म्हणे कौस्तुभ गळां । नाना पुष्पें तु-ळसीमाळा ॥ ४ ॥

५४६. सदांचा हा धाला सदांचा भुकेला । सदांचा निजेला जागा सदा ॥ १ ॥ ऐसाये परिचा आंबुला साजणी । वरिला सुवासिणी सदांचि मीं ॥ २ ॥ सदांचा बोलिला सदांचा हा मुका । सदांचा हा लटिका खरा सदां ॥ ३ ॥ सदांचा हा वेडा सदांचा हा कुडा । सदांचा हा निर्मिडा भीड सदां ॥ ४ ॥ सदांचा हा दाता सदांचा मागता । सदांचा हा रिता भरला सदां ॥ ५ ॥ निळा म्हणे जवळी ना हा दुरी । सदां स-बाह्यांतरीं नसोनि वसे ॥ ६ ॥

५४७. सहजचि होतां उभा । संत सेवेचिया लोभा ॥ १ ॥ तंव काढिला निक्षेप । हातीं दिला तो अमूप ॥ २ ॥ नाहींचि अंत जया । किती माप लाऊं तया ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवसराती । न पुरे करितां गणती ॥ ४ ॥

५४८. सांपडली वाट । आम्हां वैकुंठाची नीट ॥ १ ॥ सहज वचनीं वि-श्वासतां । संतसंगती लागतां ॥ २ ॥ [illegible] दाट । हातें भ्रांतीचे कचाट ॥ ३ ॥ निळा म्हणे सुखी । आलों [illegible] ॥ ४ ॥

५४९. सिंधुतनया सेवितां प्राय । तुमचे तल्लीन होउनी ठाय ॥ १ ॥ ब्रम्हानंदाची राणीव । चरणरेणु माजी सर्व ॥ २ ॥ म्हणे हे न विसंबें मी आतां । युगें कल्पकोटी जातां ॥ ३ ॥ निळा ह्मणे रुकुमार तें । विटे सांपडलें आमुतें ॥ ४ ॥

५५०. सुखी केलें सुखी केलें । संती दाविलें निज हित ॥ १ ॥ जन्मोजन्मीं दास त्यांचा । पोसणा ठायींचा पुरातन ॥ २ ॥ नित्य आपुला आठव देती । आणि पुरस्कारिती निज सेवे ॥ ३ ॥ निळा ह्मणे हेंचि त्यांचें । वर्तन ठायींचें पूर्वापार ॥ ४ ॥

५५१ सुखी सांठविलें सुख । हरिखा हरिख भेटविला ॥ १ ॥ आनंदासी आनंद झाला । सद्गुरु भेटला तेचि क्षणीं ॥ २ ॥ प्रतीतीसही प्रतीत झाली । शांति मेळविली निजशांती ॥ ३ ॥ निळा म्हणे सुकाळ ऐसा । केला दशदिशा कोंदलीया ॥ ४ ॥

५५२. सेवकाचि परि स्थापिला पदीं । मग त्याचिये बुद्धी कोण तुके ॥ १ ॥ तैसेंचि केलें मजही देवा । निक्षेप अवघा दावूनियां ॥ २ ॥ आइता वांटा दिधली जोडी । कवडीनें कवडी सांचिली ते ॥ ३ ॥ निळा म्हणे देवा आभाराचि केले । मज सेवका गौरविलें आपुलिया ॥ ४ ॥

५५३ सेंघे दाटलीं अक्षरें । माप नव्हें पुरें । केली माझीया दातारें । अति वृष्टी कृपेची ॥ १ ॥ लिहितां न पुरें दिवसरातीं । वाढविला विस्तार तो मती । जैसे क्षीराब्धीवरी येती । तरंग मिरविती असंख्य ॥ २ ॥ नाना प्रमेय नाना कथा । नाना पदांचिया चळथा । निवती त्या पंढरीनाथा । आवडती प्रियवादें ॥ ३ ॥ संतचरित्रें हरिचे गुण । केले पवाडे ते विंदान । नाना पतितांचें उद्धरण । केलें संरक्षण दासांचें ॥ ४ ॥ ऐशिया स्तवनीं लाविली वाचा । बडीवार हरीचिया नामाचा । केला प्रतिपाळ तो दासाचा । वारंवार आठवितां ॥ ५ ॥ नाना नामें नाना चरित्रें । कल्याणरूपें अती पवित्रें । श्रवणें पठणें गातां वक्रें । हरिच्या पदातें पाववितीं ॥ ६ ॥ आइती जोडूनियां ठेविली । होती ठायींचि गुंफिली । निळा म्हणे तेचि वोपिली । माझिये वदनीं वरदानें ॥ ७ ॥

५५४ संतीं केला अंगीकार । मज हा निर्धार बाणला ॥ १ ॥ त्यांचिया बोलें अभयदानें । निःशंक वचनें हीं ऐशीं ॥ २ ॥ नाहीं कोठें गोंवागुंती । अक्षरें चालती गुंफिलीं ॥ ३ ॥ निळा म्हणे सत्यासाठीं । जाणती चावटी माझी ॥ ४ ॥

५५५ संत कृपा वरद बळें । माझी वचनामृत फळें ॥ १ ॥ स्वीकारिजे पंढरीनाथें । बैसोनियां सादर चित्तें ॥ २ ॥ म्हणती गोड हे तुझी वाणी । सद्गुरुकृपेचीं बोलणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे श्रोते संत । प्रसन्नपणें दत्तचित्त ॥ ४ ॥

५५६ संतीं सांगितलें मज । आपुलिये गुज अंतरींचें ॥ १ ॥ म्हणती आठवी पंढरीनाथा । सांडी वार्ता इतरांची ॥ २ ॥ नको विसंबो तूं यासीं । अगाध सुखासि पावशील ॥ ३ ॥ निळा म्हणे सेवा आतां - हेचि प्रसन्नता आमुची ॥ ४ ॥

५५७ संतीं ठेविलें निश्चळ ठायीं । चित्त हें पायीं आपुलीये ॥ १ ॥ तेणें समाधान वृत्ती । नव्हेचि स्थिति पालट ॥ २ ॥ अखंडिता राहिलें ध्यान । होउनी उन्मन मनाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपा केली । जाणें आली या अर्थें ॥ ४ ॥

५५८ संतांचिया समागमें । गाऊं नामें आवडी ॥ १ ॥ काय आमचें करील काळ । कळीचे मळ नातळतां ॥ २ ॥ हरीच्या नामें शुचिर्भूत । वाचा पुनीत करचरण ॥ ३ ॥ निळा म्हणे घडीं घडीं । करूं हे जोडी नित्य नवी ॥ ४ ॥

५५९ श्रोते वक्ते होती सुखी । अध्यात्मविखीं भाविक ॥ १ ॥ ऐसा केला प्रसंग हरी । आरुष वैखरी वदवुनी ॥ २ ॥ सावडेचि परि रुचे ऐसें । केलें सौरसें आपुलिया ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुला भक्त । देवें केला गुणातीत ॥ ४ ॥

५६० होतें बहुत दिवस आर्त वागविलें । आजी अकस्मात तें फळ देऊं आलें । दृष्टी श्रीहरीचीं देखिलीं पाउलें । घेतलें जन्म मागें सार्थक त्याचें झालें वो ॥ १ ॥ धन्य हे आनंदाची सांपडली वेळ । तेणें संत

सज्जन भेटले कृपाळ । त्यांना फिडयली बुद्धीचा वोमळे । दृष्टी दाखयली येशोदेचा बाळ वो ॥ २ ॥ नाना साधनांच्या केलिया खटपटा । परि त्या त्या न पावतीचि वो याच्या दारवंटां । जाणो जातां जाणिव घाली आड-फांटा । योगाभ्यासें सिद्धी रोधिताती वाटा वो ॥ ३ ॥ यज्ञयागें स्वर्गभोग आड येती । करितां तपें काम क्रोध खवळती । नित्यानित्य ज्ञानें अभिमान वाढती । करितां तिर्थाटनें अहंकाराची प्राप्ती वो ॥ ४ ॥ जपतां मंत्रबीजें चळचि घाली घाला । करितां दान धर्म पुढे भोगविता फळा । सांवळे मिरवितां विधि निषेध आगळा । आतां हेंचि बरवें घणी पाहों याला वो ॥ ५ ॥ ऐसें शोधियले मार्ग नाना परी । न येती प्रतीति मग सांडियले दुरी । आतां गाऊनि गीतीं नाचों हा मुरारी । निळा म्हणे करूं संसारा बाहेरी वो ॥ ६ ॥

९६१ होतें पूर्वार्जित । उत्तम संग्रहीं संचित ॥ १ ॥ तेचि उत्तीर्णत्वालागीं । झालें सन्मुख ये प्रसंगीं ॥ २ ॥ भोग मोक्ष फळें । निवारलीं शांतिबळें ॥ ३ ॥ निळा म्हणे सहजचि आला । ओत्र आमृताचा हा जिव्हाळा ॥ ४ ॥

९६२ होवोनियां निश्चळ । स्थिर राहिलों अढळ ॥ १ ॥ नाहीं भय शंका मनीं । विश्वास मानियला वचनीं ॥ २ ॥ ज्याचें तया पुढें । बोलेन वेडेंही वांकडे ॥ ३ ॥ निळा म्हणे देवें । वदविलें ते वदेन भावें ॥ ४ ॥

---

## मनास उपदेश

९६३ अभीशापासीं कारण । मुख्य संभाषण परस्त्रीचें ॥ १ ॥ सहज एकांतीं बोलूं जातां । उपजे विकल्पता सकळांसी ॥ २ ॥ मग तें अपघातासी मूळ । करी तात्काळ नाघरत ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रमादी ऐसी । प्रमदेपासीं अखंड ॥ ४ ॥

९६४ अभिमानाच्या भलो । ज्या त्या कर्मी लिप्त घाली ॥ १ ॥

नेणोनियां ज्ञान मूढें । भोगासक्त पुढें पुढें ॥ २ ॥ म्हणती अंगें आम्हीं केलें । सहजें जें जें घडोनि आलें ॥ ३ ॥ निळा म्हणे मत्तें ऐसीं । गुंतली ते काळपाशीं ॥ ४ ॥

९६५ अवघियाचि ज्ञानें अवघीचि जाणें । परि एक नेणें आत्मज्ञान ॥ १ ॥ बोल तितुके बोलचि वरी । परि न चढे पायरी प्राप्तीची ॥ २ ॥ आपुलेंचि हित आपण नेणें । वरी आणिकां शाहाणें करूं धांवें ॥ ३ ॥ निळा म्हणे टाकुनी लोकां आपणहि नर्का जात सवें ॥ ४ ॥

९६६ अवघेंचि हें कर्मफळ । ओढवलें सकळ जगत्रया ॥ १ ॥ स्वर्ग मृत्यु पाताळ लोक । कर्म बाधक ह्मणोनियां ॥ २ ॥ कर्मातीत झाले नर । तया लोकांतर मग कैंचें ॥ ३ ॥ निळा म्हणे पृथक होती । म्हणोनि भोगिती पृथकातें ॥ ४ ॥

९६७ अश्व पाहतां तो सोज्वळा । ह्मणती निळा शुभ्रासी ॥ १ ॥ तैसें नांवापासीं काये । करणी णाहे विचित्र ॥ २ ॥ केश विंचरिती फणी । तरि काय बहिणी शेषाची ॥ ३ ॥ निळा ह्मणे सुगरणी । नांवें केरसुणी झाडिती ॥ ४ ॥

९६८ असों चरणावरी तुमच्या ठेउनियां मन । करूनियां कीर्तन रूपीं तुमचिया दृष्टी ॥ १ ॥ होइल तें हो कैसी आमुची गती । नेणों योग-युक्ती तप साधन दुसरें ॥ २ ॥ सांगितलें संतीं करा नामाचा घोक । नलगे मग आणिक कृपा करील श्रीहरी ॥ ३ ॥ निळा ह्मणे विश्वासें त्या राहिलों ठायीं । ठेउनियां पायीं जीवभाव सकळ ॥ ४ ॥

९६९ आधीच अविश्वासी जन । म्हणती कैंचा नारायण ॥ १ ॥ कोण तारिले या काळें । लटिकीं बोलती पाल्हाळें ॥ २ ॥ लटिके संत लटिका देव । लटिकेंचि पापपुण्य सर्व ॥ ३ ॥ निळा म्हणे आमुच्या त्यागें । तुम्हांसी निंदिजेल जगें ॥ ४ ॥

९७० आपणा नोळखे । झाले ठायींचि पारिखे ॥ १ ॥ विस्मय हा वाटे मना । कैसी भ्रमाची भावना ॥ २ ॥ निज विसराचिया हातें । हार-

विले हो आपणीयातें ॥ ३ ॥ निळा म्हणे घरिंच्या घरीं । आपआपणी यासीचि चोरी ॥ ४ ॥

५७१ आपली धणी पुरें तों घ्यावें । उरलें ठेवावें तैसेंचि ॥ १ ॥ भरला आहे हा सागर । न लगे अंत पार कोणासी ॥ २ ॥ उदंड मागें झाले सुखी । आतां ही आणखी पावतील ॥ ३ ॥ निळा म्हणे नित्य नवा । आहे हा ठेवा जगादीचा ॥ ४ ॥

५७२ आर्त जीवींचें जाणती । तथा भेटती नस्वरीत ॥ १ ॥ करितां नामाचें चिंतन । देती बोरसोन निज लाभ ॥ २ ॥ भाव देखोनियां चित्तीं । प्रसन्न होती तात्काळ ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्व जाण । हेंचि ओळखण संतांचें ॥ ४ ॥

५७३ आर्त सर्वदां वाहती । संत भेटावेसें चित्तीं ॥ १ ॥ तयांपासी त्यांचा भाव । संतभेटीचा उपाव ॥ २ ॥ नाहीं तया धन वित्त । कांहीं वेंचावें लागत ॥ ३ ॥ निळा म्हणे निश्चयेंसी । संत भेटती तयासी ॥ ४ ॥

५७४ अवघा टाकोनियां धंदा । यारे गोविंदा सांगातें ॥ १ ॥ आ-वघेचि लाभ येती घरा । तुमच्या एक मोहरा बोळेनि ॥ २ ॥ काय काडोनियातें भुस । न लभे लेश कणाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे पुरे उरे । सेव धुरे चालतां ॥ ४ ॥

५७५ आशाबद्धा नाहीं मान । बहुत सन्मान नैराश्या ॥ १ ॥ या-चिलागीं विचार करा । हित तें धरा मानसीं ॥ २ ॥ भजतां देवा देवचि होती । विस्मरणें जाती अधःपाता ॥ ३ ॥ निळा म्हणे ममता बाधी । नित्य समाधी निःसंगा ॥ ४ ॥

५७६ आशाबद्धाचिया मुखें निघे अक्षर तें तें फिकें ॥ १ ॥ श्रवणीं बैसोनियां श्रोता । विटे ऐकुनी त्याची कथा ॥ २ ॥ न करुनियां नम-स्कार । अव्हेरिती नारीनर ॥ ३ ॥ निळा म्हणे जळो जिणें । सदां त्याचें लाजिरवाणें ॥ ४ ॥

५७७ आहारें काया जोडी केली । नर्कासी घाडिलीं उभय कुळें

॥ १ ॥ उपजतां तुज संतोषले सर्व । बुडविलें नांव त्यांचेंही त्वां ॥ २ ॥ असल्याची वाचे सदा रावणुक । चोरी सिनळिक न संडसी ॥ ३ ॥ निळा म्हणे वृथा हाहाभूत जन्म । केला ऐसें अकर्म आचरोनी ॥ ४ ॥

९७८ आंतु बाहेरी सर्वांपासीं । परि हा कोणासी नाढळे ॥ १ । मोहियली मायाभ्रमें । संसार संभ्रमें म्हणोनियां ॥ २ ॥ विस्मरणांचे हा पडे दिठी । स्वार्थ पोटीं विषयाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे गेलीं वांया । ऐसा पावोनियां नरदेह ॥ ४ ॥

९७९ आजिवरी काळ वृथाचि गेला । जेथुनियां झाला सृष्टीक्रम ॥ १ ॥ ऐसेचि नाना धरितां वेष । न तुटती पाश कर्माचे ॥ २ ॥ केव्हां स्वर्ग केव्हां नर्क । केव्हां दुःखदायक संसार ॥ ३ ॥ निळा म्हणे न पुरे घडी । ओढा ओढी कल्प जातां ॥ ४ ॥

९८० आणिकांसी सांगे आशेचें बंधन । सदाचा बराडी असोनी आपण ॥ १ ॥ काय म्हणावें यावरि आतां । नष्टाचा परम नष्ट हाचि हा पहातां ॥ २ ॥ भवताच्या हाताची पहातसे वास । कांहीं देतील म्हणउनी टोकताचि बैसे ॥ ३ ॥ जळफळ पुष्प देतां कांहींचि न सोडि । देऊं जातांचि घाली हा तोंडीं ॥ ४ ॥ आशेचा बांधला देव हा कैसा । काय निवारील आमुची आशा ॥५॥ भक्त नेदिती तैं उपवासीचि बैसे । काय खाईल जवळी कांहींचिया नसे ॥ ६ ॥ निळा म्हणे हा अनाथ बापुडा । जाणती संत परि न बोलती भीडा ॥ ७ ॥

९८१ आणिकाची संपत्ती । देखोनि दुःख मानी चित्तीं ॥ १ ॥ ऐसा पातकी चांडाळ । अशुचि तो सर्वकाळ ॥ २ ॥ करी सज्जनाची निंदा । आपण दरिद्री सर्वदा ॥ ३ ॥ निळा म्हणे सहज गांठी ... घात- नेच्या कोटी ॥ ४ ॥

९८२ आतां निज प्रेमाची हे जाती । देह...
घिया संसारें निवृत्ति । देवो चित्तीं सर्वदा ...
कोणी फिरोनिया न पाहे । विषय देखोनि...

नावें ॥ २ ॥ एक आत्मा न दिसे दुजें । ज्ञान त्या नांव बोलिजे ॥ विरक्ति निर्लोभता ते सहजें देहमाता न बाधी ॥ ३ ॥ साहे सर्वांचे अपराध । क्षमा त्या नांव तें अति शुद्ध ॥ सोसी अंगीं दुःखादिबाध । निर्द्वंद्व निर्मत्सर द्वेष न करितो ॥ ४ ॥ निळा म्हणे तेचि शांति । सर्वदा आनंदमय चित्तवृत्ती ॥ दया ते भजन सर्वांभूतीं । भक्तांते देवा न विसंबे ॥५॥

५८३ आतां तरी विचार करी । ध्यायीं अंतरीं विठ्ठला ॥ १ ॥ नाहीं तरी व्यर्थचि जासी । पुढें चौऱ्यायसी भोगावया ॥ २ ॥ जिणें मरणें बाहुनी दुःख । कोणते अधिक सांग पां ॥ ३ ॥ निळा म्हणे जरा व्याधी नाना उपाधी दरिद्रें ॥ ४ ॥

५८४ आहाडे पाहाडे गे वावुगेचि झगडे । नको करूं बाई आतां पाहे मागें पुढें ॥ १ ॥ सावळा श्री रंग गे व्यापुनि आसे जग । त्यासि नव्हे क्षत ऐसे बोल बोले चांग ॥ २ ॥ वेड्या वाकुड्या गोटिंगे नकोकाढु वोटी । ध्यानिं मनीं गीतीं गाई कान्हो जगजेठी ॥ ३ ॥ निळा म्हणे निंदास्तुति जयासि समान । त्याचि सवे बोल उणे करिल बहुमान ॥ ४ ॥

५८५ उत्तम अधम जया जे संगती । तैसी त्याचि मति फांकों लागे ॥ १ ॥ सज्जना संगती धर्म क्रिया वाढे । पापीया आवडे पापबुद्धि ॥२॥ म्हणोनि जैसिया तैसा झाला हरी । भक्ता मित्र वैरि निंदकाला ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणे अंतरींचा भाव । तया तैसा देव फळदाता ॥ ४ ॥

५८६ एकलेंचि यावें । जोडिले नये सवें देखती सर्व ॥ १ ॥ परि या माया भ्रमें कैसा केला गुंता । न पुरती संचिता भोगितां भोगा ॥ २ ॥ पुन्हा जन्म पुन्हा मरणचि सांगाती । यमदंड पावती गर्भवास ॥ ३ ॥ निळा म्हणे ... कृति कंटाळा । टोके जेवि काउळा वमनासाठीं ॥ ४ ॥

...चे हरि । नेणोनियां चराचरी ॥ १ ॥ करिती निंदा ... गुणदोष ॥ २ ॥ क्षणीक पसारा । मायीक मा- ... म्हणे गेलीं । ऐशींच कितेकें नाडलीं ॥ ४ ॥

...यातना । कां रे मना वीट नये ॥ १ ॥

बुद्धिहीना मतिमंदा । किती आपदा ऊसंतिसी ॥ २ ॥ कधीं पावेल परि-पाक । बुद्धि विवेका स्पर्शेल ॥ ३ ॥ निळा म्हणे रित्या मापें । विषय संकल्पें मवितोसी ॥ ४ ॥

९८९ ऐसियाचे घरीं ऐसीचि मी सदा । न करुनी कांहीं धंदा सर्वहि करी ॥ १ ॥ सदाचि निष्काम सदा मी सकाम । सदा रूप नाम नूतन माझें ॥ २ ॥ सदा नाहिंपणें सदा माझें जिणें । सदा होणें निमणें माझा वांटा ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसें बोले मायादेवी । अबोल-ण्याची गांवीं वसोनियां ॥ ४ ॥

९९० किंचित् सुख आगळें दुःख । पावती अवश्यक व्यभि चारी ॥ १ ॥ क्षयो व्याधी भगें पडतीं । जगनिंद्य होती हे आधीं ॥ २ ॥ पुढें राजा दंड करी । सर्वस्व हरी देखतां ॥ ३ ॥ निळा म्हणे हांसती लोक । थुंकिती थुंक तोंडावरी ॥ ४ ॥

९९१ कैसा होतो ब्रम्हानंद । भाग्यमंद न देखति ॥ १ ॥ वाजतां वाद्यें नाईके कानीं । वीट मानी अभागी ॥ २ ॥ ह्मणे सेवूं यारे गडी । तोडूं बेडी संसार ॥ ३ ॥ निळा ह्मणे ऐसी वेळ । न लभे काळ वेच-लीया ॥ ४ ॥

९९२ कोण भाग्याचे ते लोक । केलें कौतुक तुम्ही ज्यांचें ॥ १ ॥ वागउनियां कडिये खांदीं । निजात्मपदीं स्थापियलें ॥ २ ॥ ज्याचिया व-चनासाठीं उडी । घालुनी तातडी उभे ठाके ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवस राती । जयाप्रती न विसंबा ॥ ४ ॥

९९३ कृपावंत माये । तान्हयाचे झटे साहे ॥ १ ॥ नेदीचि हे रागा हातीं । करी बुझाउनी प्रीती ॥ २ ॥ पुरउनीयां आळी । कृपादृष्टी त्या न्याहाळी ॥ ३ ॥ निळा म्हणे ह्मणे । दिसेल हें केविलवाणें ॥ ४ ॥

९९४ खेळ खेळ झेंपागे आठवि चिद्रुपा । नाहिंतरि पुनः पुन्हा न चुकति खेपा ॥ १ ॥ घेई बारवोटि गे काढि सागरगोटी । जेणें अर्थ स्वार्थ परमार्थ पडे पोटीं ॥ २ ॥ बरवि घालि झेंप गे लांबउनि हात ।

नाहिं तरी लाजोनिया आयुष्या करिसि घात ॥ ३ ॥ निळा म्हणे डोले गे हरिचिया तोले । जेणें इहपरलोकीं विकसिल मोले ॥ ४ ॥

९९५ गुंतली ते आशा । पडिली मोहजाळ फांसा ॥ १ ॥ न देखोनियां श्रीहरी । कर्ता भोक्ता संसारीं ॥ २ ॥ अवघींचि त्याचि सत्ता । करवी करितो तत्वता ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसी । नेणोनि होती कसाविसी ॥ ४ ॥

९९६ गेला फिरोनिया दिवस । न ये घटिका लव निमिष ॥ १ ॥ आहे तोचि भरा हातीं । महा लाभाचि संपत्ती ॥ २ ॥ मागे नागावली फारें । गेलीं वायां नारीनरें ॥ ३ ॥ निळा म्हणे म्हणोनि जागा । सांडोनी वोरबार वाउगा ॥ ४ ॥

९९७ गोड लागे जें आपणा । तेंचि वांटी सकळां जणां ॥ १ ॥ पोट भरे तों पुरवी । उरले बांधोनियां ठेवी ॥ २ ॥ जतन आहे तुम्हासाठीं । नका धांवो बारावाटी ॥ ३ ॥ निळा म्हणे सांगा । पाहिजे तें निवीचें मागा ॥ ४ ॥

९९८ घालितां उमाणी पोरा नुमजति तुज । उकलुनिया हरि घेई ह्रदईचें निज ॥ १ ॥ असोनियां चराचरी न दिसे तें काय । नाहीं जया कान डोळे मुख हात पाय ॥ २ ॥ एकना अनेक नव्हे नव्हेची कांहीं नाहीं । नसोनियां तेचि वसे अखंड देहादेहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे सांग माझे ऐके हे उम्राणे । नेणवेत रिपुस सुखें हरिचीं हीं लक्षणें ॥ ४ ॥

९९९ चौऱ्यायशी लक्ष योनिप्रती । फेरे खाती यातना ॥ १ ॥ संकटापासूनि सोडविता । कोण हो होता देवावीण ॥ २ ॥ निष्काम करूनीं ठेविता दासां । कोण होता ऐसा देवावीण ॥ ३ ॥ निळा म्हणे निर्लोभ शांती । कोण देता हातीं भक्तांचिये ॥ ४ ॥

१०० जरी झाला तपस्वी थोर । तरी असावें दूर परस्त्रीसी ॥ १ ॥ गुरूनीहीं एकांतासी । नव जावें स्त्रियांसी उपदेशा ॥ २ ॥ बसतां एकत्र आनेविन । होईल जघन्य निर्मीषें ॥ ३ ॥ निळा म्हणे जतन करा । शाहाणे विचारा ऐसें आतां ॥ ४ ॥

६०१ जाईल तेथें तेंचि फळ । दुःख कल्लोळ यमजाच ॥ १ ॥ हरि-भक्तांसी विन्मुख होती । ते ते जाती अंधःपाता ॥ २ ॥ दुःख शोक व्याधी पीडा । अपघात रोकडा हाचि त्यासी ॥ ३ ॥ निळा म्हणे सुकृत नेणें वेष्टिले गुणे मायेचिया ॥ ४ ॥

६०२ जाणिवेचें ज्ञान । तर्कवादाचें जल्पन ॥ १ ॥ काय करूं तो गोमटा भरला अहंकाराचा फाटा ॥ २ ॥ बोले तें तें ताये ताये नेणे । परमार्थाचि सोये ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसींची गती । पावे आपुलिया मती ॥ ४ ॥

६०३ जारण मारण स्तंभन मोहन । वशीकरण उच्चाटण विध्वंसन आवडती । येणेंचि मिरविती जगीं । अशुचि अनुरागीं निरंतर ॥ २ ॥ जव्या बुट्या हातीं शिरीं । ताईताभीतरी वागविती ॥ ३ ॥ निळा म्हणे चिरकाळ नर्की । बसावया कुंभपाकीं पूर्वजेंसी ॥ ४ ॥

६०४ जुनाट पारखी । पारखिलें सनकादिकीं ॥ १ ॥ आतां कोण काढी खोडी । मोडूं जातां फाडोवाडी ॥ २ ॥ दुरूनि देखतांचि कळे । निवती देखण्याचे डोळे ॥ ३ ॥ निळा म्हणे खऱ्या वित्ता । बोल कोण ठेवी आतां ॥ ४ ॥

६०५ जे जे येती वारकरी । भेटों हरि धांवे त्यां ॥ १ ॥ म्हणे माझे अंत-रंग । आले जिवलग भेटीसी ॥ २ ॥ करुनी प्रीतीचा सोहळा । अवलोकी डोळां क्षणक्षणां ॥ ३ ॥ निळा म्हणे आवडी ऐसा । होउनी सरिसा ठाके पुढें ॥ ४ ॥

६०६ जें जें बोले तें विकळ । नाहीं विठ्ठलीं कळवळ ॥ १ ॥ कोरडेचि शब्दज्ञान । नाहीं प्रेमाचें जीवन ॥ २ ॥ जाणे तर्क वितर्क मति । समर्पक समयीं स्फुर्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे पडिली हातीं ॥ जाणिवेच्या नुगवे गुंती ॥ ४ ॥

६०७ जेथें जेणें केला वास । तोचि वाटे त्यास निज ग्राम ॥ १ ॥ एरवीं सर्वहि भूमंडळ । आहे हें स्थळ याचेंचि ॥ २ ॥ अवघेचि पाहोनि

फिरोनि आला । परि त्या विसरला निज ठाया ॥ ३ ॥ निळा म्हणे घे तलें सोंग । तेंचि त्यासी मग गोड वाटे ॥ ४ ॥

६०८ ज्याचा विश्वास जडला पायीं । हरि वीण कांहीं नेणती ॥ १ ॥ त्याचा करी अंगीकार । निरसी अंधार ममतेचा ॥ २ ॥ सत्यासत्य दाखवी तया । लावी आपुलीया निजसोई ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसें वर्म । सांपडे सुगम एकनिष्ठा ॥ ४ ॥

६०९ ज्याचें अंतर तया ठावें । उमटेल बाहेरी क्रियाभावें ॥ १ ॥ म्हणोनियां धीर करा माजिवरींचें दारा ॥ २ ॥ नव्हे आत्रा तुरडा खेळ । सत्ता ज्याची त्याचे बळ ॥ ३ ॥ निळा म्हणे आहे धणी । शिरीं संपन्न सर्वां गुणीं ॥ ४ ॥

६१० ज्याचें देणें त्याचें नाम । गावें प्रेम धरूनियां ॥ १ ॥ नाहीं, तरी घडती दोष । अंगीं निःशेष कृतघ्नता ॥ २ ॥ पिंड वाढे ज्याच्या अन्नें । त्याचेचि वानें वाढवावे ॥ ३ ॥ निळा म्हणे माझे दाते । सरते पुरते संतजनी ॥ ४ ॥

६११ झगमगी काजवे । रात्रीं दिवसां नव्हे ठावें ॥ १ ॥ म्हणोनियां न ये मोला । नाश पदरीं असे त्याला ॥ २ ॥ दिसे पतंगाचा रंग । नाहीं धुतला तोंवरी चांग ॥ ३ ॥ निळा म्हणे परमहंस । झाला बहुरूपी परि तें फोस ॥ ४ ॥

६१२ ठायीं मीचि नाहीं म्हणे । हारपलों भ्रांतिगुणें ॥ १ ॥ लोकां म्हणे धांवा धांवा । मज आपणा भेटवा ॥ २ ॥ प्रभा सूर्यातें गिवसि । गोडी पुसे साखरेसी ॥ ३ ॥ निळा म्हणे लहरी सिंधु । भेटावया करी खेदु ॥ ४ ॥

६१३ तत्वतां न कळे । आलें मना तें चावळे ॥ १ ॥ खरियासी मानी खोटें । खोटें खऱ्या ऐसें वाटे ॥ २ ॥ अंध न देखे निवाडु । तम तैसा हाचि उजिवडु ॥ ३ ॥ निळा म्हणे बुद्धि मळीन । नेणें पाप कीं हें पुण्य ॥ ४ ॥

६१४ तेचि माझे सर्वसाक्षी । आहेति कैं पक्षी म्हणोनि ॥ १ ॥ काय केलें इतरां जनां । भरली भावना त्रिविधा ॥ २ ॥ ठावें ज्याचें तया वर्म । आणिकां दुर्गम जाणतियां ॥ ३ ॥ निळा म्हणे व्याली जाणे । वांझे वायाणें तिडकांचें ॥ ४ ॥

६१५ त्याचिमार्गी होती जाती । जिव त्या नेणती आत्मया ॥ १ ॥ नवल याची लाघवी माया । यातें ने देऊनियां विसारे ॥ २ ॥ जेथें तेथें उभीचि आड । होऊनियां कवाड भ्रांतीचें ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रम्हादिकां । याचिपरी लोकां झकविलें ॥ ४ ॥

६१६ त्रास उपजे माझिया मना । अवलोकितां त्यांच्या वदना ॥ १ ॥ जे या दूषिती नामासी । कृत्रिम करिती उपदेशासी ॥ २ ॥ सांगती पाखांड । बोल बोलोनियां वितंड ॥ ३ ॥ निळा म्हणे जाती । घेउनी नर्की शिष्यांप्रती ॥ ४ ॥

६१७ त्रिविधाच्या बुद्धी तिन्ही । वर्तती गुणी आपुलाल्या ॥ १ ॥ जैसी क्रिया तैसें फळ । हें तों सकळ जाणती ॥ २ ॥ उत्तम मध्यम अधम भेद । जाणती विषद जाणते ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुलाल्या परी उमटती अंतरीं भाव भिन्न ॥ ४ ॥

६१८ दुभिन्नले जया पाय । तया सुखा उणें काय ॥ १ ॥ महिमा जाणे पृथुराजा । किंवा गौतमाची भाजा ॥ २ ॥ ध्यानीं ध्यातां चंद्रमौळी । समाधिस्थ नित्य काळीं ॥ ३ ॥ निळा म्हणे सनकादिक । संतहि जाणती सकळिक ॥ ४ ॥

६१९ दुर्जन तेचि पुढिलांचे सुख । देखोनियां दुःख मनीं जीवीं ॥ १ ॥ तापल्या तेलीं पडतांचि शीतळ । जैसा उठी ज्वाळ भडका करी ॥ २ ॥ पुढिलांचे उत्तम गुण । ऐकोनियां उत्थापन करूं धांवे ॥ ३ ॥ निळा म्हणे यातना त्यासी । केवीं नर्कवासी नव्हती सांगा ॥ ४ ॥

६२० नयेचि साच हा प्रतीती । असोनिया मूर्ती भगवंत ॥ १ ॥ कर्माकर्मे लागली पाठीं । बैसले दृष्टी मळ त्यांचे ॥ २ ॥ सत्याचि परि । तें

असत्य वाटे । भोगिती अदृष्टें अपुलालीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कर्मतंत्रीं गुंतली यंत्रीं मायेच्या ॥ ४ ॥

६२१ न राहेचि क्षणहि भरी । कदा निश्चळ अंतरीं ॥ १ ॥ वाचाळ धांवे तैसें । कार्येविण निरुद्देशें ॥ २ ॥ करी बोलतां प्रमाद । वाढवुनि वादावाद ॥ ३ ॥ निळा म्हणे महा मुर्ख । करी सकळां सर्व दुःख ॥ ४ ॥

६२२ नष्टा सज्जना एकाचे वाट । परि अनिष्ट इष्ट फळें ॥ १ ॥ एका उत्तम वैकुंठवास । जाणें निरयास हें एका ॥ २ ॥ जातां येतां सारिखेचि दिसती । परि ते पावती पद भिन्न ॥ ३ ॥ निळा म्हणे अचिंत्य फळ । भोगवी कपाळ ज्याचें त्या ॥ ४ ॥

६२३ न सांपडे ऐसी कधीं । वेळ लागली ते संधी ॥ १ ॥ हरिचे गुण वाचें यावे । श्रवणीं श्रवण ते करावे ॥ २ ॥ गेलीं जातील वर्षें काळ । आयुष्या वेंचुनियां निर्फळ ॥ ३ ॥ निळा म्हणे यालागीं करा । वेगें आतां चित्तीं धरा ॥ ४ ॥

६२४ नाना मतांतरें शब्दाच्या व्युत्पत्ती । पाठांतरें होती वाचाळ ते ॥ १ ॥ माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैसी तेथें उरी देहभावा ॥ २ ॥ यज्ञ व्रत जप तप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान ऐलाडीं तें ॥ ३ ॥ निळा म्हणे विषयीं उपरम चित्ता । व्हावी सप्रेमता आवडीची ॥ ४ ॥

६२५ न वाटे हें सांगतां खरें । न येतां बरें स्वानुभवा ॥ १ ॥ बुद्धि मलीन झाली कामें । संसारभ्रमें मन वेडें ॥ २ ॥ कैसेन येईल हें प्रतीति विश्वास चित्तीं नुपजतां ॥ ३ ॥ निळा म्हणे खरें कुडें । दृष्टी निवडे पारखिया ॥ ४ ॥

६२६ नाहीं वारी पळमात्र घडी । गेले कल्पकोडी याचिपरि ॥ १ ॥ आतां कधीं मोकळा होसी । मग या पावसी परमार्था ॥ २ ॥ पावोनि उत्तम तनु नरदेहा ऐशी । बहु वेळा आयुष्यासी नासियलें ॥ ३ ॥ निळा म्हणे अधमा हिंडोनि नाना योनी । त्रास नुपजे मनीं अझून कैसा ॥ ४ ॥

६२७ नाहीं विठोबाचे प्रेम । गाणीव श्रम वृथाचि तो ॥ १ ॥ काय करितां आपुल्या दैवा । भुली वैभवा जाणिवच्या ॥ २ ॥ भरावें पोट हेंचि

जाणती । नरदेहा धाडिती व्यर्थ वांया ॥ ३ ॥ निळा म्हणे गिळिलें कर्में। पुढें मरणजन्में अनिवारें ॥ ४ ॥

६२८ निर्भीड बोलणें । ज्यांचें अपस्वार्थी जिणें ॥ १ ॥ त्याचिये संगतीचें फळ । होय चित्तासी खळबळ ॥ २ ॥ परदुःख नेणतां । करी परान्न पुष्टता ॥ ३ ॥ निळा म्हणे दावी सोंग । ऐसा त्यजावा मातंग ॥ ४ ॥

६२९ नीच यातीसीं संगती । आवडे ज्या अहोरातीं ॥ १ ॥ तोचि ओळखावा दोषी । दुराचारी पापराशीं ॥ २ ॥ नेणे आपुला विधिधर्म । करी मना आलें कर्म ॥ ३ ॥ निळा म्हणे नर्कवासीं । करी घालुनी पूर्वजासीं ॥ ४ ॥

६३० नेणे आपुल्या हितावरी । बोले त्यांसीचि विरूद्ध करी ॥ १ ॥ जाणावा तो जन्मांतर । पूर्व दोषाचा विकार ॥ २ ॥ सर्व काळ अल्प बुद्धी । नेणे बोलों सभासंधीं ॥ ३ ॥ निळा म्हणे तया दिसे । अवघें जगचि वेडें ऐसें ॥ ४ ॥

६३१ नेणोनियां आपपर । करी भलत्यासवें वैर ॥ १ ॥ वावधूक ते काजेंविण । तोडूनी सांडी सन्निधान ॥ २ ॥ सर्व काळ अविवेक । करूनी प्रस्तावे बाधक ॥ ३ ॥ निळा म्हणे भोगी फळें । दुःखाचींच प्राचीन बळें ॥ ४ ॥

६३२ नेणोनि पारिखे । आत्मा आपणा न देखे ॥ १ ॥ न देखोनि दुजें कांहीं । आपींआप असे पाहीं ॥ २ ॥ नामा रूपा येणें । नाहीं होणें ना निमणें ॥ ३ ॥ निळा म्हणे नव्हे जागें । निजस्वप्न ना वाउगें ॥ ४ ॥

६३३ नेणोनियां आत्महित । करिती घात अभिमानी ॥ १ ॥ नसतीच वाढवूनियां उपाधी । पडती मधीं संदेहा ॥ २ ॥ नाठवूनियां विठ्ठलदेवा । करिती सेवा भूतांची ॥ ३ ॥ निळा म्हणे जन्मोनि गेला । वृथाचि पाडिला निरयांत ॥ ४ ॥

६३४ नेणा कांहीं तुम्ही आपुलिया मुखें । इतरांचीं दुःखें पिडिती तें ॥ १ ॥ यातना बहुवस संसार कांचणीं । जाचती जाचणीं जन्म जरा ॥ २ ॥ व्याधीचे वळसे दरिद्राची पीडा । मृत्यूची एवढा होता

मार ॥ ३ ॥ निळा म्हणे सांपडलीं काळा हातीं । तुगवती गुंती उगविता ॥ ४ ॥

६३५ पहावीं पाउलें नयनीं हेंचि आर्त । देखिलिया चित्त समाधान ॥ १ ॥ क्षणभंगूर हा येथींचा पसारा । याचिलागीं करा त्वरा आतां ॥ २ ॥ पाहोनी श्रीमुख धरीन हृदयीं । मग हो भलतें कांहीं देहा प्राणा ॥ ३ ॥ आल्याचें सार्थक हेंचि नरदेहा । नाहीं तरि हाहाभूत सर्व ॥ ४ ॥ म्हणोनी लवलाहो करितों याचिसाठीं । तुमच्या व्हावी भेटी पायापाशीं ॥ ५ ॥ निळा म्हणे आतां विलंब न करावा । येऊनियां देवा सांगावें ॥ ६ ॥

६३६ पदार्थ मात्र पाहों जातां । प्रगटे अवचिता त्यामाजीं ॥ १ ॥ ऐसा वेध लाविला मना । विसरों आपणा नेदीचि ॥ २ ॥ सुख विपत्ति भोगितां भोग । वेडवी अंग आपुलेचि ॥ ३ ॥ निळा म्हणे ठावोचि रिता । नेदी हा सर्वथा राहों पुढें ॥ ४ ॥

६३७ परस्त्रीसंगें घडती दोष । बुडे वंश पापें त्या ॥ १ ॥ यमधर्म घाली बंदीं । नव्हे कधीं सुटिकाचि ॥ २ ॥ पूर्वज अधःपतना जाती । मग ते शापिती अतिक्रोधें ॥ ३ ॥ निळा म्हणे पातित्य ऐसें । वरी संगदोषें परस्त्रीच्या ॥ ४ ॥

६३८ पापासवें जिणें ज्याचें । वृथाचि त्याचें झालेपण ॥ १ ॥ भोगितां भोग रडे मग । म्हणे मी जगनिंद्य झालों ॥ २ ॥ सांगतां हित नाहीं ऐकिलें । वडिलीं दाविलें विहित तें ॥३॥ निळा म्हणे आतां पडियेला खोळे । गिळियेला काळें व्याधिसर्पे ॥ ४ ॥

६३९ पाप तया नांव परदारागमन । पाप तें परधन अपहार ॥ १ ॥ पाप तेंचि निंदा परपीडा द्वेष । पाप तेंचि उपहास पुढिलाचे ॥ २ ॥ पाप तेंचि जीवीं विषयाची आसक्ति । पाप तें अभक्ति कुळाचारीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पाप मुख्य तेंचि साचे । नावडे देवाचें नाम मुखीं ॥ ४ ॥

६४० पापें पूर्वज नरका जाती । पापेंचि बुडती धर्म सकळ ॥ १ ॥ पापेंचि कुळ भंगा जाय । वंशासी होय अपघात ॥ २ ॥ पापेंचि यश कीर्ति पळे । पापेंचि सोहळे दरिद्राचे ॥ ३ ॥ निळा म्हणे घडतां पापेंचि पतनीं । पडती यातनीं पूर्वजेंसी ॥ ४ ॥

६४१ पिसाळलें श्वान । डसे भलत्या वसवसून ॥ १ ॥ नेणें आपुले पारिखे । घारलें तें आपल्या दुःखें ॥ २ ॥ सुरापानीं भुलोनि जैसा । भोगी आपणा आणिकासरिसा ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसी परी । जीविता महा मूर्ख करी ॥ ४ ॥

६४२ पुढें जाणवेल हें पहातां । अंगा येतां क्षीणत्व ॥ १ ॥ मग तो नलगे कांहीं हातीं । होईल माती आयुष्या ॥ २ ॥ म्हणोनियां करा वेग। धरा अनुराग हरिभजनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पुढिल वेळ । आहे अति काळ कठिण तो ॥ ४ ॥

६४३ पुण्यपावन त्यांची वाणी । जगदोद्धरणीं प्रवर्तली ॥ १ ॥ सद्विवेक अमृतपूर । चालती उद्वार वाचें ते ॥ २ ॥ भगवद्भजन परमार्थ वाणी । जे वेदीं पुराणीं बहु मान्य ॥ ३ ॥ निळा म्हणे अद्‌भुत रस । गोड सारांश हितकर्ता ॥ ४ ॥

६४४ फिरविसी मान तरी पिंग्याचें महिमान । नाहींतरि सरे परती जाई वो येथून ॥ १ ॥ धरी हरि चित्तीं गे पिंग्याच्या निगुति । नाहींतरि वायां जासी भोवंडीचे भ्रांतीं ॥ २ ॥ मोडिशील माजगें तरीच पिंगा साजे। लाटण्याऐसीं न लवतां फजीतीचें भोज ॥ ३ ॥ निळा म्हणे सांगितलें धरी हित कानीं । तरीच पिंगा गोड तुझा श्रीहरिचिंतनीं ॥ ४ ॥

६४५ बाप बंधु वेगळा करुनी । इतरां लागुनी बाधक ॥ १ ॥ म्हणोनि परांगनेवसें । सलगी नवजावें एकांतीं ॥ २ ॥ जरी उदंड दंडक झाला । तरी तो त्याला नाडकचि ॥ ३ ॥ निळा म्हणे ते विकल्पखाणी । प्रमदा सज्जनीं वाळावी ॥ ४ ॥

६४६ बुद्धीसि निश्चय नाहीं साचा । तेचि भ्रांतीचा मूळारंभ ॥ १ ॥ तयाचि नांव म्हणिजे वेडें । असोनि पुढें न देखे हित ॥ २ ॥ लज्जा मात्र हारपोनि जाये । नागिवेंचि ठायें उभें मग ॥ ३ ॥ निळा म्हणे न धीरी धीर । नं वदावें उत्तर सांगितलें ॥ ४ ॥

६४७ ब्रम्हीभूत होते काया । श्रीहरि पायां अनुसरतां ॥ १ ॥ परि

हा विश्वास नुमटे मनीं । जाती ह्मणऊनि निरयगांवां ॥ २ ॥ जिहीं केला हा सायास । पावले पदास ते संत ॥ ३ ॥ निळा म्हणे अनुभवसिद्ध । ऐसा प्रसिद्ध कलियुगीं ॥ ४ ॥

६४८ ब्राह्मण सोंवळाचि सर्व काळ । वसे अनामिकीं विटाळ ॥ १ ॥ हे तों याति स्वभाव गुण । इष्ट कनिष्ट अनादि भिन्न ॥ २ ॥ अवघे ठायीं पंचभौतिक । आत्मा सकळां व्यापक एक ॥ ३ ॥ निळा म्हणे गुणवांटणी । योनी विभाग चहूं वर्णीं ॥ ४ ॥

६४९ भलते वेळे भलतेंचि करी । निर्भीड सर्वदां अंतरीं ॥ १ ॥ न ह्मणे कर्म हें निषिद्ध । आलें मना तेंचि शुद्ध ॥ २ ॥ लाजेचा पेंडोळा । खाणोनि सांडिला निराळा ॥ ३ ॥ निळा म्हणे अवाच्य बोले । छंदें आपुलियाचि डोले ॥ ४ ॥

६५० भवाब्धीचें सखोल पाणी । बुडाले प्राणी बहुसाल ॥ १ ॥ येथें उतार न दिसे कोणा । थोरा लहाना नागवण ॥ २ ॥ सत्व कर्मे स्वर्गा जाती । तमें पडती अधःपातीं ॥ ३ ॥ निळा म्हणे रजतमात्मक । पावती लोक नरदेहा ॥ ४ ॥

६५१ भाविकाचा मनोभाव । पाववी देव सिद्धी हा ॥ १ ॥ तेंचि सत्य बोलिलों बोलें । माझिया आलें स्वानुभवा ॥ २ ॥ जाणे अंतरींचें आर्त । साक्षभूत सकळांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे संदेह नाहीं । अनुमान कांहीं यदर्थीं ॥ ४ ॥

६५२ भाग्यहीन द्वाड । तया बुद्धि करी नाड ॥ १ ॥ सुख तें सन्मुख । तया तें भासे दुःख ॥ २ ॥ हित अनहितावारी देखोनियां पळे दुरी ॥ ३ ॥ निळा म्हणे उफराटे । प्राक्तन होऊनियां भेटे ॥ ४ ॥

६५३ भीड भाड जाय उडोनी लौकिक । शेवटींचा रंक तोही दापी ॥ १ ॥ दावितां तो तोंड लाजे भरले सभे । मग वाळे उभें सळाचि जैसें ॥ २ ॥ सुहृद जन ते अवमान करिती । निष्ठूर बोलती त्रासवचनें ॥ ३ ॥ निळा म्हणे मग होय दैन्यवाणें । हो काय तैसें जिणें भूमिभार ॥ ४ ॥

६५४ भुंकोनियां उठी । श्वान लागे भलत्या पाठीं ॥ १ ॥ ऐसा देह-स्वभावगुण । नेणे भला बुरा कोण ॥ २ ॥ तैसाचि तो अतिवादी । अविवेकी सदा क्रोधी ॥ ३ ॥ निळा ह्मणे ओळखी सांडी । आलें तैसें बरळे तोंडीं ॥ ४ ॥

६५५ माझिया मनें धरिला विश्वास । तुमच्या नामीं घातली कास । नाहीं उपेक्षा आणि आळस । तुमच्या ठायीं शरणांगता ॥ १ ॥ बहुतां सांभाळिलें देवा । केला बहुतांचा कुडावा । बहुतां दानें वाढल्या सेवा । बहुता स्थापिलें निजपदीं ॥ २ ॥ बहुतीं गाईलें तुम्हां गीतीं । बहुतीं स्तविलें तुम्हां स्तुतीं । बहुतां ध्यानीं तुमची मुर्ती । आलिंगिली ह्रुदयांत ॥ ३ ॥ बहुतीं तुह्मां आराधिलें । बहुतीं पूजनीं तुम्हां पूजिलें । बहुतीं यज्ञावदानीं यजिलें । बहुतीं पाहिलें ज्ञानदृष्टीं ॥ ४ ॥ बहुतीं वेद स्तवनामिसें । तुमतें कवळिलें मानसें । बहुतीं योगादि सायासें । लाविलें पिसें आपणीयां ॥ ५ ॥ तुह्मी पुरेती त्यांचिया भावा । सर्वज्ञपणें जी व्यापका देवा । घेउनी सेवा आपुलिया गांवा । नेलें केशवा निज वस्ती ॥ ६ ॥ ऐशी ऐकोनियां संतवाणी । मिठी विश्वासें घातली चरणीं । निळा म्हणे माझी आरुषवाणी । लावावी गुणीं आपुलिये ॥ ७ ॥

६५६ माया म्हणिजे नसतेंचि दिसे । गगनीं जैसें दोनी चांद ॥ १ ॥ असे एक भासे आणीक । तया नांव मायीक पसारा ॥ २ ॥ सत्यावरी न पडे दृष्टी । विकल्प परिपाठी घालितु ॥ ३ ॥ निळा ह्मणे प्रत्यक्ष लपवी । लटिकेंचि रुढवी भ्रांतिजाळ ॥ ४ ॥

६५७ मागें बहुतांसि वांटिलें । पुढें आणिकांहि ठेविलें ॥ भावें विश्वासितें पावले । अधिकारिया दिधलें अधिकार ॥ १ ॥ चतुरा चतुर शिरोमणी । सकळां जाणतियांचा धणी ॥ करूं जाणतो वांटणी । भाग जैसे त्यापरी ॥ २ ॥ एका वर्णाश्रम धर्में । एका यज्ञादिक कर्में ॥ एका वेदाध्ययन नेमें । एक चतुर्थाश्रमें संन्यासें ॥ ३ ॥ एका नामस्मरण मात्रें । एका पढतां स्तवनें स्तोत्रें ॥ एका गुणानुवाद चरित्रें । वर्णितां हा तोषला

॥ ४ ॥ एका ध्यानें समजाविलें । एका पूजनचि वारिलें ॥ एका जपें बुझाविलें । एका स्थापिलें योगावरी ॥ ५ ॥ एका तीर्थें यात्रा गमनें । एका ब्रम्हचर्यादि अनुष्ठानें ॥ एका व्रतें पुरश्चरणें । गृहस्थाश्रमें वानप्रस्थें ॥ ६ ॥ निळा म्हणे हा सर्व जाणे । सर्वसाक्षी सर्वज्ञपणें ॥ जयापरि तैसें देणें । करी हा उणें नाहीं यासी ॥ ७ ॥

६५८ मुखीं पडतांचि तें शेष । करी नाश कल्मषा ॥ १ ॥ पावूनियां ब्रम्हपदा । ओपी संपदा अनैश्वरा ॥ २ ॥ शांति क्षमा दया सिद्धी येती समृद्धि ओळंगण्या ॥ ३ ॥ निळा ह्मणे सर्वहि सुखें । वरिती हरिखें शेप घेतां ॥ ४ ॥

६५९ मोलें विके स्वभावगुणीं । येरवी तितें न पुसे कोणी ॥ १ ॥ हिंगा दुर्गंधीच मोल । तेणेंविण तो अवघा फोल ॥ २ ॥ भांगीं न भुलवी भक्षिल्या । येरचि तरि तो व्यर्थचि पाला ॥ ३ ॥ निळा म्हणे तैशिया परी । देवपणेंचि देवा थोरी ॥ ४ ॥

६६० ह्मणोनि याचिया श्रवणें पाठें । वचनें पालटे देहबुद्धी ॥ १ ॥ वैराग्याची राणीव जोडे । ज्ञानाचें उघडे निज मंदीर ॥ २ ॥ नवविधाचे नाना भोग । वसविती अंग येऊनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे भुक्ति मुक्ति। शांति विरक्ति वरती त्या ॥ ४ ॥

६६१ म्हैस वोलि देता सेलि होसि कासाविस । येईल पुढें थेटें पडसें आयुष्याचा नाश ॥ १ ॥ बुड हरि सवें । देह भाव उरनिभावें ॥ २ ॥ दरडीवरी राहोनि उभा मारिसी किराणे । तळींचा धोंडा नेणोनि पारो जाशील जिवें प्राणें ॥ ३ ॥ म्हणे निळा सांडुनि खेळा श्रीहरीतें भज । आक्षोभ जळ नचले बळ होशील निर्बुज ॥ ४ ॥

६६२ याच पायीं मनोरथ । पूर्ण काम सकळहि आर्त ॥ १ ॥ म्हणोनियां धरिला जिवें । हाचि संती मनोभावें ॥ २ ॥ इच्छिलिया पद । नेतो देउनी सुख संपदा ॥ ३ ॥ निळा म्हणे खंडी मूळ । वासनात्मकाचें तात्काळ ॥ ४ ॥

६६३ याचे पायीं धरिल्या भाव । भेटेल देव निश्चयें ॥ १ ॥ नव्हे अन्यथा भाषण । ठावी खूण संतांसी हे ॥ २ ॥ निज करें कुरवाळून । देईल आलिंगन अत्यादरें ॥ ३ ॥ निळा म्हणे येईल दारा । देव सामोरा भक्तांसी ॥ ४ ॥

६६४ येथील लाभ घडे ज्यासी । तो त्या सुखासी अधिकारी ॥ १ ॥ जेथें वसती नारायण । लक्ष्मी आपण वैकुंठीं ॥ २ ॥ तेथेंचि तोहि पावेल सत्य । भोगी अद्वैत निजसुखा ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रम्हादिकां । न लभेचि एका अभिमानें ॥ ४ ॥

६६५ येथें येउनी केलें कार्या । विठ्ठल नाहीं आठविला ॥ १ ॥ आहा रे मुढा भाग्यहीना । नेलासी पतना मोहभ्रमें ॥ २ ॥ नाहीं केली सुटिका कांहीं । येचि प्रवाहीं पडिलासी ॥ ३ ॥ निळा म्हणे लाहोनि हातीं । केली माती आयुष्या ॥ ४ ॥

६६६ येऊनियां नरदेहा । कांहीं स्वहित तें पहा ॥ १ ॥ नाहीं तरी व्यर्थ जन्म । चिंतीतसे विषयकाम ॥ २ ॥ पशु विषय सेविती । तयापरी तुझी स्थिती ॥३॥ निळा म्हणे व्यर्थ गेला । प्राणी भुमि भार झाला॥ ४॥

६६७ लवेमाजीं उत्पन्न एक । रक्त शोक पशुदेहीं ॥ १ ॥ मांसाहारी जळाहारी । तृणाहारी फळभक्षी ॥ २ ॥ कोठें धान्य भक्षूनि अन्नें । कोठें प्राशनें पवनाच्या ॥३॥ निळा म्हणे जन्म जेथें । रुचे तेथेंचि तया॥४॥

६६८ लोहा लागतां सुवर्ण । करावें हा स्वभाव गुण ॥ १ ॥ कैंवि सांडवेल परिसा । जगद्गुरु हा विठ्ठल तैसा ॥ २ ॥ रत्ना अंगीं रत्नकीळ । नव्हती भिन्न अग्निज्वाळ ॥ ३ ॥ निळा म्हणे सांडुनी जळा । सागर न निवडे वेगळा ॥ ४ ॥

६६९ लुगड्या नाव चंद्रकाळा । परि तो काळा रंग वरी ॥ १ ॥ नांवा ऐसें क्रर्तृत्व नाहीं । तरि तें कायी नपुंसक ॥ २ ॥ घोळण्या नांव लक्ष्मण । करितें भर्जन लाह्यांचें ॥ ३ ॥ निळा म्हणे ग्रुसळिती रवी । परि ते न दावी प्रकाश ॥ ४ ॥

६७० वर्माचाचि स्पर्श करी। क्षुद्र धरुनियां अंतरीं ॥ १ ॥ न धरि पातकाचें भय। नेणे पुढें होईल काय ॥ २ ॥ इच्छी सदां अभ्यंतरीं। परधन पराचिया नारी ॥ ३ ॥ निळा ह्मणे त्याची भेटी होतां। सुकृताचा नाश तत्त्वतां ॥ ४ ॥

६७१ पदवी असत्याची वाणी। माजीं निंदेचि पुरवणी ॥ १ ॥ जळो जळो त्याचें तोंड। पचतें पापाचेंचि कुंड ॥ २ ॥ कुश्चळ सर्वदा अंतरीं। इतरांचिया घातावरी ॥ ३ ॥ निळा म्हणे भोगिल पीडा। नर्कवासी होउनी किडा ॥ ४ ॥

६७२ वचनीं ही नव्हे उणें। तुकुनी पाहतां सुजाणें ॥ १ ॥ झिजलें ना कुहिजलें। नित्य नवेंचि चांगलें ॥ २ ॥ नल्गे घालावी निशाणी। वारंवार क्षणक्षणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कोठें तरी। नेतां देश देशांतरीं ॥ ४ ॥

६७३ वाळिले जे पंढरीनाथें। त्याचें कोण कार्य येथें ॥ १ ॥ आला आपणा बाहेरी। नका सांगों त्याची थोरी ॥ २ ॥ आगम पाहिला वेदांत। चित्त विषयीं सतत ॥ ३ ॥ धनें मानें केलें वेडे। सुख नेणती ते बापुडे ॥ ४ ॥ मान इच्छा चाड जीवीं। काय करूं ते गोसावी ॥ ५ ॥ जाती म्हणोनी आना ठाया। निळा दुरी पासुनी तयां ॥ ६ ॥

६७४ वाचे शब्द असत्याचे। हेंचि दुर्जनाचें भांडवल ॥ १ ॥ पुढि-लांतें उपहासिती। आणि मानिती संतोष ॥ २ ॥ निंदा द्वेष अहंकार। मद मत्सर वाढते ॥ ३ ॥ निळा म्हणे नर्का जाणें। आहे पुरश्चरणें त्याचीं हें ॥ ४ ॥

६७५ वाढी कवळ श्रीहरि हातें। आड वैष्णवातें करूनियां ॥ १ ॥ म्हणोनियां अभिमान सांडा। घ्या हो तोंडा भरूनी ॥ २ ॥ हिरोनिया त्रिविध ताप। व्हाल निष्पाप सकळार्थें ॥ ३ ॥ निळा म्हणे देवें आजीं। पावलें तें माजी वैष्णवांच्या ॥ ४ ॥

६७६ विश्वासी ते ऐकतां कानीं। धरिती मनीं आदरें ॥ १ ॥ पूर्वार्जितें उत्तमें होती। आली सत्संगती भेटतो ॥ २ ॥ सुखें सुख वाढतें

झालें । केली या विठ्ठलें कृपा मग ॥ ३ ॥ निळा म्हणे निजात्मसुखा । पावलें एका क्षणमात्रें ॥ ४ ॥

६७७ विठ्ठल नाहीं ज्या ठाउका । परमार्थचि त्याचा लटिका ॥ १ ॥ करितो तें पोटासाठीं । बाष्कळ अवघीच चावटी ॥ २ ॥ दावील तें नाणा सोंग । धरूनि परमार्थाचें अंग ॥ ३ ॥ निळा ह्मणे टिळे माळा । धरिला वृथा तो भोंपळा ॥ ४ ॥

६७८ विद्यामानें गर्वताठा । धरुनि प्रतिष्ठा वाढविती ॥ १ ॥ नेणती जेणें देव हातीं । लागे ते युक्ति हारविली ॥ २ ॥ काम्यनिषिद्धीं आदर थोर । जप ते अघोर मंत्रांचे ॥ ३ ॥ निळा ह्मणे यातना थोरी । नर्की अघोरीं पडावया ॥ ४ ॥

६७९ विश्वास याचा न वाटे जया । विन्मुख तया नरदेहो ॥ १ ॥ जाईल भोगावया योनी । दुःखदायिनी चौऱ्यायशी ॥ २ ॥ पुढती जन्म पुढती मरण । पुढती पतन अधःपात ॥ ३ ॥ निळा ह्मणे पडती फेरा । यातना थोर भोगावया ॥ ४ ॥

६८० शहाणे तेचि परस्त्रीपाशीं । क्षणहि सहवासीं न बैसती ॥ १ ॥ येती जाती तरी ते दुरी । चौवांभीतरीं त्याचिसवें ॥ २ तेथें कैचा विकल्प वाढे । शूर ते गाढे निवडले ॥ ३ ॥ निळा ह्मणे काळासी धाक । इतरांचा लेख काय तेथें ॥ ४ ॥

६८१ शुद्ध सात्विकी ब्राम्हण । सत्वरजमिश्रित क्षत्रिय जाण ॥ १ ॥ रजतमें वैश्य निर्माण । शूद्रा तमोगुण निर्मिता ॥ २ ॥ नाना याति नाना भेद । यांपासुनी शाखा विविध ॥ ३ ॥ निळा म्हणे निषिद्ध तमीं । अनामिकादि पापकर्मी ॥ ४ ॥

६८२ समाधान तें दर्शनें । होय सद्गुरुकृपेनें ॥ १ ॥ गुरुकृपा होण्यासाठीं गुरुभक्ति हे गोमटी ॥ २ ॥ साधन चतुष्टय । गुरुभेटीचा उपाय ॥ ३ ॥ निळा ह्मणे कर्में जाणं । चित्तशुद्धि ते निर्माण ॥ ४ ॥

६८३ सर्पे मुखींच धरिलें विष । मानूनि पीयूष अत्यादरें ॥ १ ॥

आणिका डंखुनी वधवी प्राणा । तैसी त्या दुर्जना चाहाडी गोड ॥ २ ॥ नागवूनि भलियां संतोष मानी । कैसा तो पतनीं न पडेल सांगा ॥ ३ ॥ निळा म्हणे जें जोडिलें सायासें । तेंचि तयाहि ऐसें भोगणें पुढें ॥४ ॥

६८४ सहजाचि घरींहूनियां यावें । विठ्ठला पहावें रुक्मिणी ॥ १ ॥ न लभेचि जो कां ब्रम्हादिकां । तो या लोकां दाखविला ॥ २ ॥ भेटीचि घेतां बरावरी । सन्मानें करी गौरव ॥ ३ ॥ निळा म्हणे भाग्यवंत । करी सनाथ अनाथा ॥ ४ ॥

६८५ संत आज्ञा साद्यवित । जातां सकळांचेंहि हित ॥ १ ॥ नाईकोनी सोडाल । फळ कनिष्ठ तरी पावाल ॥ २ ॥ आम्ही उत्तीर्ण आपुलिया । उचिता ठेलों सांगोनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे यावरी आतां । बोल न ठेवावा मागुता ॥ ४ ॥

६८६ सुख वाटे परी हें दुःख । भोगाविल नर्क परिपाकीं ॥ १ ॥ म्हणोनियां सांडीं आशा । भजें सर्वेशा विठ्ठला ॥ २ ॥ जेणें कधींचि नये तुटी । लाभे कोटी कल्प जिणें ॥ ३ ॥ निळा म्हणे पावसी पदा । जेथें आनंदा निजवस्ती ॥ ४ ॥

६८७ सुखानंदाची राणीव । भागा आली फावली सर्व ॥ १ ॥ घ्याल ते घ्यारे धणीवरी । असाल जे जे या अधिकारी ॥ २ ॥ फुकासाठीं बोळोनी आलें । घरासी दैव हें चांगलें ॥ ३ ॥ निळा म्हणे उबग नका । मानूं अवघेहि ऐका ॥ ४ ॥

६८८ सार्थकाचा ऐसा काळ । केला अमंगळ मूढ जनीं ॥ १ ॥ येऊनियां नरदेहासी । नेणें स्वहितासी आपुलिया ॥ २ ॥ धिक् त्याचें झालें जिणें । विना स्मरणें श्रीहरिचिया ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याची जोडी । अवघी कुळवाडी पापात्मक ॥ ४ ॥

६८९ सांगितली धरिती गोठी । आदर पोटीं भक्तांचा ॥ १ ॥ तया सन्मुख झाला हरी । संसार तमारी तिमिराचा ॥ २ ॥ निरसूनिया भ्रांति-मळ । केले निर्मळ सहवासी ॥ ३ ॥ निळा म्हणे झाला ऋणी । चक्र-पाणी तयांचा ॥ ४ ॥

६९० सांगेन तेंहि धरा अवघे मनीं । नका मानूं कोणी विट याचा ॥ १ ॥ बरें शिकवितां बरें तें मानावें । वाईटा त्यागावें त्यागवितां ॥ २ ॥ पुढें सुख विश्रांती मागें राहे कीर्ति । ऐशिया पद्धति संताचिया ॥ ३ ॥ निळा म्हणे देवें बोलविले बोल । घ्याल ते ते व्हाल तुम्हीं सुखें ॥ ४ ॥

६९१ सांपडली संधी । त्यासी कर्मीं दृढ बुद्धी ॥ १ ॥ वेदविहित कर्म । हेंचि परमार्थाचें वर्म ॥ २ ॥ कर्मालागीं जो तत्पर । तोचि पावे पैलपर ॥ ३ ॥ निळा म्हणे परब्रम्ह प्राप्त होय विहित कर्म ॥ ४ ॥

६९२ सांगती एक करिती एक । जोडिती पातक बुर्दुद्धी । हिताहित न विचारिती । दुर्भरा भरिती महा पापें ॥ २ ॥ यम प्रहार होती पुढें । नेणोनि मूढें वर्तती ॥ ३ ॥ निळा ह्मणे अंगा येईल । तेव्हां जाणवेल भोगितां ॥ ४ ॥

६९३ सांगतां आतां न वाटे खरें । भोगितां बरें जाणवेल ॥ १ ॥ तेव्हां कोणी न ये कामा । हिरोनी श्रमा घ्यावया ॥ २ ॥ यम जाच होता दंड । न चले खंड धन देता ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशी गती । होऊनि पुढती गर्भवास ॥ ४ ॥

६९४ सांगो नवरस लक्षण । तरी शृंगार हास्य करूण । धीर वीर भयानक जाण । बीभत्स अद्भुत शांतरस ॥ १ ॥ शृंगारिक तें माधुर्य गाणें । हास्य तें विनोद करणें । कारूण्य तें कींव भाकणें । धैर्य उपजवणें तें धीर ॥ २ ॥ वीर ते युद्धाच्या गांठीं । शब्दामागें शब्द उठी । भयानक रस भय घाली पोटीं । बीभत्स त्याहुनि कुष्टीं उच्छृंखल ॥ ३ ॥ अद्भुत रसते नवलवाणें । जेका अच्याटाचि बोलणें । श्रोतयातें विस्मय देणें । ऐकता शहाणे निर्बुजति ॥ ४ ॥ शांतरस तो शुद्ध सात्विक । विकार विवर्जित माजि विवेक । निळा म्हणे हे नवरस देख । जाणति गायक चतुरते ॥ ५ ॥

६९५ हात पाय इंद्रियें मिळोनि मेळा । चला म्हणती पाहों डोळा ॥ १ ॥ देखणेंचि नव्हती देखती काये । अवघीयाचा देखणा डोळाचि आहे ॥ २ ॥ आतां डोळिया डोळा पाहों म्हणे । तंव आपआपणिया.

न चले पाहाणें ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशिया परी । जाणों जातां जाणतोचि हरि ॥ ४ ॥

६९६ हातीं घेतला चिताक । दिठी न दिसे घी कनक ॥ १ ॥ तैसा देव पाहों जातां । विश्वाभासुचि भोंवतां ॥ २ ॥ न दिसेचि दोरा । माजीं लपाला अंबरा ॥ ३ ॥ निळा म्हणे गारा । ठेल्या लपवूनियां नीरा ॥ ४

६९७ हिंडवितां देश । नयें तुटी ज्या लाभास ॥ १ ॥ चाले सर्व घेणें देणें । कोठें कांहीं न पडे उणें ॥ २ ॥ पारखितां भलें । कसीं लावितां उतरलें ॥ ३ ॥ निळा म्हणे निवडी नाहीं । एकसारिखेंचि अवघेंही ॥ ४ ॥

६९८ होईल अंगीं बळ । तरी फजीत करावे ते खळ ॥ १ ॥ जे कां करूनियां पाखांड । लटिकेंचि वाढविती बंड ॥ २ ॥ भोंदिती भाविका कथुनी परमार्थ तो लटिका ॥ ३ ॥ निळा म्हणे तोंडें सांगे । तैसें नाचरोनियां अंगें ॥ ४ ॥

---

## नामपर अभंग

६९९ अखंड भूतदया मानसीं । वाचे नाम अहर्निशीं ॥ तया न विसंबे हृषिकेशी । मागें मागें हिंडतसे ॥ १ ॥ जिहीं परकारणीं वेंचिलें । शरीर आयुष्य आपुलें ॥ धन वित्तही वंचिलें । तयां विठ्ठलें सन्मानिजे । ॥ २ ॥ जिहीं गाइलें नित्य नाम । अंतरीं धरूनियां प्रेम ॥ तया वस्तिसी निजधाम । निर्मुनियां ठेविलें ॥ ३ ॥ जिहीं धरिला संतसंग । दुराविलें त्रिविध जग ॥ तया सखा पांडुरंग । निजानुभवें जोडला ॥ ४ ॥ निळा म्हणे सद्गुरु भक्ति । दास्य ब्राम्हणांचे अनुरक्ती । तया लागीं हा श्रीपति । करी सांगाती आपुला ॥ ५ ॥

७०० अवघियांचे मनोरथ । होती कृतार्थ भेटतां ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल म्हणतां वाचे । रूप त्याचें लक्षितां ॥ २ ॥ दर्शनाचा महिमा-

ऐसा । झाले पाशा भवमुक्त ॥ ३ ॥ निळा म्हणे पांडुरंगें । केलें संगें सहवासी ॥ ४ ॥

७०१ आतांहि जे गाती नामें । ते पावती निजात्मधामें ॥ १ ॥ ऐसी नामा अंगीं शक्ती । आहे ठेविली श्रीपति ॥ २ ॥ मुख्य पाहिजे विश्वास । निद्रा सांडुनियां आळस ॥ ३ ॥ निळा म्हणे जे जे गाती । ते ते परमपदा जाती ॥ ४ ॥

७०२ आला स्वानुभवा । बहुतांसीं हा आहे ठावा ॥ १ ॥ उच्चार या हरिनामाचा । तरणोपावचि भवसिंधूचा ॥ २ ॥ सांगितला संतीं । प्रतिती पाहोनियां अंतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे निश्चयाचा । सुगमोपाव हा मोक्षाचा ॥ ४ ॥

७०३ उच्चारितां नाम वाचें । झालें त्याचें स्वरूपचि ॥ १ ॥ नाहीं तया उरलें दुजें । आत्मतेजें जग भासे ॥ २ ॥ ब्रम्हानंदीं निमग्नवृत्ति विराजती स्वानंदें ॥ ३ ॥ निळा म्हणे गुणातीत । अखंडित निज बोधें ॥ ४ ॥

७०४ उपदेशिला एकचि सार । मजही उच्चार नामाचा ॥ १ ॥ म्हणती न पडे साधन फंदीं । होशिल दोंदी काळाचा ॥ २ ॥ करीं संत समागम । गाई हरिनाम कीर्तनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसा संतीं । केला निज प्रीति उपदेश ॥ ४ ॥

७०५ एक गाऊं आम्ही विठोबाचें नाम । सकळहि धाम मंगळाचें ॥ १ ॥ इतर साधनें फळ काम देती । पुनरपि आणिती गर्भवासा ॥ २ ॥ योग याग स्वर्ग काम फळदाते । म्हणोनियां त्यातें दूषिती संत ॥ ३ ॥ निळा म्हणे नाहीं विकार हरिनामा । पाववी निज धामा स्वस्ति क्षेम ॥ ४ ॥

७०६ एकचि नाम विठोबाचें । उच्चारितां वाचें उणें काय ॥ १ ॥ रिद्धी सिद्धी लोटांगणीं । येती धांवोनि चोजवीत ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति जवळुनियां । नवजाती ठाया आन कोठें ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वही सुखें । वसती हरिखें जवळी त्या ॥ ४ ॥

७०७ एका हरिच्या नामेंविण । कळी दुर्गम साधन ॥ १ ॥ म्हणोनियां न येती मना । करोत जैसी ज्या भावना ॥ २ ॥ आम्हां हरिभक्ता दूषण । छंदें बंद अवलक्षण ॥ ३ ॥ निळा नाणूं दृष्टी । ऐसी अभागी करंटी ॥ ४ ॥

७०८ एका हरिच्या नामाचि साठीं । चढला वैकुंठीं गजेंद्र पशु ॥ १ ॥ द्वंद्वाचिया महामारी । ओढितां चळचरीं जळा आंत ॥ २ ॥ तैसाचि प्रल्हाद नामाचि गातां । शस्त्र अग्नी घाता विष न करी ॥ ३ ॥ निळा म्हणे हरिचे भक्त । हरिनामें मुक्त बहुत झाले ॥ ४ ॥

७०९ ऐकोनिगां हरिनाम घोष । पळती दोष दिगंता ॥ १ ॥ जैंवि हनुमंताचिये हांके । कांपती धाकें निशाचरें ॥ २ ॥ अथवा पडतांचि रविकीर्णे । जाय हारपोन अंधःकार ॥ ३ ॥ निळा म्हणे घोकिलें जिहीं । घेतला तिहीं अनुभव हा ॥ ४ ॥

७१० कळासलें मनीं । तेंचि उपदेशा तों कानीं ॥ १ ॥ भवाब्धी हा तारावया । नाम तुमचें पंढरिराया ॥ २ आपणा आणि आणिकां । आड येऊं नेदूं शंका ॥ ४ ॥ निळा म्हणे जीवोंसाठीं । करितों करूनियां आटी ॥ ४ ॥

७११ काम क्रोध पळती दुरी । माया तृष्णा आपापरी ॥ १ ॥ विठ्ठल नामाचिया गजरें । दोष गेले दिगांतरें ॥ २ ॥ अहं ममता देशधडी । आशा चिंता झाली वेडी ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसें झालें । हरिच्या नामें हरिचि केलें ॥ ४ ॥

७१२ काय करिसी तपसाधनें । हरिनाम चिंतनें सर्व सिद्धी ॥ १ ॥ हाके वाल्मीक रामाचि झाला । प्रल्हादें जिंकीला द्वंद्वसमूह ॥ २ ॥ गजेंद्र पशू नामचि जपतां । मुक्ति सायोज्यता भोग भोगी ॥ ३ ॥ निळा म्हणे हरिनाम वाड । मुक्तिचें सांकड नाहीं आम्हां ॥ ४ ॥

७१३ केला प्रतिपक्ष आपुल्या अभिमानें । तोडिलीं बंधनें बहुतांचीं ॥ १ ॥ जिहीं उच्चारिलें अनुतापें नाम । त्यांचें मरणजन्म निवारिलें ॥ २ ॥ कोणीये यातीचा हो कां कोणी एका केलें कौतुक त्याचें तुम्ही ॥ ३ ॥ निळा म्हणे सजना जातीचा कसायी । रंका बंका तींहि उद्धरिलीं ॥ ४ ॥

७१४ केले सुखी फार । कांहीं न करितां विचार ॥१॥ कोण याती कैसें कुळ । नामें आळवितां कृपाळ ॥२॥ केले वरिष्ठ सकळां । प्रेम देउनियां गळां ॥३॥ निळा म्हणे वाढविले । वैकुंठीं ते सरते केले ॥४॥

७१५ जन्म जरा तुटती रोग धरितां । अनुराग हरिनामीं ॥ १ ॥ ऐसा अनुभव सांगती संत । पावले प्रतीत आंगेचि ते ॥ २ ॥ तरोनि आपण आणिका तारिती । जड जीवा दाविती मार्ग सोपा ॥ ३ ॥ निळा म्हणे नाम वरिष्ठ साधना । माजी त्रिभुवना आल्या याची ॥ ४ ॥

७१६ जिव्हाग्रीं ठेवितांचि गोड । पुरे कोड सकळही ॥ १ ॥ तें या विठोबाचें नाम । सर्वदा निष्काम फळदातें ॥ २ ॥ उच्चारचि करितां ओठीं । जाळित कोटी पापांच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे साधन ऐसें । सुलभाचि नसे दुजें आन ॥ ४ ॥

७१७ जिहीं गाईलें हरिचें नाम । आतळों कर्म नेदी त्यां ॥ १ ॥ जन्म जरा हरुनी व्याधी । बैसवी पदीं आपुलीये ॥ २ ॥ ऐसा अगाध माहिमा याचा । वर्णितां वाचा न पुरती ॥ ३ ॥ निळा म्हणे स्तवितां संतीं । अपार मती वेदांचिये ॥ ४ ॥

७१८ जेथूनियां येणेंचि नाहीं । फिरोनियां कांहीं संसारा ॥ १ ॥ तया नांव परमपद । लाभती मुग्ध हरिनामें ॥ २ ॥ पहा नवलाव हा कैसा । वानरां रिसां पदप्राप्ति ॥ ३ ॥ निळा म्हणे श्रीराम सेवे । नामानुभावें मर्कट ते ॥ ४ ॥

७१९ तरले तों असंख्यात । सांगों जातां न लागे अंत ॥ १ ॥ एका हरीच्या नामासाठीं । भरल्या विमानांच्या कोटी ॥ २ ॥ नाना याति स्त्रिया पुरुष । वनचर श्वापदादी राक्षस ॥ ३ ॥ निळा म्हणे कीटक पतंग । पावलें नामें पद अभंग ॥ ४ ॥

७२० तरले नामें अनेक तरती । वैकुंठा जाती घोषगजरें ॥ १ ॥ ऐसा याचा कीर्तिमहिमा । उत्तमा अधमा सारिसाचि ॥ २ ॥ कलियुगीं तो सुगम सार । नामोच्चार हरीचा ॥ ३ ॥ निळा म्हणे अनुतापेंसी । गाती वैकुंठासी ते जाती ॥ ४ ॥

७२१ तेचि धन्य तेचि धन्य । सुकृती जन नरदेहीं ॥ १ ॥ जिहीं करूनी नामपाठ । भरला घोट द्वैताचा ॥ २ ॥ निरसुनियां ममता माया । कीर्तनें काया प्रक्षाळिली ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतर्साक्षी । केला कैं पक्षी जगाचा ॥ ४

७२२ धराल तरी धराल चित्तीं । संशयनिवृत्ती करूनियां ॥ १ ॥ या हो विठोबाच्या नामें । साधनें दुर्गमें लाजविलीं ॥ २ ॥ सहजचि उच्चार करितां वाचें । सायुज्याचे अधिकारी ॥ ३ ॥ अनन्य भावें शरणांगत । होतां पतित उद्धरिले ॥ ४ ॥ न मागोनियां धन संपत्ती । भाव भक्ति भुकेला ॥ ५ ॥ निळा म्हणे अंतर जाणें । अधम न म्हणे उत्तम हा ॥ ६ ॥

७२३ न कळेचि प्रेम याची गोडी । धांवे तातडी नाम घेतां ॥ १ ॥ भरोनियां मग अंतरीं राहे । परताचि नोहे जवळुनी ॥ २ ॥ न विसंबे त्या रानीं वनीं । सांउळी धरूनी चाले सवें ॥ ३ ॥ निळा म्हणे पुरवी भुके । वागवी भातुकें खांद्यावरी ॥ ४ ॥

७२४ नका बोलों शब्द वावगे विवाद । आठवा गोविंद ध्यानीं मनीं ॥ १ ॥ सकळही तुमचें होईल कल्याण । जरि या गाल गाणें विठोबाचें ॥ २ ॥ लटिकाचि बडिवार बोलें जाल वाचा । तरि होईल काळाचा अति क्रोध ॥ ३ ॥ निळा म्हणे पहा विचारुनी दृष्टी । धरा हित पोटीं होईल तें ॥ ४ ॥

७२५ नलगे जाणें वनाप्रती । अथवा एकांतीं बैसणें ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल म्हणा कां वाचें । सकळार्थाचें कारण हें ॥ २ नलगे आसन मुद्रा माळा । सांडणें कळा योगस्थिति ॥ ३ ॥ निळा म्हणे उधळण सार । नलगे निराहार व्रतचर्या ॥ ४ ॥

७२६ नाना साधनें मंत्र तंत्र । उपासना यंत्र अवघड तें ॥ १ ॥ ह्मणोनियां हरिचें नाम । भाविकां सुगम हरिभक्तां ॥ २ ॥ नाहीं आचात प्रायश्चित्त । वाचा शुचिर्भूत सर्वदा ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्ञान व्युत्पात्ती न कळती निगुती योगाचिया ॥ ४ ॥

७२७ नाम सांडूनी मुक्ती घेणें । हीं तों लक्षणें अधमाचीं ॥ १ ॥ आम्हां विष्णुदासां धर्म । नित्य नेम कथेचा ॥ २ ॥ काय करूं त्या व्युत्पत्ति । वडील हांसती पूर्वज ॥ ३ ॥ निळा म्हणे करावी सेवा । आवडी देवा हे माझी ॥ ४ ॥

७२८ नाम तारक हें श्रीहरी । गर्जतां तुमचें भवसागरीं ॥ १ ॥ ऐसें जाणोन वैष्णवजन । करिती नित्यानित्य कीर्तन ॥ २ ॥ नलगे तया खटाटोप । नामस्मरणें निरसे पाप ॥ ३ ॥ निळा म्हणे बरवी युक्ति । झाली भाग्यें भाविकां प्राप्ति ॥ ४ ॥

७२९ नामचि एक विठोबाचें । अवघ्या साधनाचें शिरोरत्न ॥ १ ॥ उच्चार मात्र करितां ओठीं । प्रगटे पोटीं हरिरूप ॥ २ ॥ विश्वासचि पाहिजे आधीं । अंतरशुद्धी कारण हें ॥ ३ ॥ निळा म्हणे नुरवी दोष । हरी निःशेष जन्ममृत्यु ॥ ४ ॥

७३० नामचि एक जिहीं उच्चारिलें । तेहि नेले निजधामा ॥ १ ॥ ऐसा याचा कीर्तिघोष । वर्णिती शेष निगमादिक ॥ २ ॥ जिहीं अवलोकिला दिठीं । धन्य सृष्टीमाजीं ते ॥ ३ ॥ निळा म्हणे यात्रे येती । ते ते पावती इच्छिलें ॥ ४ ॥

७३१ नामासाठीं वोपी शांती । बैसवी पंगती संतांचिये ॥ १ ॥ ऐसा उदार त्रिभुवनीं । नाहीं वांचूनि एका हरि ॥ २ ॥ भुक्ती मुक्ती ज्याचे हातीं । दिव्य संपत्ती भोग सकळ ॥ ३ ॥ निळा म्हणे देतां न म्हणे । थोर लहानें भाविकें ॥ ४ ॥

७३२ नामाचेची घोष । करूनी निर्दाळिले दोष ॥ १ ॥ वाटघेण्या वाल्हा कोळी । अजामेळा पडतां जळीं ॥ २ ॥ गणिका आणि पशु गज । प्रल्हाद दैत्याचा आत्मज ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रसिद्ध ख्याती । नामपाशीं भुक्ति मुक्ति ॥ ४ ॥

७३३ नामापाशीं भुक्ति मुक्ति । ज्ञान विरक्ति हरिनामीं ॥ १ ॥ नामापाशीं दया शांती । साधनां समाप्ती हरिनामीं ॥ २ ॥ नामें प्राप्त नित्यानंद । स्वरूपावबोध हरिनामें ॥ ३ ॥ नामीं तिष्ठती रिद्धि सिद्धी

तुटती उपाधी हरिनामें ॥ ४ ॥ निळा म्हणे हरिनाम सार । उतरी भवपार हरिनाम ॥ ५ ॥

७३४ नामेंचि तुम्हीं आळवितां । न पुरे धणी पंढरीनाथा ॥ १ ॥ याचि सुखें कल्पकोडी । जातां वेळ वाटे घडी ॥ २ ॥ जडतां नामीं निजध्यास । नाहीं काळ गणना त्यास ॥ ३ ॥ निळा म्हण निश्चय माझा । जाणतां तुम्हीं पंढरिराजा ॥ ४ ॥

७३५ नामें तारिले पातकी । मुक्त झाले मृत्युलोकीं ॥ १ ॥ ऐसें बोलियेले वाल्मीक । महाभारतीं व्यासादिक ॥ २ ॥ कलियुगीं हरिकीर्तन करितां तरले अधम जन ॥ ३ ॥ निळा म्हणे असंख्यात । हरिच्या नामें झाले संत ॥ ४ ॥

७३६ नामें दोषी अजामेळ । परम चांडाळ तारियेला ॥ १ ॥ पुराणीं हा महिमा व्यासें । वर्णिला उद्देशें वाल्मीकेंही ॥ २ ॥ जे जे नामीं रतले प्राणी । वाहिले विमानी श्रीहरीनें ॥ ३ ॥ निळा म्हणे पावले पार । नामेंचि अपार भवसिंधूच्या ॥ ४ ॥

७३७ नामेंचि पावन केली क्षिती । घेंपे निजशांती पातका ॥ १ ॥ जये गांवीं जये देशीं । वसती त्यांसी सुखलाभ ॥ २ ॥ सुदर्शन फिरे वरी । विघ्ना बोहरी करावया ॥ ३ ॥ निळा म्हणे कळिकाळ कांपे । नांदती प्रतापें हरिजन ॥ ४ ॥

७३८ नाहीं संदेह करी हा पाठ । पावसी वैकुंठ हरि म्हणतां ॥ १ ॥ जैसे प्रल्हाद उपमन्यु धुरु । करितां नामोच्चारु वरिष्ठ पदीं ॥ २ ॥ नेदी हा आघात लागों वारा । धांवेल सामोरा स्वामी माझा ॥ ३ ॥ निळा म्हणे घेईल वोसंगां । नेईल जेथें जगा गम्य नाहीं ॥ ४ ॥

७४९ निजात्मप्राप्तीलागीं सार । हरीचिया उच्चार नामाचा ॥ १ ॥ हेंचि बीज हेंचि गुज । हेंचि निज निजाचें ॥ २ ॥ ऐसें संतीं पुरस्कारुनी । सांगितलें कानी येऊनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे परम प्राप्ती । नामींचि विश्रांति हरीचिया ॥ ४ ॥

७४० निवरता सर्वां भूतीं । दया शांति आणि करुणा ॥ १ ॥ केली कृपा नारायणें । ऐशीं चिन्हें उमटतां ॥ २ ॥ क्षमा अंगीं निर्म-

स्वर । वाणी उच्चार नामाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे नम्रता अंगीं । मोह· त्यागी ममतेच्या ॥ ४ ॥

७४१ पशु पक्षी श्वापद याती । भृंग पतंग कीटक जाती ॥ १ ॥ हरीतें भजतां हरिरूप झालीं । निजानंदीं निमग्न ठेलीं ॥ २ ॥ दैत्य दानव निशाचर । मावन याती नारीनर ॥३॥ निळा म्हणे भजतां हरी । अगाधपणें पावले थोरी ॥ ४ ॥

७४२ भावें पाचारितां । विठ्ठल नामें आळवितां ॥ १ ॥ येसी धांवत धांवत । माउली तूं कृपावंत ॥ २ ॥ देसी प्रेम पान्हा । मुखीं घालूनियां स्तना ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसी । तया अंकीं खेळविसी ॥ ४ ॥

७४३ यम नियम प्राणायाम । साधे जपतां रामनाम ॥ १ ॥ रामनाम जपतां आधी । नाशनाती आधिव्याधी ॥ २ ॥ रामनामीं जडली वाचा । हरिरूप होय साचा ॥ ३ ॥ निळा म्हणे रामनाम । पावलासे मोक्षधाम ॥ ४ ॥

७४४ यमा हातींचा सुटशी । रामनाम उच्चारिशी ॥ १ ॥ मुखीं नाम उच्चारितां । तुटे भवरोगाची व्यथा ॥ २ ॥ नित्य वदे राम राम । तो प्रत्यक्ष आत्माराम ॥ ३ ॥ निळा म्हणे कृतकृत्य । रामनामें होय अमर्त्य ॥ ४ ॥

७४५ याचि अनुष्ठानें ध्रुव आणि प्रल्हाद । भोगिताती पद वरिष्ठ तें ॥ १ ॥ जेथें नाहीं होणें निमणें संसारा । काळाचा आडदरा अनोळख ॥ २ ॥ शुका नारदासी हाचि नित्य जप । जिव्हेसी अलाप हरिनामाचे ॥ ३ ॥ निळा म्हणे तेहि झाले हरीच्या ऐसें । नाम निजध्यासे महिमा ऐसा ॥ ४ ॥

७४६ येणेंचि साधनें । तुटती संसारबंधनें ॥ १ ॥ म्हणोनियां करा लाहो । स्मरा रुक्मादेवीनाहो ॥ २ ॥ येईल धांवतां । धांवोनियां पाचारितां ॥ ३ ॥ निळा म्हणे हरी । कृपावंत दीनावरी ॥ ४ ॥

७४७ रानीं वनीं घरीं दारीं । वसतां उच्चारी हरिनाम ॥ १ ॥ तेणेंचि माया उतरोनि घांट । पावसी वैकुंठ सहजवृत्ती ॥ २ ॥ नलगे करणें खटाटोप । करीं हाचि जप नामाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे होईल ऋणी । हा चक्रपाणी तुझा मग ॥ ४ ॥

७४८ रामराम उच्चारितां । तुटे संसाराची चिंता ॥ १ ॥ राम हाचि दीनबंधु । तोचि तारी भवसिंधु ॥ २ ॥ दृष्टि रामरूपीं रंगली । आत्माराम होऊनि ठेली ॥ ३ ॥ निळा म्हणे राम हरी । हेचि भवसागरतरी ॥ ४ ॥

७४९ वाचे उच्चारिलें नाम । हृदयीं धरूनियां प्रेम ॥ १ ॥ तेंचि बीज फळा आलें । रूप दृष्टिगोचर झालें ॥ २ ॥ कळासलें ध्यानीं मनीं । दिसे तेंचि जनीं वनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पंढरीनाथ । अंतरबाह्य जेथें तेथें ॥ ४ ॥

७५० विठोबा विठोबा नामोच्चार गोड । सरे येथें चाड सकाळिकांची ॥ १ ॥ गात्या आईकत्या एकचि नव्हाळी । वैकुंठ राउळीं वसावया ॥ २ ॥ न लगती सायास करणें योगाभ्यास । नाचतां उदास कीर्तनमेळीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जन्म चुके थोड्यासाठीं । उच्चारितां ओंठीं ऐशी नामें ॥ ४ ॥

७५१ विठ्ठलनामाचा प्रताप । लेश उरों नेदी पाप ॥ १ ॥ त्रिविध तापांची बोहरी । विठ्ठलनामाच्या उच्चारीं ॥ २ ॥ दैन्य दुःख निर्दाळिलें । विठ्ठल नामें ऐसें केलें ॥ ३ ॥ निळा म्हणे शांतिसुखें । विठ्ठल विठ्ठल म्हणतां मुखें ॥ ४ ॥

७५२ विठ्ठल विठ्ठल वदतां वाणी । चक्रपाणी संतोषे ॥ १ ॥ म्हणोनियां लाहो करा । अहो अवधारा अवघेहि ॥ २ ॥ येणेंचि नामें वैकुंठासी । गेले पापरासी बहु मागें ॥ ३ ॥ निळा म्हणे सांगती संत । उभवुनी हात पुराणांतरीं ॥ ४ ॥

७५३ विठ्ठल विठ्ठल म्हणतां वाचे । स्वरूप त्याचें आठवे ॥ १ ॥ शामसुंदर कटींकर । रूप मनोहर तेजस्वी ॥ २ ॥ दिव्य सुमनें तुळशीमाळा । मळवट पिंवळा रेखियला ॥ ३ ॥ निळा म्हणे मुगुटावरी । खोंविल्या मंजुरी कोंवाळिया ॥ ४ ॥

७५४ विठ्ठल नामें वाहे टाळी । ब्रम्हानंदाच्या कल्लोळीं ॥ १ ॥ निजात्मसुखाचा सोहळा । विठ्ठल अवलोकिती डोळा ॥ २ ॥ सकळही कुळें ओळंबिलीं । विठ्ठलरूपें उभीं ठेलीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जडली बुद्धी । नित्य हरिनामें समाधी ॥ ४ ॥

७५५ व्युत्पत्तीचें ज्ञान । सांचवणी तें जीवन ॥ १ ॥ तैसे पांडुरंग-कृपा । नाना मंत्र करितां जपा ॥ २ ॥ उपवास पारणीं । नाम उच्चा-रितां वाणी ॥ ३ ॥ निळा म्हणे न पवे सेवा । ऐशी सर्वात्मका देवा ॥ ४ ॥

७५६ सकळ मंत्रांमाजीं मंत्र उत्तम । दोनीं अक्षरें जपतां राम । निरसोनियां मायादि भ्रम । पाविजे निजधाम अनायासें ॥ १ ॥ तैसाचि मंत्रराज प्रसिद्ध । त्रि अक्षरीं जपतां गोविंद । नरनारी बाळकें शुद्ध । पावती अच्युतपदातें ॥ २ ॥ चतुराक्षरी मंत्र सरळ । जपतां नारायण श्रीगोपाळ चतुर्भुज होती सकळ । स्वरूपता पावती ॥ ३ ॥ त्रि अक्षरी मंत्रसार । विठ्ठल नामाचा उच्चार । निळा म्हणे करितां नर । न ये समोर कळीकाळत्या ॥ ४ ॥

७५७ सकळ मंत्रां वरिष्ठ सार । विठ्ठल नाम त्रि अक्षर ॥ १ ॥ वाचें उच्चार करितां जप । प्रगटे देहीं विठ्ठलरूप ॥ २ ॥ त्रिविध तापां-त्रोंचि हरण । विठ्ठल नाम उच्चारण ॥ ३ ॥ निळा म्हणे सुगम सिद्धि । विठ्ठल नामाची समाधी ॥ ४ ॥

७५८ सकळ साधनां वरिष्ठ सार । विठ्ठल नामाचा उच्चार । आणखी नका वोरबार । शीणाचि उरेल पुढती ॥ १ ॥ धांवा म्हणोनि अवघे वेगीं । चित्तचि ठेवा पांडुरंगीं । संसाराचि तुटेल मागी । फिटेल धगी त्रिविध तापा ॥ २ ॥ आवडी नाचतां पैं गातां । पांडुरंग प्रेमदाता । अवघी तोडूनियां चिंता । करील माथां बैसणें ॥ ३ ॥ ऐसें जाणोनियां निरुती । करा हरिनामें आवृत्ति । मग हा कळिकाळाचे हातीं । नेदिल तुम्हां सर्वथा ॥ ४ ॥ निळा म्हणे सुगम ऐसें । संतीं दाविलें सौरसें । जतन करिती जे मानसें । ते तों पावती सर्वथा ॥ ५ ॥

७६९ समान निट दोहि आंगे पोरा खेळे मुरदागे । नाहींतरी जासि वायां चुकवितां आंगें ॥ १ ॥ खेळ सख्या खेळा । लक्षुनि हरि डोळा ॥ २ ॥ सांडूनि मर्यादा जरि घालिसी पाउलें । तरी होसि फजित पोरा।

मारितील मुलें ॥ ३ ॥ निळा म्हणे चिप चरणें धरूनियां निघ । न पडसी कोडियांत ध्यातां हा श्रीरंग ॥ ४ ॥

७६० सहजाचि नाम आलें वाचे । करीत दोषांचें निर्मूळ ॥ १ ॥ ऐशी व्यास गर्जे वाणी । महिमा पुराणीं विख्यात ॥ २ ॥ पापी चांडाळ दुरात्मे ते । नामेंचि सरते वैकुंठीं ॥ ३ ॥ निळा म्हणे गणिका वाल्हा । अजामेळ उद्धरिला गजेंद्र ॥ ४ ॥

७६१ सांगितलें वर्म एवढेंचि करीं । नित्यता उच्चारीं हरिचें नाम ॥ १ ॥ नलगे कोठें जाणें येणें । कर्मबंधनें तुटतील ॥ २ ॥ योगसाधन पवनाभ्यास । न करीं सायास अडचणी ॥ ३ ॥ निळा म्हणे हरीच्या नामें । चुकती जन्में यमप्रहार ॥ ४ ॥

७६२ सांगितलें संतजनीं । उगवुनी कानीं बीजाक्षरें ॥ १ ॥ विठ्ठल जपतां विठ्ठल होसी । न धरीं मानसीं संशय ॥ २ ॥ करीं कीर्तन वाजवीं टाळी । राहेल वनमाळी हृदयांत ॥ ३ ॥ निळा म्हणे पडे आटी । साधन संकष्टीं आणिकां ॥ ४ ॥

७६३ सांगेन खूण परि हें नकळे । नुघडतां डोळे बुद्धीचे ॥ १ ॥ याचि लागीं चित्तशुद्धी । करा हो उपाधी निरसूनी ॥ २ ॥ दावितांही न दिसे वर्म । ठाके त्या कर्म आड उभें ॥ ३ ॥ निळा म्हणे दोषा धुणी । गर्जवा वाणी हरिनामें ॥ ४ ॥

७६४ सुखें करावें भोजन । गर्जावे गुण श्रीहरीचे ॥ १ ॥ ल्यावें लेणें अळंकार । असावें सादर हरिकथे ॥ २ ॥ यथाविधी भोगितां भोग । हृदयीं पांडुरंग आठवावा ॥ ३ ॥ निळा म्हणे न लिंपे कर्मी । हरिनाम धर्मी अवलंबितां ॥ ४ ॥

√७६५ सोडविलीं ऐसीं बहुतें आयकें । भूतळीं पातकें तरलीं नामें ॥ १ ॥ बोलियेले संत पुराणीं व्याख्यानें । तारिले चिंतनें महापापी ॥ २ ॥ अजामेळ गणिका पैंड्रिक जराव्याध । नाहीं अपराध विचारिले ॥ ३ ॥ निळा म्हणे तोचि धरिला विश्वास । घालूनियां कास नाम गातों ॥ ४ ॥

७६६ संचित प्रालब्ध क्रियामाण । न सुटे प्राणिया भोगिल्याविण । यालागीं करावें हरीचें स्मरण । तुटेल बंधन मग त्याचें ॥ १ ॥ सत्कर्म करितां विधियुक्त । माजीं निषेधाचा पडे आघात । सांग अथवा व्यंग होत । होय तें संचित निश्चयेंसी ॥ २ ॥ उत्तम अधम कर्मे घडतां । जाणतां नेणतां पदरीं पडतीं । तींचि संचितें होउनी ठाती । पुढें भोग द्यावया ॥ ३ ॥ पापपुण्यात्मक कर्मे घडलीं । भोगितां उर्वरीत जें राहिलीं । फळ द्यावया उभीं ठाकलीं । प्रालब्धें लाभालाभदायकें ॥ ४ ॥ क्रियमाणें जें आतां आचरे । सत्कर्मे अथवा अकर्माकारें । जें जें निरजे नित्य व्यवहारें । क्रियमाण ऐसें बोलिजे तें ॥ ५ ॥ आतां तिहींचेंही निस्तरण । घडे जेणें ते ऐक खूण । संचितें घडे जन्ममरण । उत्तम अधम योनिद्वारें ॥६॥ जे जे योनी धरी जो जन्म । तेथींचें विहित तोचि त्या स्वधर्म । सांग नव्हतां भोगणें कर्म । नव्हेचि सुटिका कल्पांतीं ॥ ७ ॥ आतां भलतेही योनीं जन्म होतां अनुतापें । भजे जो भगवंता । नामें त्याचीं गातां वानितां । दहन संचिता भक्तियोगें ॥ ८ ॥ यावरी प्रालब्धें भोग येती अंगा । भोगितां स्मरे जो पांडुरंगा । निस्तरे प्रालब्धा तो वेगा । पावे अंतरंगा श्रीहरीतें ॥ ९ ॥ जें जें नित्यांनीं आचरत । तें ब्रम्हार्पण जो करित । अहंकृति न धरी फळ कामरहित । क्रियमाण जाळीत निष्कामता ॥ १० ॥ याचिलागीं निळा म्हणे । कर्मपाश तुटती येणें । विठोबाच्या नामस्मरणें । यातायाती चुकती ॥ ११ ॥

७६७ स्वप्नीं देखिलें तें जागृतियें नाहीं । हारपोनियां ठायीं ठावोचि नुरे ॥ १ ॥ तेचि परी झाली माझिया मानसा । संसार तमाशा क्षणेंचि विरे ॥ २ ॥ कैंची हे संपत्ति धन वित्त पशु । लटिकाचि आभासु मायीक तो ॥ ३ ॥ निळा म्हणे एक सत्य हरीचें नाम थोर । अवघाचि श्रम मिथ्याभूत ॥ ४ ॥

७६८ हरीचें नामचि एक पुरे । सकळां साधनांचिये धुरें ॥ १ ॥ पावावया वैकुंठासी । लहान थोरां विश्वासीयांसी ॥ २ ॥ न लगे जाणें

वनांतरा । सोडोनियां घरदारा ॥ ३ ॥ निळा म्हणे मुक्तिपदा । जावयां-हे संपदा ॥ ४ ॥

७६९ हरिरूप ध्यानीं हरिनाम वदनीं । हरीच्या चिंतनीं तद्रूपता ॥१॥ हरि तयां अंतरीं हरी तयां बाहेरी । रक्षी निरंतर श्रीहरी त्यां ॥ २ ॥ हरी तयां आसनीं हरि तयां भोजनीं । हरि तयां शयनीं निद्रा करी ॥३॥ निळा म्हणे हरि देह गेह दारा । हरी दुजा वारा लागों नेदी ॥ ४ ॥

७७० हाचि उपाव सुगम सार । तरणें संसार जया नरा ॥ १ ॥ नाम गातां गोविंदाचें । फिटे जीवाचें जीवपण ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति वोळंगे येती । अंगींची ठाकती दया क्षमा ॥ ३ ॥ निळा म्हणे अवघींच सुखें । येती हरिखें चोजवित ॥ ४ ॥

७७१ हेंचि आम्हासी गुरुगम्य । हरीचें नाम उपदेशिलें ॥ १ ॥ आणिका साधनीं चाडचि नाहीं । घालिती अपायीं म्हणोनियां ॥ २ ॥ योगाभ्यास मंत्रजप । पुरश्चरण तप हरिनाम ॥ ३ ॥ निळा म्हणे दाविला मार्ग हाचि हा चांग गुरुनाथें ॥ ४ ॥

७७२ हेंचि परमार्थाचें सार । हरीचिया उच्चार नामाचा ॥१॥ जिहीं केला पावले ते । वैकुंठीं सरते सुखी झाले ॥ २ ॥ गातां वानितां हरि गुणरासी । झाले त्रैलोक्यासी पूज्य ते ॥ ३ ॥ निळा म्हणे निका उपावो । सांपडला ठावो वैष्णवां ॥ ४ ॥

७७३ होय अंतरीं पालट । करितां पाठ हरिनामें ॥ १ ॥ देवा ऐसे देवाचि होती । जे या भजती विठ्ठला ॥ २ ॥ ऐसा याचा प्रताप ठसा । प्रगटे सरिसा नामजपें ॥ ३ ॥ निळा म्हणे लटिकें नव्हे । पहा स्वानुभवें आपुलिया ॥ ४ ॥

---

# कीर्तनपर अभंग.

—:०::०:—

७७४ आतां अवघे हरिचे जन । करा हो चिंतन नामाचें ॥ १ ॥ देव नुपेक्षील सर्वथा । करा कथा कीर्तनें ॥ २ ॥ टाळ मृदंग लावा भेरी । नाचा गजरीं हरिनामें ॥ ३ ॥ निळा म्हणे वैकुंठवासी । येती भेटीसी तुमचीये ॥ ४ ॥

७७५ आवडोनी रूप मनीं । धरिलें वदनीं हरिनाम ॥ १ ॥ त्याचें सांग झालें सफळ । आलियाचें फळ नरदेहा ॥ २ ॥ रुचला संतसमागम । आपुलिया धर्म कुळाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे भगवत्कथा । गातां ऐकतां निज मोक्ष ॥ ४ ॥

७७६ ऐकतां श्रवणीं परमानंद । उपमर्दे कंद मायेचा ॥ १ ॥ घोषगजरें गर्जे वाचा । जो श्रुतिशास्त्राचा गुह्यार्थ ॥ २ ॥ परम रसाळ मधुराक्षरें । चालती सुस्वरें हरिभजनें ॥ ३ ॥ निळा म्हणे सुमंगळ । ऐश्वर्य कल्लोळ प्रेमाचे ॥ ४ ॥

७७७ कथाश्रवणें उपजे विरक्ति । कथाश्रवणें वाढे शांति । कथाश्रवणें परमानंदप्राप्ति । पापी उद्धरती कथाश्रवणें ॥ १ ॥ कथाश्रवणें उपाधी तुटे । कथाश्रवणें भवाब्धि आटे । कथाश्रवणें सच्चिदानंद भेटे । समूळ तुटे मायाजाळ ॥ २ ॥ कथाश्रवणें स्वरूपस्थिती । कथाश्रवणें विषय समाप्ती । कथाश्रवणें निजात्मप्राप्ती । होय उपरती कथाश्रवणें ॥ ३ ॥ कथाश्रवणें मीपण नुरे । कथाश्रवणें अभिमान विरे । कथाश्रवणें कल्पनाहि चुरे । ब्रम्ह साक्षात्कारें भेटिसी ये ॥ ४ ॥ निळा म्हणे प्रथम पायरी । हरिकथा श्रवण मनन वरी । निजध्यासें आत्मया हरी । भेटीजे निर्धारी साक्षात्कारें ॥ ५ ॥

७७८ कथा श्रवणें स्वरूप सिद्धी । लागे समाधी सात्विका ॥ १ ॥ ऐसा लाभ जोडे जोडी । बैसतां आवडी हरिकथे ॥ २ ॥ कथाश्रवणें परिहार दोषां । होताती पाशमुक्त पापी ॥ ३ ॥ निळा म्हणे हरिकथा श्रवण । करी बोळवण जन्ममृत्यां ॥ ४ ॥

७७९ कथाश्रवणें विरक्ति जोडे । निजशांती वाढे उल्हासें ॥ १ ॥ कथाश्रवणें परमानंद । प्रगटे स्वानंद निज हृदयीं ॥ २ ॥ कथाश्रवणें

उपाधी तुटे । भवाब्धी आटे निःशेष ॥ ३ ॥ निळा म्हणे कथाश्रवणें । हरती मरणें जन्म जरा ॥ ४ ॥

७८० कर्में वांटिलीं चहूं वर्णा । क्षत्रिय वैश्य आदी ब्राह्मणा । वेदपुरुषा नारायणा । गुणविवंचना तुज हातीं ॥ १ ॥ यज्ञ षट्कर्में ब्राम्हणांसी । क्षात्रदान क्षत्रियांसी । कृषीगोरक्षवणिज्य वैश्यासी । सेवा शूद्रासी याचित ॥ २ ॥ नामें स्तोत्रें स्त्रियांदिकांसी । सेवा वांटिली आधिकारेंसी । संत सनकादिक योगियांसी । स्वानुभव सिद्धांत दिधले ॥ ३ ॥ कथा कीर्तन सकळ लोकां । आधिलांपासुनी अनामिकां । तरणोपाय विश्वव्यापका केला नेटका विधिमार्गे ॥ ४ ॥ निळा म्हणे ऐसिया परि । कृपा करूनियां श्रीहरी । जीव तारिले भवसागरीं । भक्तकैवारी म्हणोनियां ॥ ५ ॥

७८१ कीर्तन केलें ब्रम्हानंदें । ध्रुव प्रल्हादें एकनिष्ठ ॥ १ ॥ तयां केलें सुखसंपन्न । त्रैलोक्यीं मान वाढउनी ॥ २ ॥ तैसेचि शुक नारदमुनीं पावले कीर्तनीं समाधिसुख ॥ ३ ॥ निळा म्हणे बहुतां संता । कीर्तन अद्वैता मेळविलें ॥ ४ ॥

७८२ कीर्तनरंगें रंगलें जें जें । तें तें सहजें हरिप्रीय ॥ १ ॥ येर मुमुक्षु जे जे होती । कीर्तनें पावती ते लाभा ॥ २ ॥ महा अनुष्ठान हरिची कथा । नित्य जोडतां सुखप्राप्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे कैवल्यपद । पावती अभेद हरिकीर्ति ॥ ४ ॥

७८३ कीर्तनाची आवडी मोठी । धांवे पाठी वैष्णवा ॥ १ ॥ जेथें होती नामघोष । नाचे उदास ते ठायां ॥ २ ॥ ऐकोनियां आपुली कीर्ति । सुखें जगपती सुखावे ॥ ३ ॥ निळा म्हणे टाळिया छंदें । डुले आनंदें सुप्रेमें ॥ ४ ॥

७८४ कीर्तनाचा घोष गजर । ऐकतां अपार उद्धरले ॥ १ ॥ ऐसे किती सांगावे ते । कीर्तनें सरते वैकुंठीं ॥ २ ॥ आदिकरूनी स्त्रिया बाळें । कीर्तनकल्लोळें हरिपदीं ॥ ३ ॥ निळा म्हणे श्रोते वक्ते । एकात्मतेतें पावले ॥ ४ ॥

७८५ कीर्तनें धुवट केलें लोकां । दोष कळंकापासुनी ॥ १ ॥ टाळिया हरिनामाच्या घोषे । पळती आसें कळिमल ॥ २ ॥ स्वानुभवें वेधल्या

वृत्तीं । श्रोतेहि होती चतुर्भुज ॥ ३ ॥ निळा म्हणे कीर्तन सुखें । हरिलीं दुःखें बहुतांचीं ॥ ४ ॥

७८६ केला जिहीं नामपाठ । तयां वैकुंठ मोकळें ॥ १ ॥ न साधे जें योगयागें । कथाप्रसंगें सुलभ तें ॥ २ ॥ कीर्तनाचे घोष जेथें । होती तेथें हरि उभा ॥ ३ ॥ निळा म्हणे सुलभ ऐसें । आन साधनाचि नसे कलियुगीं ॥ ४ ॥

७८७ कोणाचीहि न धरुनी आशा । भजावें जगदीशा कीर्तनें ॥ १ ॥ मग तो कृपेचा सागर । उतरील पार भवासिंधु ॥ २ ॥ तोडूनियां ममता जाळ । करील कृपाळ वरी कृपा ॥ ३ निळा म्हणे आवडी त्यासी । कीर्तनापाशीं तिष्ठतु ॥ ४ ॥

७८८ घेऊनियां कृत्रिम सोंगें । नानापरिच्या नटची रंगें ॥ १ ॥ शुद्धभावें हरि कीर्तन । करितां जनार्दन संतोषे ॥ २ ॥ चातुर्यवाणी रंजवण थित्या खंडण प्रेमानें ॥ ३ ॥ निळा म्हणे घडती दोष । निंदा उपहास इतरांचें ॥ ४ ॥

७८९ चऱ्हाटिया दंतकथा । माजी अनर्था कारण ते ॥ १ ॥ शुद्धभावें हरि कीर्तन । करितां जनार्दन संतोषे ॥ २ ॥ चातुर्यवाणी रंजवण । थित्या खंडण प्रेमाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे घडती दोष । निंदा उपहास इतरांचे ॥ ४ ॥

७९० चातुर्य मिरवी । कळा व्युत्पत्ति दाखवी ॥ १ ॥ परी तें अवघें वायां गेलें । एका न भजतां विठ्ठलें ॥ २ ॥ गायानाची कळा । आसनें मुद्रेचा सोहळा ॥ ३ ॥ निळा म्हणे जें जें करी । सोंगीच तें तें अवघें वरी ॥ ४ ॥

७९१ जेणें कीर्तनीं धरिली निष्ठा । झाला वरिष्ठां वरिष्ठ तो ॥ १ ॥ पहा प्रल्हाद दैत्यवंशीं । झाला देवासीं परम पूज्य ॥ २ ॥ नामा शिंपी विष्णुदास । यवन कबिरास बहुमान ॥ ३ ॥ निळा म्हणे कीर्तनरंगीं । रंगले जगीं धन्य झाले ॥ ४ ॥

७९२ जो जो काळ कीर्तनीं जाय । तो तो होय सार्थक ॥ १ ॥ घटिका पळही न वचे वांया । चुकवी अपायापासुनी ॥ २ ॥ न लगे जन्मांतरा येणें । पुढती मरणें मागुती ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसा निका । उपाय नेटका सकळांसी ॥ ४ ॥

७९३ देखोनियां संतमेळा । कीर्तन सोहळा धांव घाली ॥ १ ॥ ऐकावया आपुलीं नामें । गुणसंभ्रमें नित्य नवे ॥ २ ॥ बैसोनियां प्रेम वांटी । नाचे परवडी मग सवें ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुल्या सुखें । वांटी हारिखें भुक्ति मुक्ति ॥ ४ ॥

७९४ धन्यरूप झाला काळ । करितां कथा गदारोळ ॥ १ ॥ आजि पोखल्या आयणी । प्रेमसुखाचिया जेवणीं ॥ २ ॥ होउनी ठेला दिव्यरूप । पुण्य निरसोनियां पाप ॥ ३ ॥ निळा म्हणे निमग्नता । झाली मन बुद्धि चित्ता ॥ ४ ॥

७९५ नारद वैष्णवांचा शिरोमणी । नाचे कीर्तनीं सर्वदां ॥ १ ॥ देवोचि त्याची पूजा करी । आणि नमस्कारी भेटतां ॥ २ ॥ दैत्या घरीं बहु मान त्याचा । ऐसा कीर्तनाचा बडिवार ॥ ३ ॥ निळा म्हणे तिहीं लोकांत । कीर्तनें विख्यात हरिभक्त ॥ ४ ॥

७९६ नित्यानंद घोषें करितां हरीचें किर्तन । श्रोते आणि वक्ते होती परम पावन ॥ १ ॥ आणिकहि लोक तरती त्यांच्या सहवासें । भाळ्या भोळ्या भाविकांसी लाभ अनायासें ॥ २ ॥ जेथें नित्य नामघोष टाळिया गजर । तेथें रंगीं नृत्य करी रुक्मिणीवर ॥ ३ ॥ निळा म्हणे तोचि प्रसन्न होउनी दासासी । भुक्ति आणि मुक्ति ठेवी त्यांच्या सहवासीं ॥ ४ ॥

७९७ पाहोनियां हरिकीर्तन । होती प्रसन्न देव तुम्हां ॥ १ ॥ सनकादिका येती भेटी । कथा गोमटी ऐकावया ॥ २ ॥ संत महंत येउनी पुढें । बैसती गाढे कीर्तनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पांडुरंग । रंगीं रंग मेळवील ॥ ४ ॥

७९८ भवरोगें जे पिडले लोक । तिहीं आवश्यक सेवावें ॥ १ ॥ महा मात्रा हरिकीर्तन । उरलें रसायन निज निगुतीं ॥ २ ॥ मागें बहुतां गुणासी आलें । आरोग्याचि ठेविलें करूनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे सांगतां फार । होईल विस्तार नामें त्यांचीं ॥ ४ ॥

७९९ लोंढा आला सात्विकाचा । पूर अद्भुत या प्रेमाचा ॥ १ ॥ तेणें लागती वोसाणें । स्वानंदचि नामस्मरणें ॥ २ ॥ मनोमीन तळपताती । गोड अर्थातें कवळिती ॥ ३ ॥ निळा म्हणे उभय तीरें । श्रोते वक्ते निर्मळ निरें ॥ ४

८०० वैराग्याचा मेरु तो गोराकुंभार । तोडियले कर आणेसाठीं ॥ १ ॥ महाद्वारीं कथा श्रवण करितां । टाळी वाजवितां निघती नवे ॥ २ ॥ तुम्हीं देवा कृपादृष्टीं अवलोकिला । हृदयीं तो धरिला प्रीतिकरीं ॥ ३ ॥ निळा म्हणे तुम्हां दासाचा अभिमान । अवतार म्हणवून धरणें लागे ॥ ४ ॥

८०१ शिंपी सोनार चांभार । ब्राम्हणादि नारी नर ॥ १ ॥ हरीच्या कीर्तनें हरीचे भक्त । होऊनि ठेले जीवन्मुक्त ॥ २ ॥ सुतार कुंभार यवन । अंत्यजादि हीन जन ॥ ३ ॥ निळा म्हणे क्षेत्री शूद्र । वैश्यहि पावले मुक्तिपद ॥ ४ ॥

८०२ श्रवण कथेचें सादर । करिती नर सभाग्य ते ॥ १ ॥ सुख पावोनियां विश्रांती । मोक्षपदा जाती सुखरूप ॥ २ ॥ अगाध महिमा भगवद्गुणीं । संत पुराणीं गर्जती ॥ ३ ॥ निळा म्हणे हरीचें नाम । सकळा भस्म करी पापा ॥ ४ ॥

८०३ श्रीहरीच्या संकिर्तनें । तुटलीं बंधनें बहुतांचीं ॥ १ ॥ होऊनियां उपरती । राजा परिक्षिती उद्धरला ॥ २ ॥ किर्तनें नारद मुक्त शुक । आणि सनकादिक प्रल्हाद ॥ ३ ॥ निळा म्हणे हरीची कथा । एकात्मता देव भक्तां ॥ ४ ॥

८०४ सांगों जातां न कळे वाचा । महिमा कथेचा अपार ॥ १ ॥ श्रवणें पठणें हरिची किर्ति । नाना याति उद्धरल्या ॥ २ ॥ चतुष्पदें श्वानसूकरें श्रवणद्वारें मुक्ति त्यां ॥ ३ ॥ निळा म्हणे कीटक पक्षा । किर्तनें वृक्षा हरिप्राप्ता ॥ ४ ॥

८०५ सांडुनी गुणदोषाची सांत । करावा संगात संताचा ॥ १ ॥ साधकां हे सुगम वाट । वरित वैकुंठ पावावया ॥ २ ॥ नित्य करितां ह-रीची कथा । दोषा दुरिता संहार ॥ ३ ॥ निळा म्हणे धरिल्या चित्तीं । भाविका लाभती स्वानुभाव ॥ ४ ॥

८०६ सुखें भिक्षा मागोन खावें । हरीचें करावें किर्तन ॥ १ ॥ क-लियुगीं साधन सार । भवसिंधू पार पाववितें ॥ २ ॥ नेघोनियां गुणदोष। करावे घोष हरीनामाचे ॥ ३ ॥ निळा म्हणे सुगम सिद्धी । तुटती उपा-धी सकळही ॥ ४ ॥

८०७ सोहळा तो देखोनियां । लागती पाया मोक्ष मुक्ति ॥ १ ॥ जये रंगी नाचे हरी । कीर्तन गजरी सत्संगें ॥ २ ॥ तेथें कोण पाड येरा । साधन संभारा तर्कवादा ॥ ३ ॥ निळा म्हणे योगयाग । ठाकती मुग आरोगुनी ॥ ४ ॥

८०८ हरीची कथा अमृतरस । गोड ग्रास नामावळी ॥ १ ॥ तेणें करूं सर्वदां तृप्ती । क्षुधे निवृत्ती तृषेची ॥ २ ॥ अजर अमर होते काया । अविद्या माया निरसोनी ॥ ३ ॥ निळा म्हणे किर्तनीं सिद्धी । लाभे समाधी हरिभक्तां ॥ ४ ॥

८०९ हरीचें मनोहर कीर्तन । हेंचि साधन कलियुगीं ॥ १ ॥ नको आणिकां मतांतरी । पडो भवसागरीं वहावसी ॥ २ ॥ निश्चयाचें उत्तर हेचि । करावी हरीची हरीभक्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसे कानीं । सां-गितलें येऊनी गुरुदेवें ॥ ४ ॥

---

## देवासि प्रेमाचें भांडण

८१० अहो तुम्ही कृपावंता । किती आतां विनवावें ॥ १ ॥ न द्या-चि कांहीं प्रत्युत्तर । ऐसे निष्ठुर कैंवि तरी ॥ २ ॥ नेणों दासाचा त्रास आला । दिसे मांडिला अव्हेर ॥ ३ ॥ काग करुणाचि हारविली । विप-रीत झाली दशा दिसे ॥ ४ ॥ निळा म्हणे म्हातारपण । आलें दारुण नुठवेसें ॥ ५ ॥

८११ आणिक तों युक्ति नाहीं माझ्या हातीं । आहें मूढमति म्हणुनियां ॥ १ ॥ वारंवार तुम्हां करितों सूचना । नामें दयाघना उत्राहूनी ॥ २ ॥ पतितपावन ऐसी ब्रिदावळी । रुळते पायांतळीं प्रतिज्ञेची ॥ ३ ॥ निळा म्हणे तिचा प्रताप दाखवा । माझा हा निरसावा अहंभाव ॥ ४ ॥

८१२ आम्ही तों जिवें वेंच केला । तुमच्या बोलावरी देवा ॥ १ ॥ तंव तें तुम्हासी नव्हेचि ठावें । किती वेळ दावावें बोलोनि ॥ २ ॥ जैसी असो तैसीचि तरी । कायसी थोरी मग तुमची ॥ ३ ॥ निळा म्हणे वायांचि शीण । केला यावरून दिसतसें ॥ ४ ॥

८१३ ऐकिला तुमचा अगाध महिमा । दोषियां अधमां तारितासां ॥ १ ॥ ह्मणोनियां जि आलों शरण । सत्य मानूं संतवचनीं ॥ २ ॥ यावरी कराल अव्हेर तरी । लागेल श्रीहरि बोल तुम्हां ॥ ३ ॥ निळा म्हणे आमुचें जिणें । आहे हें वांया ये ठायींचेंचि ॥ ४ ॥

८१४ ऐकोनि संत हांसताल । तुह्मांसी येईल मग लाज ॥ १ । कौल दिला राहे सुखें । न ह्मणों मुखें दे ऐसें ॥ २ ॥ मागोंव तें आम्हांचि जवळी । आहे नामावळीं पढों सुखें ॥ ३ ॥ आणिखी तुमची नाहीं अशा । ठेवा फैशा मुक्तिहि त्या ॥ ४ ॥ निळा म्हणे आपुल्याजि सुखें । असों हरिखें अखंडित ॥ ५ ॥

८१५ अंतरींचें जाणा वर्म कर्माकर्म फळ दातें ॥ १ ॥ तरिकां माझा अव्हेर केला । काय तो देखिला स्वभाव दुष्ट ॥ २ ॥ नेणें करूं तुमची सेवा । परि मी देवा नाप जों ॥ ३ ॥ निळा म्हणे यावरी आतां । येईल चित्तां तैसें करा ॥ ४ ॥

८१६ करा माझा अंगीकार । पतीतपावन थोरब्रीदा ॥ १ ॥ उपेक्षितां हांसती लोक । म्हणती सेवक जड झाले ॥ २ ॥ मग ते तुम्हा होईल लाज । अंतरेल काज पुढील ही ॥ ३ ॥ निळा म्हणे अपकीर्ती अंगा । न ये पांडुरंगा करावें तें ॥ ४ ॥

८१७ कां जी कृपावंता झालेति निष्ठुर । नाईका उत्तर करुणेचें ॥ १ ॥ काय आजामेळा होती पुण्यरासी । नेला वैकुंठासी नामोच्चारें ॥ २ ॥ गणिका ते वेश्या काय आचरली । राम म्हणता नेली निजधामा ॥ ३ ॥ जराव्याधें पायीं विंधीयला बाण । तो तुम्ही आपण तारियेला ॥ ४ ॥

निषाद तो कोळी श्रीरामा सन्मुख । येतां दिलें सुख निववीला ॥ ५ ॥ पूतना ते पाजी विष स्तनपानीं । ते सायोज्यसदनीं बैसविली ॥ ६ ॥ गजेंद्र तो काय तप आचरला । धांवा म्हणतां नेला सोडवूनी ॥ ७ ॥ वैरियाचा बंधू केला लंकापती । चिरंजीव पद्धती बैसउनी ॥ ८ ॥ निळा म्हणे माझा नाहीं पुरविला । हेतचि राहिला दर्शनाचा ॥ ९ ॥

८१८ किती तरी चिंता करूं । धीर धरूं कोठवरी ॥ १ ॥ आलें दिवस बुडोनी जातो । अतिशयचि रहातो केला तो ॥ २ ॥ निश्चया माझा अव्हेर केला । यावरी विठ्ठला कळों आलें ॥ ३ ॥ निळा म्हणे आधार नेंदा । कांहींचि गोविंदा चित्तासी ॥ ४ ॥

८१९ गेलेती आपुल्या ब्रिदातें विसरोनी । ऐसें धारिलें मनी निष्ठुरपण ॥ १ ॥ येरवीं ऐकोनि धांवतसां धांवा । तें आजि केशवा काय झालें ॥ २ ॥ आटाहास्य तुम्हां मारितां आरोळी । नाईकाची टाळी बैसउनी ॥ ३ ॥ निळा म्हणे माझें कर्म आलें आड । न चलेचि कैवाड तुमचा देवा ॥ ४ ॥

८२० गेलें वेंचोनियां वय याचिपरी । चिंता महापुरी वाहवलो ॥ १ ॥ धरियेला होता तो विश्वास मानसीं । येणें काळे त्यासी क्षय आला ॥ २ ॥ आतां कोठवरीं धरावा तो धीर । न दिसे पायीं थार तुमाचिये ॥ ३ ॥ मागे कित्येकासी तुम्ही उठाउठीं । येऊनि धरिलें पोटीं निववीलें ॥ ४ ॥ माझे वेळे कांहो पडिला ऐसा फेर । कर्म बळोत्तर ओढवलें ॥ ५ ॥ निळा म्हणे करूं किती तरी शोक । वचनाचाहि एक आश्रय नसे ॥ ६ ॥

८२१ गोमटा म्हणती मानव देहो । केला उपाव फळ देतो ॥ १ ॥ तरी कां माझा विफळ गेला । धांवा तुमचा तो ॥ २ ॥ कांहींच न करा आश्वासन । उद्विग्न मन यासाठीं ॥ ३ ॥ निळा म्हणे यावरी काय । किजे उपाय तो नेणें ॥ ४ ॥

८२२ जया जो वांटा भागा आला । पाहिजे केला जतन तोचि ॥ १ ॥ आम्ही कराव्या पापराशी । निरसन तयासी तुम्ही कीजे ॥ २ ॥ लोह न संडितां लोहपणा । परिसें तत्क्षणा पालटावें ॥ ३ ॥ निळा म्हणे अंधार निशी । रवी त्या प्रकाशी निज तेजें ॥ ४ ॥

८२३ तुम्ही जाणा अंतरींचें । लटिकें साचें श्रीहरी ॥१॥ आतां माझी कांहीं नका । मनीं शंका वागवूं ॥ २ ॥ नाहीं पदरा घालित पिळा । घाली गोपाळा म्हणउनी ॥ ३ ॥ निळा म्हणे वदनीं राहो । नाम अहो विठ्ठला ॥ ४ ॥

८२४ तुम्ही तों कृपेचे सागर । परि दुस्तर. कर्म माझें ॥ १ ॥ म्हणोनियां नये करुणा । माझिया दुर्गुणा देखोनी ॥ २ ॥ नेणें जप तप ध्यान कांहीं । पाडिलों प्रवाहीं प्रपंचा ॥ ३ ॥ निळा म्हणे केली सेवा । माझी हे देवा न पावेचि ॥ ४ ॥

८२५ तुम्ही देवा कृपावंत । आम्ही अनाथ दुर्बळें ॥ १ ॥ म्हणो-नियां थोरपण तुम्हां । येतें पुरुषोत्तमा आमुचेनि ॥ २ ॥ समानपणें असतों तरी । तुमची. थोरी न दिसती ॥ ३ ॥ निळा म्हणे लोखंड जैसा । दिधला परिसा बडिवार ॥ ४ ॥

८२६ देवपण तुम्हीं गमाविलें देवा । नाईकोनी धांवा येणें काळें ॥ १ ॥ न करा धांवणें केल्या कंठस्फोट । क्रिया ऐशी नष्ट धरियेली ॥ २ ॥ प्रेतापाशीं हाका देतां तें नाईके । थोठावला ठाके शोक नाना ॥ ३ ॥ निळा म्हणे नये करूं आतां आस । तुमची हें चित्तास कळों आलें ॥ ४ ॥

८२७ दाटलिया धुई आच्छादी रविनेजा । त्याचिपरी माझा दोष बळी ॥ १ ॥ न चलेचि पुढें तुमची ही युक्ति । सुदर्शन हातीं असोनियां ॥ २ ॥ काय चाले बळ सागराचें वडवानळीं । करित उठी होळी जीव-नाची ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसा परी जी अनंता । माझिया संचिता न जिंकावें ॥ ४ ॥

८२८ नसता गुण स्वाभाविक । वस्तूचि तरि निरर्थक ॥ १ ॥ तेवीं देवा देवपण । नसतां अंगीं तो पाषाण ॥ २ ॥ विना परिमळें कस्तुरी । मृत्तिकाचि तै निजनिर्धारीं ॥ ३ ॥ निळा म्हणे न मारी जिवा । तरी तें विषचि नव्हे तेव्हां ॥ ४ ॥

८२९ नामें आळवितां ओठीं । तुह्मां पोटीं भय वाटे ॥ १ ॥ नेणों कांहीं मागतील । किंकर येतील वैकुंठा ॥ २ ॥ काय वाटूं किती देऊं । ह्मणोनियां जिऊ निर्बुजला ॥ ३ ॥ ऐसें जाणोनी लपालेती । घेतलें चित्तीं भय वाटे ॥ ४ ॥ याचि लागीं उत्तर न द्या । कळलें गोविंदा मनोगत ॥ ॥ ५ ॥ निळा ह्मणे सुखी असा । न मागों सहसा आण तुमची ॥ ६ ॥

८३० नाहींचि केलें समाधान । माझें म्हणवून क्षिती वाटे ॥ १ ॥ आतां कधीं समोखाल । हातीं धराल प्रीतीनें ॥ २ ॥ मागें बहुतां संबो- ळिलें । आजीं तें केलें ब्रिद मिथ्या ॥ ३ ॥ निळा ह्मणे निवडलें खोटें । माझेंचि वोखटें अदृष्ट ॥ ४ ॥

८३१ बरें होणारें ते झाली माझी गती । हळहळ किती वाढवावी ॥ ॥ १ ॥ परी तुमच्या ब्रीदा लागला कळंक । दुराविल्या एक मशयक मी ॥ २ ॥ होती वाढविली कीर्ति तिहीं लोकीं । ते आजीं निष्टंकीं वाह- विली ॥ ३ ॥ ह्मणती शरणागत येणें उपेक्षिला । लौकिक हा झाला भला काय ॥ ४ ॥ समर्था चुकल्या भला कोणीहि हांसे । अनाथासी नसे शंका कांहीं ॥ ५ ॥ निळा ह्मणे जागा आपुल्या उचिता । आह्मी तों संचिताधीन झालों ॥ ६ ॥

८३२ बोलिलों तें तुम्हां उणें । कीजे क्षमा नारायणें ॥ १ ॥ आ- पुलिये मी तळमळें । दुःखें चावळलों तें कळे ॥ २ ॥ समर्थाची गति मति । कोण जाणे कैसी रीति ॥ ३ ॥ निळा म्हणे उचित करा । जैसें आपुलें तें दातारा ॥ ४ ॥

८३३ बोलिलों तें क्षमा करा । विश्वंभरा अपराध ॥ १ ॥ सेव- कांनीं कीजे सेवा । तुम्ही तों देवा देवोचि ॥ २ ॥ चावळलों ते सलगी । केली । उपसाहिली पाहिजे ॥ ३ ॥ निळा म्हणे न कळे लीला । अकळ कळा तुमची ते ॥ ४ ॥

√८३४ भक्तिपंथें न चले कोणी । वाट जाईल मोडोनी ॥ १ ॥ जरि अनाथा धांवणें । न कराल तुम्ही थोरपणें ॥ २ ॥ आमचा जन्म वायां

गेला । शब्द तुम्हांसी लागला ॥ ३ ॥ निळा म्हणे नव्हे भली । पुढें वाट खोळंबली ॥ ४ ॥

✓८३५ भाव भक्ति विलासिया । परिसा विनंती पंढरीराया ॥ १ ॥ आम्हां दासां सांभाळिजे । देउनी प्रेम गौरविजे ॥ २ ॥ जैसी तुमची आहे ख्याती । तैसीचि चालों द्या जी पुढती ॥ ३ ॥ नाहीं तरि होईल हासें । लोकीं ब्रीद लटिकें दिसे ॥ ४ ॥ तुम्ही आतां उपेक्षिलें । तरी हीनत्व सांगा कोणा आलें ॥ ५ ॥ निळा म्हणे पुढिला चाली । वाट पाहिजे रक्षिली ॥ ६ ॥

८३६ मागें पाळिलीं पोशिलीं । अपत्यें त्वां वाढविलीं ॥ १ ॥ ऐसें बोलियले संत । लटिकी वाटे ते ते मात ॥ २ ॥ हें गे मजचि उपेक्षिलें । नाहीं समाधान केलें ॥ ३ ॥ निळा म्हणे येऊनिया । भेटे पुरवी माझा थाया ॥ ४ ॥

८३७ मोकलितां धाय । नाईकसी कैसी माय ॥ १ ॥ सांडियलें दूर देशीं । नये करुणा कांहीं ऐशी ॥ २ ॥ वेष्टिलें श्वापदीं । अहंकार मोहमदीं ॥ ३ ॥ निळा म्हणे यावरी आई । धांव घाली वो विठाई ॥४॥

८३८ मृत्यूची अवस्था नेणेंचि अमृत । पीडा भाग्यवंत दरिद्राची ॥ ॥ १ ॥ तैसें तुम्ही नेणा आमुचे तळमळे । भोगितां सोहळे आपुलेचि ॥२॥ सिंधु काय जाणे तहानेची बाधा । पयोनिधी क्षुधा कैसी असे ॥ ३ ॥ निळा म्हणे रवी न देखे अंधारें । उष्मा सुधाकरें कवणे काळीं ॥ ४ ॥

८३९ येईल चित्तासी तुम्हां उचित । आपुलें संचित भोगूं आम्ही ॥ १ ॥ काय समर्थासी विनवावें रंकें । कोण त्याचें ऐके वचन तेथें ॥२॥ थोरा घरीं थोरा होतो बहु मान कोण पुसे दीन याचकासी ॥ ३ ॥ निळा म्हणे आम्हीं मानिला विश्वास । तो दिसे निरास अवघी येथें ॥ ४ ॥

८४० येईल चित्तासी तें करा । तुम्ही आतां विश्वंभरा ॥ १ ॥ आमुचें वायां गेलें जिणें । नांदा तुम्ही देवपणें ॥ २ ॥ केली आम्ही तोंडपिटी । फजिती व्हावया शेवटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे निजाभिमान । तुम्हीं सांडिला इमान ॥ ४ ॥

८४१ राग आला तरी । माय बाळातें नाव्हेरी ॥ १ ॥ राखे त्याची भूक तान । न मारी कापूनियां मान ॥ २ ॥ शांतवूनी स्तनीं । लावी तया न्याहाळुनी ॥३॥ निळा म्हणे धरी । अंकीं तया माया करी॥४॥

८४२ लटिक्या भूताची लटिकी भूतबाधा । झाली करवी खेदा जाणतिया ॥ १ ॥ तैसें तुम्हां केलें माझिया संचितें । देवपणहि थितें रचिलें ॥ २ ॥ लटिकीचि जळीं दाऊनियां छाया । झकविलें राया श्वापदाच्या ॥ ॥ ३ ॥ निळा म्हणे स्वप्नीं सिंहाचें रूपडें । देखोनियां पडे मदोन्मत्त॥ ४ ॥

८४३ लाजविली सेवा लाजविली भक्ति । वैराग्य विरक्ति लाजविली ॥ १ ॥ ऐसाचि घडोनि आला हा प्रसंग । हांसविलें जग आपुल्या ब्रीदा ॥ २ ॥ आमुचें होणार तेंचि वोढविलें । तुमचे कीर्ती आलें हीनपण ॥ ३ ॥ कैसे दीनानाथ म्हणवालजी आतां । आम्हां उपेक्षितां अनाथांसी ॥ ४ ॥ शिणलों भागलों संसारें गांजिलों । म्हणोनियां आलों शरण तुम्हां ॥ ५ ॥ निळा म्हणे काय जाणोनि नेणते । झालेति यशातें दवडूनियां ॥ ६ ॥

८४४ लाज वाटे जीव करी तळमळ । चिंतें वक्षस्थळ व्यापियेलें ॥ ॥ १ ॥ पाडिलों निढळ न सुचेचि विचार । तुम्हीं तो निष्ठुर धरियेलें ॥२॥ कैसेनि भेटी होईल पायासी । घडल्या त्या राशी पापाचिया ॥ ३ ॥ काय नेणों पुर्वीं केलें आचरण । तें आलें मोडोन फळभारें ॥ ४ ॥ नामाच्या चिंतनें नव्हे त्याची शांती । ऐशी काळगती विपरित ॥ ५ ॥ निळा म्हणे नेणें आपुलिया मती ॥ परी तुम्ही श्रीपति सर्व जाणा ॥ ६ ॥

८४५ लाभ अथवा हानी करितां व्यवसाय । आम्हां ते विषाय फळां आले ॥ १ ॥ एका लाभा पात्र केलें तिही लोकीं । आम्हां नेलें शेखीं ऐशा थरा ॥ २ ॥ फजितीसी उणें नाहीं लोकांमाजीं । अंतरविलें काजीं संसारिकां ॥ ३ ॥ नव्हता कळों आला निश्चयाचा भावो । येणें काळें देवो निष्ठुरसा ॥ ४ ॥ गेलें होऊनियां न चले या युक्ति । होणार ते गति हो कां सुखें ॥ ५ ॥ निळा म्हणे लाजे झाली प्राणसंधी । न ये करुणानिधी कृपा तुम्हां ॥ ६ ॥

८४६ लोभियानें धन केलें भूमिगत । दगडही थित घालुनी वरी ॥ १ ॥ तैसें तुम्हीं देवा केलें आपणासी । कळंक यशासी लावियला ॥ २ ॥ बुडविलें राज्य रायें सुरापानें । नसतां सावधान राज्यकार्या ॥ ३ ॥ निळा म्हणे आळसें बुडविला संसार । न गमतां व्यवहार साउकारें ॥ ४ ॥

८४७ वांया संतांची ही बोली । वचनें त्यांचीं लाजविलीं ॥ १ ॥ लटिकाचि केला कीर्तिघोष । येथें तो अवघीच निरास ॥ २ ॥ माझाचि मज अनुभव झाला । नाहीं सावाधांवा केला ॥ ३ ॥ निळा म्हणे पालट बुद्धि । दिसे तुमची कृपानिधी ॥ ४ ॥

८४८ शोकार्णवीं पडलें मन । तुमचें न देखोन स्वागत ॥ १ ॥ उदासीन धरिलें देवा । तुम्हीं बांधवा दीनाच्या ॥ २ ॥ माझेंचि कर्म बलवोत्तर । नेत्रा समाचार म्हणोनी ॥ ३ ॥ निळा म्हणे पडलों सांदीं । संसारबंदीं न सुटेची ॥ ४ ॥

८४९ सहजाचि तुमचीं वंदिलीं पाउलें । तंव मी माझें हें हिरोनी घेतलें ॥ १ ॥ आतां कोण दर्शना । येईल सांगा स्वभाव कळल्यावरि तुमचा पांडुरंगा ॥ २ ॥ हें काय तुम्हांसी बोलिलें विहीत । चोरोनियां घ्यावें आमुचें संचित ॥ ३ ॥ प्रारब्ध भोग जे घ्यावयासी येती अभिलाषुनी तेहि भोगितां श्रीपती ॥ ४ ॥ आतां क्रियामाण संग्रह जो करावा । तोहि वरिच्यावरी तुम्हींचि हरावा ॥ ५ ॥ अवघेंचि आमुचें घेऊनियां अंतीं । जीवभाव तेहि बुडवावे पुढती ॥ ६ ॥ निळा म्हणे सर्वस्वें उघडाच केला । तुमचिये संगतीं दैव हा लाधला ॥ ७ ॥

८५० संतवचनें खरीं होतीं । वाढेल जगीं तुमची कीर्ती ॥ १ ॥ जरी माझें समाधान । कराल देउनी आलिंगन ॥ २ ॥ नाहीं तुम्हां जाणें येणें । कांहीं कोठूनियां धावणें ॥ ३ ॥ निळा म्हणे विश्वंभरा । प्रकटा हृदयीं वास करा ॥ ४ ॥

८५१ सांडियेलें बाळा । कैसी निष्ठुर हे वेल्हाळ ॥ १ ॥ ऐसीं बोलतील सकळें । नारी नर हांसती बाळें ॥ २ ॥ माय नव्हे म्हणती

लांव । ऐसे उपहासिती सर्व ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्व जनीं । ऐसी होईल टेहणीं ॥ ४ ॥

८९२ हरूनियां ध्यावें चित्त । आवघेंचि वित्त धन माझें ॥ १ ॥ हें तों उचित तुम्हां । पुरुषोत्तमा विचारा ॥ २ ॥ दर्शनाचें हेंचि फळ । सोडावें निढळ करूनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे होईल टीका । माझी या लोका तुमचीच ॥ ४ ॥

---

## देव भक्तांचा संवाद

८९३ ऐसें ऐकोनियां उत्तर । देव म्हणे उदार धीर तुम्ही ॥ १ ॥ तुमच्याचि काजा रूपासी येणें । मजलागीं धरणें अवतार ॥ २ ॥ तुम्ही माझे मी तुमचा । आहेचि ठायींचा ऋणानुबंध ॥ ३ ॥ निळा म्हणे देवाभक्तां । ऐसी एकात्मका हो सरली ॥ ४ ॥

८९४ कांहीं काय मांडेल जेव्हां । मजचि प्रगट होणें तेव्हां ॥ १ ॥ जवळिच आहे भेऊं नका । माझिया बळें दुर्जन लोकां ॥ २ ॥ तुम्हा गांजिती द्वेषिती । त्यांची समूळ विनशती ॥ ३ ॥ निळा म्हणे भगवद्वाणी । ऐसी प्रविष्ट झाली श्रवणीं ॥ ४ ॥

८९५ जिवलग माझे गडी । न गमे घडी तुम्हांविण ॥ १ ॥ सांगा जे जे मनोरथ । पुरवीन आर्त तुमचें तें ॥ २ ॥ नका आतां उदासीन । करूं मन मजवरी ॥ ३ ॥ निळा म्हणे हरि ऐसा । करी लालसा दासाची ॥ ४ ॥

८९६ तुम्ही दिधलें वैकुंठभुवन । शेषशयन मजलागीं ॥ १ ॥ नाहीं तरी जाणता कोण । होतों निर्गुण निराभास ॥ २ ॥ नामरूप कैचें मज । तुम्ही चित्तें सहज वाढविलें ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुल्या दासां । देतो ऐसा बडिवार ॥ ४ ॥

८९७ देव आदरें म्हणे भक्तां । घ्या हो भुक्ति मुक्ति आतां ॥ १ ॥ भक्त म्हणती नेघों देवा । पुरे आम्हां तुम्हींचि सेवा ॥ २ ॥ रिद्धि सिद्धी तरी घ्यारे । भक्त त्यागिती धिक्कारें ॥ ३ ॥ निळा म्हणे करुनी साठीं । बैसलें चरणीं घालुनी मिठी ॥ ४ ॥

८९८ देव म्हणे भक्तराजा । अव्हेर माझा न करावा ॥ १ ॥ भोजन

काळीं पाचारावें । मजही घ्यावें सांगातें ॥ २ ॥ भोजनीं तुमच्या तृप्ती मज । काजें काय तुमचिया ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतर नका । असों एकएका माझारीं ॥ ४ ॥

८५९ देव म्हणे भक्त हो। कांहीं तरी घ्यारे । ते म्हणती उरे शीणचि घेतां ॥ १ ॥ याल तरि नेईन तुम्हां । ते म्हणती नका बंदीखान तें ॥ २ ॥ रिद्धि सिद्धि देईन तुम्हां । ते म्हणती आम्हां विटाळ तो ॥ ३ ॥ विचारी देव करावें कैसें । कैवल्याही ऐसें नेघों म्हणती ॥ ४ ॥ आतां आवडेल तरी तें मागा । देईन सांगा जीवींचें तें ॥ ५ ॥ निळा म्हणे हृदयीं ध्यान । द्या जीवन नाम तुमचें ॥ ६ ॥

८६० देव हांसोनि बोलती । नको येऊं काकुलती ॥ १ ॥ आम्हीं रंजवू आपणीयां । तुझिये वाचे चेतवुनीयां ॥ २ ॥ नलगे कांहीं परिहार । देणें तुज घरीं धीर ॥ ३ ॥ निळा म्हणे चरणावरी माथा । ठेवुनी करी पुढें कथा ॥ ४ ॥

८६१ देवें भक्तालागीं उपचार मांडिले । शांति सुखासनीं मानें बैसविलें । धरूनि तन्मयाचीं छत्रें गौरविलें । ज्ञानसंपत्तीचे दळभार दिधले ॥ १ ॥ सुखें राज्य करा म्हणे त्रिभुवनीं । माझें ऐश्वर्य हें सर्वांगीं लेऊनी । मिरवा भुषणें हीं यश कीर्ति दोन्ही । माझीं आयुधें हीं देतों संतोषोनी वो ॥ २ ॥ शांति विरक्ती हे मूर्तिमंत दया । क्षमा नित्यानंदें तुम्हां अर्पिलीया । अखंड नैराश्यता सेवे तुमचिया । ठेविले निकट वासे नवजती आन ठाया वो ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसा भक्तांचा समुदाय । देवें आनंदविला प्रीतीच्या उत्साहें । म्हणे निर्भय असा जवळीच मी आहें । भोगा सुख माझें निजाचें अद्वय वो ॥ ४ ॥

८६२ निर्भय असा माझ्या बळें॥ काळिकाळें ते रंकें ॥ १ ॥ सुखें करा हरींची कथा । तुमची चिंता मज आहे ॥ २ ॥ पाचाराल तेचि घडी । येईन तांतडीं धांवत ॥ ३ ॥ निळा म्हणे अमृतवचनें । दे वरदानें दासांसी ॥ ४ ॥

८६३ पासुनी तुम्हां न वचें दुरी । क्षण घटिकाभरी वेगळा ॥ १ ॥ चालतां तुम्हां धांवे पुढें । मागेंही वाढे सरिसाचि ॥२॥ निजल्या जवळी

तुम्हां उभा । भक्तिलोभा गुंतलों ॥ ३ ॥ निळा म्हणे करूनि साटी । तुम्हां कल्प कोटी न विसंबें ॥ ४ ॥

८६४ पुसे क्षेम भक्तांलागीं । म्हणतसे मार्गी श्रमलेती ॥ १ ॥ प्रति वरुषीं भेटी देतां । सांभाळितां येऊनी ॥ २ ॥ नाहीं तुमचे उत्तीर्ण झालों । कधीं आलों गांवासी ॥ ३ ॥ निळा म्हणे आभारला । प्रसन्न झाला दासासी ॥ ४ ॥

८६५ भक्त म्हणती अहो देवा । वियोग न व्हावा तुम्हां आम्हां ॥ १ ॥ इतुकेनिचि दोघेहि सुखि । मिसळतां एकाएकीं संतुष्ट ॥ २ ॥ आम्ही गाऊं तुमचे गुण । करावें श्रवण सादर तुम्हीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कमळापती । आहे हातीं तुमच्या हें ॥ ४ ॥

भक्तीं आराधिला देव । जाणवला भाव देवासीं तो ॥ १ ॥बहुत बरवें म्हणती भक्ता । न वजे परता जवळूनियां ॥ २ ॥ सुखी असा माझ्या बळें । पुरवीन लळे इच्छाल ते ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपाळु हरी । भक्तावरी तुष्टमान ॥ ४ ॥

८६७ भक्ति भाव बळकाविला । देव धांविला सोडवणे ॥१ ॥ म्हणे मज ध्या पाटलासी । सोडा भावासी जाऊं द्या ॥ २ ॥ ते म्हणती तूं लटिका देवो । आम्हीं धरिला भावो न सोडूं ॥ ३ ॥ निळा म्हणे भावासाठीं पडली मिठी देव न सुटे ॥ ४ ॥

८६८ भक्ति भावाचि बांधिला गाठीं । आला उठाउठीं देव तेथें ॥ १ ॥ म्हणे मज ध्या सोडायासी । ते ह्मणती ठकिसी नेघों तुज ॥ २ ॥ लटिकीच माया धरिशील रूपें । लपशील खोंपे रिघोनियां ॥ ३ ॥ न सोडूं भाव जाई तूं आतां । विनवी देव भक्तां काकुळती ॥ ४ ॥ भावही घ्यारे भक्तिही घ्यारे । मजही घ्यारे तुमचाचि मी ॥ ५ ॥ निळा म्हणे साधिलें लाज । भक्ति आपुली पैज जिंकियेली ॥ ६ ॥

८६९ भेटवाल पंढरीनाथ । तुम्हीचि संत कृपाळु ॥१॥ म्हणोनि येतों काकुळती । पुढतोंपुढती कींव भाकीं ॥ २ ॥ इतरांची मी नकरीं आस । झालों दास तुमचाचि ॥३॥ निळा म्हणे ठेवा पायीं । यावरी कायी विनवूं मी ॥ ४ ॥

८७० मग हळूचि बोले अमृतवाणी । मागा म्हणोनी निजभक्तां ॥१॥ मुक्त होईन सेवाऋणा । घ्याहो वरदाना इच्छेच्या ॥ २ ॥ तुम्हांसी जें जें वाटे गोड । मागा कोड पुरतें ॥ ३॥ निळा म्हणे भक्त त्या म्हणती। आम्हांसी प्रीति तुमचीचि ॥ ४ ॥

८७१ म्हणे मी येईन तुम्हांसवें । गांवा न्यावें आपुलिया ॥ १ ॥ ठाकेल ते करीन सेवा । माझा न करावा अव्हेर ॥ २ ॥ राहेन तुमचिये संगती । सुख विश्रांती कारणें ॥ ३ ॥ निळा म्हणे येणें रूपा । तुमचि कृपा देव म्हणे ॥ ४ ॥

८७२ सनकादिक म्हणती देवा । भुललेति भावा भक्तांच्या ॥ १ ॥ तरी जे येथें दर्शना येती । द्यावी त्या मुक्ति सायुज्यता ॥ २ ॥ देव म्हणती बहुत बरें । करूं आदरें मान त्यांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशी मात । ऐकिली साद्यंत संतमुखें ॥ ४ ॥

---

## हरी हा भक्तांच्या अंकीत राहून त्यांचें कार्य किती प्रेमानें व दक्षतेनें करीतो

—:*:—

८७३ अनुरागें भजती देवा । त्यांच्या भावा साक्षी तो ॥ १ ॥ म्हणोनियां मागें पुढें । धांवे कोडें सांभाळी ॥ २ ॥ भुके तानें करी चिंता । लागों नेदी त्या ऊनवारा ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतरसाक्षी । सदा कैं पक्षी दासाचा ॥ ४ ॥

८७४ अवघा कळा याचे हातीं । न करी काय एक श्रीपती । विष पाजितां अमृतीं । केली तृप्ती प्रल्हादा ॥ १ ॥ चंद्रहास्याचा कैवारी । राखिलें त्या महामारी ॥ राज्य देऊनियां मुरारी । वैष्णवांमाजि श्रेष्ठ केला ॥ २॥ आर्जुनाची प्रतिज्ञा गहनु । देखोनि दिवसा लोपिला भानु ॥ जयद्रथासी यमसदनु । प्राप्त केला तात्काळीं ॥ ३ ॥ गर्भी राखिला परीक्षिती । सुदर्शन चक्र घेउनी हातीं ॥ उदरीं प्रवेशोनियां श्रीपति । छेदिली शक्ति अनिवार ॥ ४ ॥ द्रौपदीच्या वस्त्रहरणीं । उडी घालुनिया ततक्षणीं ॥ वस्त्राची पुरवणी । लाजविलीं कौरवें ॥ ५ ॥ गजेंद्रं संकटीं धांवा

पडे दृष्टी । वाटे पोटीं नवल तेव्हां ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशिया परी । दासाचा करी प्रतिपक्ष ॥ ४ ॥

८८८ जिहीं धरुनी हरि मनीं । हृदयीं वदनीं रंजविला ॥ १ ॥ त्यांचा झाला अंकित ऐसा । घरिंचा जैसा म्हाणियारा ॥ २ ॥ न सांगतां करी सर्व । जाणे गौरव दासाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवसनिशीं । त्याजपाशीं सर्वदा ॥ ४ ॥

८८९ ज्याचा केला अंगिकार । चालवी भार त्याचा हा ॥ १ ॥ ऐसा आहे कृपावंत । सद्गुरुनाथ दीनांचा ॥ २ ॥ देउनियां बोध बुद्धी । निरसी उपाधी ममतेच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे मेळवी सुखा । न म्हणे पारिखा जीवजंतु ॥ ४ ॥

८९० ज्याचा केला अंगिकार । न मानी भार त्याचा हा ॥ १ ॥ चंद्रहास्य अर्जुनाचा । पुंडलीकाचा कैवारी ॥ २ ॥ नामदेवा कबिरासी । वागवी सांवत्यासी निज अंकीं ॥ ३ ॥ निळा म्हणे एकनाथा । न विसंबे सर्वथा तुकयासी ॥ ४ ॥

८९१ ज्या ज्या भक्तीं जेथें जेथें । पाचारिलें ज्या ज्या अर्थें । तुम्ही जाउनियां तेथें । साह्य केलें श्रीहरी ॥ १ ॥ आर्ते गजेंद्राचें स्तवन ऐकतांचि पदाभिगमन । करूनियां त्याची अर्ति हरण । निजधामाप्रती पाठविला । ॥ २ ॥ जिज्ञासता जनका अंगीं । तुमचे जाणावयालागीं । त्यासि ज्ञान देउनियां विषय भोगीं । विदेही करूनि ठेविला ॥ ३ ॥ अर्थार्थी तो बिभीषण । त्यासि लंकापति करुनि पूर्ण । स्थापिला चिरंजीवें पद देऊन अर्थदान त्या दीधलें ॥ ४ ॥ शुकसनकादिक ज्ञानें । अनुसरले आत्म चिंतनें । त्यासि देउनियां निजात्मज्ञान । जीवन्मुक्तपदीं बैसविले ॥ ५ ॥ चतुर्विधा भक्ति चारी भक्त । तुमचे कृपें परम मुक्त । उपमन्या क्षुधार्त्त आळवीत । तया क्षीरसिंधु दिधला ॥ ६ ॥ ध्रुवें केलें तुमचें स्तवन मागें बैसावया निजस्थान । तयातें ध्रुवपदीं बैसवून । केला वरिष्ट सकळ सीं ॥ ७ ॥ सुदामदेव तो लाचारी । तीनाचि मुष्टी पोहे हरी । ते घालुनियां मुखाभीतरीं सुवर्ण नगरी दिधली त्या ॥ ८ ॥ स्तंभीं प्रल्हा पाचारी । तत्काळ प्रगटोनियां नरहरी । हिरण्यकश्यपातें विदारी । आणि कुरवाळी निजभक्ता ॥ ९ ॥ निळा म्हणे ऐशी किर्ति । केलीं चरि

श्रीपती ॥ अपार हरिभक्ता अपार हस्तीं । अपार दिधलीं वरदानें ॥ १० ॥

८९२ देउनियां आपुलें प्रेम । करी भक्तांचा संभ्रम ॥ १ ॥आधीं निष्काम संपत्ती । तया वोपा भुक्ति मुक्ति ॥ २ ॥ निश्चळ शांति क्षमा दया सेवेलागीं अर्पी तया ॥३॥ निळा म्हणे महा भाग्य । तें त्या समर्पी वैराग्य ॥ ४ ॥

८९३ देवादेव मुगुटमणी । करी टेहणी दासा घरीं ॥ १ ॥ शीण त्या होऊं नेदी भाग । वोढवी अंग त्या अंगीं ॥ २ ॥ शुभाशुभ त्याचीं कर्मे । वारुनी दुर्गमें सुखी करी ॥ ३ ॥ निळा म्हणे आपणासरी । करूनियां करी बहुमान ॥ ४ ॥

८९४ धांवोनियां झोंबे कंठीं कृपादृष्टी अवलोकी ॥ १ ॥ म्हणे श्रमलेती मार्गी येतां । बैसा आतां अविश्रम ॥ २ ॥ घडी घडीं जिवींची मात । सांग पुसे आर्त आवडीचें ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपाघनें । बहुत मानें गौरविलें ॥ ४ ॥

८९५ नरसिंह मेहता गुजराथी ब्राम्हण । धरिला अभिमान त्याचा तुम्हीं ॥ १ ॥ द्वारकेसी त्याच्या हुंड्या भरियेल्या । शोभनासी नेल्या वस्त्रें पेट्या ॥ २ ॥ जनजसवंत राय राजेश्वर । केला त्याचा थोर बहुमान ॥ ३ ॥ निळा म्हणे कुबा कुलाल हरिभक्त । पीपा रजपुत प्रिय तुम्हां ॥४॥

८९६ न पडे विसर । याचा जया निरंतर ॥ १ ॥ हाही न विसंबे तयासी । जवळीं राहे अहर्निशीं ॥ २ ॥ चर्चा करिती याच्या गोष्टी । देव तया पाठींपोटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे अन्नपान । तया पुरवी आच्छादन ॥ ४ ॥

८९७ न विसंबे त्यां घटिकां पळ । त्याचिपाशीं सर्वकाळ ॥ १ ॥ उत्तीर्णत्वालागीं हरि । त्याची परिचर्या करी ॥ २ ॥ न म्हणे दिवस रात्रीं कांहीं । संचरोनी वसे त्याच्या देहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तां घरीं । गुणें नामें रूपें हरी ॥ ५ ॥

८९८ नाहीं कोणा उपेक्षिलें । सकळां सन्मानें स्थापिलें । आपुलिये पदीं बैसाविलें । देणें दिधलें अपार ॥ १ ॥ चुळा एका दुधासाठीं । स्तविताचि उपमन्यें जगजेठी । करूनिया क्षिराब्धीची वाटी । लाविली ओंठीं तयाचिये ॥ २ ॥ बापा अंकीं बैसावया । ध्रुवानें स्तविलें विनवूनियां ।

निश्चळ पद त्यासीं देऊनियां । अक्षयपदीं बैसविलें ॥ ३ ॥ सुदामदेव तो वरासाठीं । आला मागावया द्वारके भेटी । त्यासि रचूनियां गोमटी । सुवर्ण नगरी समर्पिली ॥ ४ ॥ पक्षियासी पाचारिलें । तिये गणिकेशीं विमानीं वाहिलें । नका भेणें हांकारिलें । त्या गजेंद्रा नेलें निजधामा ॥ ५ ॥ बिभीषण भेटी धांवोनी आला । लंकेचें राज्य दिधलें त्याला । चिरंजीव करूनियां बैसविला । आपुला शरणांगत म्हणवुनी ॥ ६ ॥ पहा हो वनींचीं तें वनचरें । निळा म्हणे रिसें आणि वानरें । आलिंगुनियां रघुवीरें । आपलें पंगतीं जेवविलीं ॥ ७ ॥

८९९ नाहीं तेंचि आणुनी ठेवी । चाड जिवीं जे वाटे ॥ १ ॥ समयाचे समया वरी । निर्माण करी आणि पुरवी ॥ २ ॥ नेदी दिसों केविलवाणें । मिरवी भूषणें निजांगींचीं ॥ ३ ॥ निळा म्हणे गुंतला भाके । धांवे हाके पाचारितां ॥ ४ ॥

९०० निज भक्ताची आवडी । सांभाळी त्या घडीं घडीं ॥ १ ॥ राखोनियां भूकतहान । करी त्याचा बहुमान ॥ २ ॥ वस्त्रे भूषणें पुरवी । चिंता त्याची वाहे जिवीं ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याचें उणें । नेदी पडों कवण्या गुणें ॥ ४ ॥

९०१. निवृत्तिनाथासि ठेविलें उन्मनीं । सोपानदेवा नामसंकीर्तनीं ॥ मुक्ताबाई निजमुक्तिस्थानीं । निजानंदीं गौरविलें ॥ १ ॥ ज्ञानदेवा दिधली समाधी । नामदेवा स्थापिलें निज पदीं ॥ परसा भागवताची वाङ्नदी । सुस्नात केली कीर्तनें ॥ २ ॥ वछरा आणि विसोबा खेचर । कानुपात्रा मिराबाई परम सुंदर ॥ अंतोबा नरहरि सोनार । चरणीं थारा दिधला त्या ॥ ३ ॥ गोरा सांवता कूर्मदास । सगुण स्वरूप भेटलें त्यास ॥ नरसी मेहता पिपा भानुदास । केला वास त्यांच्या हृदयीं ॥ ४ ॥ एका जनार्दन स्वरूपस्थिती । जनजसवंताची परम प्रिति । कबिराचीं पुष्पें करूनी अंतीं । निजधामाप्रती पाठविलें ॥ ५ ॥ तुकयासी विमानी वाहिलें । संतोबासी वैराग्य न्हाणिलें । निजस्थान पालखीं निजविलें । निजभुवनीं आपुलिये ॥ ६ ॥ निळा म्हणे आपुलीं बाळें । कडिये घेउनी पुरवी लळे । स्नेहाळु माउली कळवळे । प्रेम देउनी वाढवी ॥ ७ ॥

९०२ नीच कामीं न धरी लाज । भक्तकाज कैवारी ॥ १ ॥ सेव-

कांचा हा शिरोमणी । म्हणवी करूनी दासत्व ॥ २ ॥ उगाळी गंधें पुरवी माळा । वाहे जळा मस्तकीं ॥ ३ ॥ निळा म्हणे होउनी वाणी । आणि गोणी भक्तां घरीं ॥ ४ ॥

९०३ वेदी त्या दुसरें । लागीं आणिकाचें वारें ॥ १ ॥ युगायुगीं त्याचा । म्हणवी सोयरा निजाचा ॥ २ ॥ लेववुनी लेणीं । मिरवी अळंकार भूषणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे शांति दया । वोपी भुक्ति मुक्ति तया ॥ ४ ॥

९०४ परम कृपावंत हरी । दीनोद्धारीं तिष्ठतु ॥ १ ॥ भुक्तिमुक्ति घेउनी हातीं । द्यावया प्रति निजदासा ॥ २ ॥ चारी मार्ग अवलोकित । येती वागवित आर्त त्यांचें ॥ ३ ॥ निळा म्हणे सगुणवेषें । उभाचि असे विटेवरी ॥ ४ ॥

९०५ परम कृपेचा सागर । भक्तवत्सल करुणाकर ॥ १ ॥ ऐसीं वागवितो नांवें । भक्तिलागीं निज वैभवें ॥ २ ॥ म्हणवी दासाचा अंकित ॥ शरणांगता शरणागत ॥ ३ ॥ निळा म्हणे साचाचि करी । न वजे पासुनी तया दुरी ॥ ४ ॥

९०६ परम विश्रांति पावली । अवघीं येणें सुखी केली ॥ १ ॥ आवडीं वंदिती पूजिती । दर्शना जे याच्या येती ॥ २ ॥ नाम उच्चारिती वाचें । नित्य कोड करी त्यांचें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तासाठीं । धरी रूपें अनंतकोटी ॥ ४ ॥

९०७ बरें जाणवलें मग । करी येऊनियां लगबग ॥ १ ॥ अवलोकुनी कृपादृष्टीं । धरी कवळूनियां पोटीं ॥ २ ॥ वोरसली मोहें । लावी स्तनीं पाजी पेहे ॥ ३ ॥ निळा म्हणे दुरी । नवजे बैसोनियां घरीं ॥ ४ ॥

९०८ बहुतां देउनि अभयदानें । गौरविलें आपल्या मानें । घालुनी शांतीचीं आसनें । ब्रम्हसाम्राज्यीं बैसविलें ॥ १ ॥ ध्यान तन्मयाचीं छत्रें । माथां झळकती विचित्रें । अगाध कीर्तीचीं दिव्य वस्त्रें । प्रल्हादादिकां समर्पिलीं ॥ २ ॥ नारदा निर्लोभ वागेश्वरी । नामस्मरणाची वैखरी । देउनी दिव्य अळंकारीं । देवांदैत्यांमाजीं मिरविला ॥ ३ ॥ व्यासा वाल्मीका अगाध मती । देउनी वंद्य केलें त्रिजगतीं । जनक पृथु हे भूपती ।

आपुले पंगतीं बैसविले ॥ ४ ॥ अर्जुनादिकांसी आपुलें । ऐश्वर्य देउनी थोराविलें । सांख्य सिद्धांत उपदेशिले । रणीं वागविले रथवारु ॥ ५ ॥ उद्धवा मैत्रेया कृपा वोगरिली । निजात्मज्ञानें तृप्ति केली । भक्त कृपाळु माउली । गौराविली निज बाळकें ॥ ६ ॥ निळा नेणतें निपटणें । कांहींचि खाऊं जेऊं नेणें । वाढविलें तें स्तनपानें । नामचिंतनें आपुलिया ॥ ४ ॥

९०९ बहुतें आळीकरें । इनें वाढविलीं लेंकुरें ॥ १ ॥ आहे आधिलाचि अभ्यास । नव्हे कोणाही उदास ॥ २ ॥ अपत्य पाळवी । तया खाववी जेववी ॥ ३ ॥ निळा म्हणे घरीं । तया न विसंबे दारीं ॥ ४ ॥

९१० भक्त करिती तैसा होय । ठेविला ठाय तया स्थळीं ॥ १ ॥ पाचारितां भावेंतीं जेथें । प्रगटे तेथें रूप धरी ॥ २ ॥ जे जे उपचार करितां भक्त । ते ते स्वीकारित बाळापरी ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तापाशीं । नाहीं यासी दुराग्रह ॥ ४ ॥

९११ भक्तघरींचें करीन काम । त्यांचेंच नाम वागवीन ॥ १ ॥ भक्तरूपें विराजलों । स्थिरावलों हृदयीं त्या ॥ २ ॥ भक्तमुखें सुखावत । त्यांच्याचि क्रीडत देहसंगें ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसा देव । दाखवी प्रभाव आपुला ॥ ४ ॥

९१२ भक्त देव देवतार्चन । भक्त माझें पूजा ध्यान ॥ १ ॥ भक्ताविण भजों कोणा । म्हणे वैकुंठींचा राणा ॥ २ ॥ भक्त माझा विधि जप । भक्तचि योग याग तप ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तावरी । ऐसी निष्ठा सांगे हरी ॥ ४ ॥

९१३. भक्तद्वेषाचीं उत्तरें । ऐकतांचि कर्णद्वारें ॥ १ ॥ त्यांचें करि निर्दाळण । हरूनियां जीवप्राण ॥ २ ॥ दुर्योधन दुःशासना । ससैन्य निःपातिलें कर्णा ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तद्वेषें । हिरण्यकश्यपा झालें कैसें ॥ ४ ॥

९१४ भक्त स्तवनें जें जें करिती । तें तें ऐकूनियां श्रीपती । सुखें संतोषोनियां चितीं । दासा देती वरदानें ॥ १ ॥ ध्रुवानें वनीं आराधिला । तैसाचि उपमन्येंही स्ताविला । एक तो अढळपदीं स्थापिला । एका दिधला क्षीरसिंधु ॥ २ ॥ प्रल्हादाचें स्तवन गोड । त्याचें

पुरवी अवघें कोड ॥ निवारुनी जाड । शुष्ककाठीं प्रगटला ॥ ३ ॥ निळा म्हणे ध्यानीं मनीं । आठवावा चक्रपाणी । नाहीं त्यावांचुनी भवतारक दुसरा ॥ ४ ॥

९१५ भक्तहाका ऐकावया । पसरूनियां कान उभा ॥ १ ॥ कोणी गांजील एखादा । म्हणोनि गदा सांभाळी ॥ २ ॥ सर्वकाळ सावधान । निज जन रक्षणा ॥ ३ ॥ निळा म्हणे घाली उडी । भक्त सांकडी देखोनी ॥ ४ ॥

९१६ भक्तांचाचि वोरस देवा । धांवे सेवा करूं त्यांची ॥ १ ॥ जें जें गोड वाटे मनीं । तें तें वदनीं भरी तयां ॥ २ ॥ अपूर्व तेथें पूर्ण करी । पुरवी कामारी होउनी ॥ ३ ॥ निळा म्हणे रक्षी होत । उभा तिष्ठत त्यांपाशीं ॥ ४ ॥

९१७ भक्ताचियां मनोभावा । सारिखे देवा तुम्ही वर्ता ॥ १ ॥ आवडीचा न करा भंग । अंतरंग म्हणोनियां ॥ २ ॥ धर्मा घरीं उच्छिष्ट काढा । आर्जुना पुढा सारथ्य ॥ ३ ॥ निळा म्हणे बळीच्या द्वारीं । होउनी भिकारी भीक मागा ॥ ४ ॥

९१८ भक्तांचिये भुके । प्रेम वागविसी भातुकें ॥ १ ॥ घालूनियां निज मुखीं । एकाएकीं करिसी सुखी ॥ २ ॥ पुरवुनी आळी । घेसी कडिये तेचि काळीं ॥ ३ ॥ निळा म्हणे बापमाय । एका अंगें दोन्ही होय ॥ ४ ॥

९१९ भक्ताचिये मनीं जैसें । करि हरि तैसें वर्तत ॥ १ ॥ नेदी होऊं अशाभंग । वोढवी सर्वांग सेवेसी ॥ २ ॥ स्तंभीं पाचारितां हाके । होउनी ठाके नरहरी ॥ ३ ॥ निळा म्हणे उभा द्वारीं । केला विटेवरी मग ठाके ॥ ४ ॥

९२० भक्तांचि साठीं रूपें धरी । पावडे करी असंख्य ॥ १ ॥ भक्तांसी मानी आपुले सखे । नेदी पारिखें दिसों त्या ॥ २ ॥ कृपावस्त्र पांघुरवी । जवळीं बैसवी आपणा ॥ ३ ॥ निळा म्हणे तृप्तीवरी । ब्रम्हरस भरी मुखांत ॥ ४ ॥

९२१ भाव भक्तीचा भुकेला । दास दासांचा अंकिला । न वजे दुरी उभा ठेला । अवश्य झाला त्यांचाचि ॥ १ ॥ भक्तवचनें

ऐके कानीं । भक्त आवडी पाहे नयनीं । भक्त हृदयीं आलिंगुनी । निज ऐश्वर्य अर्पी त्यां ॥ २ ॥ भक्ता मानी जीवप्राण ॥ त्यांसीं न विसंबे एकहि क्षण । त्यांचें वागवी हा भूषण । निंबलोण उतरी त्यां ॥ ३ ॥ जीव भाव देवावरी । जिहीं ठेविला निज निर्धारीं । देवावीण दुसरी परी । तुच्छ मानिलें संसारा ॥ ४ ॥ नलगे वैकुंठ त्यांचिये चित्तीं । कैवल्यातें परतें करिती । देवाविण ते नेघों म्हणति । मोक्ष मुक्ती फुकटा ॥ ५ ॥ देवाविण रिद्धी सिद्धी । ओंवाळुनी सांडिती त्या उपाधी । देवा वेगळी त्यांचिये बुद्धी । नाहींचि विश्रांति आणिक ॥ ६ ॥ निळा म्हणे त्यांचिये घरीं । राहे होउनी अंकित हरि । भक्त काज हा कैवारी । ब्रीदें नागवी सर्वदां ॥ ७ ॥

९२२ भाव शुद्ध तरी । प्रगटे येउनी अंतरीं ॥ १ ॥ उरों नेदी तया भिन्न । करी आपणा समान ॥ २ ॥ भरोनियां सृष्टीं । आपणचि त्या पाठींपोटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे राहे । कवळूनियां अंतर्बाह्य ॥ ४ ॥

९२३ भाविकाची आवडी देवा । करी सेवा निज प्रीतीं ॥ १ ॥ हिंडे तया मागें पुढें । नाशी कोडें सकळही ॥ २ ॥ घरीं दारीं वसे हरी । विश्वंभरीं भाव ज्या ॥ ३ ॥ निळा म्हणे संदेह नाहीं । भक्तां पांहीं यावरी ॥ ४ ॥

९२४ म्हणवी कामारी । दास्य करी त्यांच्या द्वारीं ॥ १ ॥ ऐसा भक्तांसी भुलला । नाम गातां आतुडला ॥ २ ॥ नेणे त्याविण आणीक । शेषशाई वैकुंठ लोक ॥ ३ ॥ निळा म्हणे निःसीम भावें । भजले विके त्यांच्या नांवें ॥ ४ ॥

९२५ मागें पुढें उभा राहे । भरुनी पाहे डोळे त्या ॥ १ ॥ प्रेमासी दृष्टी लागेल म्हणें । उतरी निंबलोण वरूनियां ॥ २ ॥ पोटीं त्याला परम प्रीती । आलंगी श्रीपती हृदयेंसी ॥ ३ ॥ निळा म्हणे करुणा बहुत । झाला या मोहित भक्तांसी ॥ ४ ॥

९२६ मागें ऐकिले पवाडे याचे । आजीं ते साचे कळों आले ॥ १ ॥ आपुलियाचि स्वानुभवा । आलें तेव्हां साच कळलें ॥ २ ॥ आणुनी

मोहरा संकट टाळी । गोणी दुष्काळीं दाणियाची ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रयोजनीं । साहित्य घेउनी संपादिलें ॥ ४ ॥

९२७ सत्य भोळा देव कृपेचा सागर । न मोडी उत्तर संत आज्ञा ॥ १ ॥ भाविकाची सेवा न म्हणे फार थोडी । स्वीकारी आवडी आपुलिये ॥ २ ॥ अनन्य प्रीतीचें तुळसीपत्र जळ । मानी सर्वकाळ तृप्ती तेणें ॥ निळा म्हणे त्याचा करी बहुमान । अनाथ म्हणऊन सांभाळी त्या ॥ ४ ॥

९२८ संतांपाशीं आर्त याचें । सांगे जिवींचें निज गुज ॥ १ ॥ उपदेशिला चतुरानन । तेंचि ब्रम्हज्ञान अनुवादे ॥ २ ॥ उद्धवा आणि अर्जुनासी । सांगितलें संतांसी तें देत ॥ ३ ॥ निळा म्हणे भुललासी भक्ति । वाढवी प्रीति यालागीं ॥ ४ ॥

९२९ सदां सेवकांचा लाड । पुरवा करूनियां कोड ॥ १ ॥ जेंवि कृपावंत माय । तान्हयाच्या धणी धाय ॥ २ ॥ खाववा जेववा । लेणीं लुगडींहि त्या पुरवा ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवानिशीं । नेणा विसंबों तयासी ॥ ४ ॥

---

## देव व भक्त यांची एक रूपता.

९३० आमोद न सोडी कर्पुर । किंवा प्रभेतें रविकर ॥ १ ॥ तैसेचि देव आणि भक्त । येरयेरीं विराजित ॥ २ ॥ जेंवि साखरते गोडी । चंदन सौरभ्या न सोडी ॥ ३ ॥ निळा म्हणे अवकाश नभ । दोन्हीं एकचि ते स्वयंभ ॥ ४ ॥

९३१ दोयींचा हा ऋणानुबंध । प्रीतिवाद उभयतां ॥ १ ॥ म्हणोनि एक एकाधीन । जाणती उणखूण येरयेरां ॥ २ ॥ देव जाणे अंतरींचें । केलें भक्ताचें प्रतिपादी ॥ ३ ॥ निळा म्हणे भिन्न भाव । नाहीं देवभक्तांचा ॥ ४ ॥

९३२ देव घरा आला । भक्ति सन्मानें पूजिला ॥ १ ॥ पाहुणेर पंगती । संत द्विजवृंदें शोभती ॥ २ ॥ पुढें आरंभुनी कथा । बुका माळा गंधाक्षता ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रम्हानंदें । नाचती उभयतां आनंदें ॥ ४ ॥

९३३ देव चालिला सांगातें । भक्त जाती ज्या ज्या पंथें ॥ १ ॥ परम आनंद उभयतांसी । देवभक्तां सुखाच्या रासी ॥ २ ॥ चालतां

मारगीं । कथा कीर्तन प्रसंगीं ॥ ३ ॥ निळा म्हणे देवभक्तां । परमविश्रांती चालतां ॥ ४ ॥

९३४ देवा भक्तां भिन्नपण । देखती जन मूर्ख ते ॥ १ ॥ सविता तोचि नारायण । वेद प्रमाण हा अर्थ ॥ २ ॥ म्हणती व्यासोनारायण । मिथ्या वदती हें काय ॥ ३ ॥ निळा म्हणे अर्जुन कृष्ण । नारनारायणभिन्न तनु ॥ ४ ॥

९३५ देवाभेटीं संतपण विरे । देवपण नुरे संतभेटीं ॥ १ ॥ ब्रम्हानंदें निमग्न झाले । आप विसरले आपणा ॥ २ ॥ भक्तीचे आवडीं झाले भिन्न । एकाचि जीव प्राण उभयतां ॥ ३ ॥ निळा म्हणे स्वसुखा लोभा । एकाचि प्रभा दो ठायीं ॥ ४ ॥

९३६ देवामाजीं भक्त असे । भक्ता अंगीं देव दिसे ॥ १ ॥ ऐशी परस्परें मिळणी । जेवीं प्रभा आणि तरणी ॥२॥ भक्त देवातेंचि भजती । देवें भक्तीं ठेविली प्रीति ॥ ३ ॥ निळा म्हणे एकवंकीं । जैसा अळंकार कनकीं ॥ ४ ॥+

९३७ भक्त देवालागीं झुरे । देव भक्तातेंचि स्मरे ॥ १ ॥ जेंवि माउलियेतें बाळ । माय बाळातें स्नेहाळ ॥ २ ॥ येरयेरां नव्हती भिन्न । सर्वकाळीं सन्निधान ॥ ३ ॥ निळा म्हणे लवणा नीरा । जेंवि सोनें अळंकारा ॥ ४ ॥

९३८ भक्त पूजिती भगवंता । भगवंत पूजी आपुल्या भक्तां ॥ १ ॥ ऐसा प्रीतीचा कळवळा । परस्परें हा सोहळा ॥ २ ॥ भक्त देवातेंचि उमगी । देवहि धांवे तयालागीं ॥ ३ ॥ निळा म्हणे एकीं एक । वसोनि भिन्नत्वाचें बीक ॥ ४ ॥

९३९ भक्तीं देवातें पूजिलें । देवें भक्तां सन्मानिलें ॥ १ ॥ ऐसें भजती येरयेरां । जैसें जळ आणि जळगारा ॥ २ ॥ भक्त देवाजवळीं बैसे । देव भक्तां घरीं वसे ॥ ३ ॥ निळा म्हणे देवा भक्तां । सर्वकाळीं एकात्मता ॥ ४ ॥

९४० भिन्न दावूनियां एक । एकीं भिन्नत्वाचें बीक ॥ १ ॥ जेंवि बिंब प्रतिबिंब । दोन्हीं एकचि ते स्वयंभ ॥ २ ॥ जैसी गोडी आणि गूळ ।

कापूर तोचि परिमळ ॥ ३ ॥ निळा म्हणे देवा भक्ता । निवडी कोण भिन्न आतां ॥ ४ ॥

९४१ म्हणवूनि तुम्हा नित्य आठविती । या हो याहो म्हणती पांडुरंगा ॥ १ ॥ तुम्ही धांवोनियां येतां वरावरी । पुरवितां श्रीहरि आर्त त्यांचें ॥ २ ॥ न साहे वियोग तुह्मां उभयतां । देवा आणि भक्ता एकवंकी ॥ ३ ॥ निळा म्हणे दोन्ही पिंड एक जीव । जाणती हा भाव निगमादिक ॥ ४ ॥

---

## संतांचें वर्णन.

९४२ अगाध कीर्ति वाढले संत । केलीं विख्यात चरित्रें हीं ॥ १ ॥ अग्नींत उभे विषचि प्याले । नाहीं ते म्याले महा शस्त्रा ॥ २ ॥ वंदुनि आज्ञा बोले पशु । करी श्रुतिघोषु दीर्घ स्वरें ॥ ३ ॥ निळा म्हणे ठेउनी उदकीं । कागदहि सेखी कोरड्या वह्या ॥ ४ ॥

९४३ अढळ वैराग्य प्रगटे अंगीं । बसतां संगीं संतानिया ॥ १ ॥ दिव्य भोगीं विटे मन । मृतिकेसमान सोनें रुपें ॥ २ ॥ परमामृतीं नाहीं चाड । अप्सरा दुवाड वाटती त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे इह लोकींचे । भोग ते साचे वमनापरि ॥ ४ ॥

९४४ अर्थ जाणती अनुभवी । खूण ठावी जयां ते ॥ १ ॥ संतकृपेचि ते जाति । कवणे रितीं ते कैसी ॥ २ ॥ कळे तया खरें खोटें । धीट पाटे प्रसादिक ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतरींचें । प्रेम साचें कीं लटिकें ॥ ४॥

९४५ अर्थ अवघे याचे हातीं । जया देऊं जे बोलती ॥ १ ॥ तों ते तात्काळाचि पावले । जगामाजीं धन्य झाले ॥ २ ॥ नाहींचि वेळ काळ गुंती । देतां रंक थोर नेणती ॥ ३ ॥ निळा म्हणे अवलोकनें । तोडिती भवांचीं बंधनें ॥ ४ ॥

९४६ अपार संत झाले क्षितीं । ऐकिलें ऐकाल पुढेंही होती ॥ १ ॥ जे जे झाले हरिचे दास । करितां कीर्तनें सांडुनी आस ॥ २ ॥ दर्शनें मुक्ति आणिका देती । उद्धरु पावन केल्या याती ॥ ३ ॥ निळा म्हणे सनकादिक । करूनी अनामिक ॥ ४ ॥

९४७ अलभ्य लाभ ते सत्संगती । घरासीचि येति चोजवित ॥ १ ॥ ज्याचे ध्यानीं मनीं देव । राहिला राव पंढरीचा ॥ २ ॥ त्याहुनि अधिक आहे कोण । काळहि आपण सेवा करी ॥ ३ ॥ निळा म्हणे तिष्ठती द्वारीं । होउनी कामारी रिद्धी सिद्धी ॥ ४ ॥

९४८ अवलोकिलें कृपादृष्टी । केली वृष्टी वचनामृतें ॥ १ ॥ अंकुरले भावबीज । कारण निज अंतरींचें ॥ २ ॥ संतांचि हे सहज स्थिती । आठव देती स्मरणाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे धांवोनि येती । आणि उपदेशिती निज गुह्य ॥ ४ ॥

९४९ अहो ऐका भाविक । संत आर्तक मुमुक्षते ॥ १ ॥ शुद्धचर्या आचरण । हेंचि पूजन संतांचें ॥ २ ॥ नलगे सांगावें मागावें । जाणती स्वभावें हृद्गत ते ॥ ३ ॥ निळा म्हणे अकस्मात । भेटती संत भावशुद्धी ॥ ४ ॥

९५० आणिका ते हीं विठ्ठल करिती । लागले संगती भाविक त्या ॥ १ ॥ यांचा वारा लागेल ज्यासी । येती त्यासी मुक्तीही वरूं ॥ २ ॥ घडतां त्यांचें अवलोकन । होती पावन महा पापी ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांनी भेटी । तोचि गांठी विठ्ठलेंचि ॥ ४ ॥

९५१ आणिखीही उदंड संतजन । राहिले व्यापून महीतळीं ॥ १ ॥ नामेंचि पावन केले दोषी । उद्धार आणिकांशीं करुनियां ॥ २ ॥ गर्जती तेणें ब्रह्मानंदें । हरिनाम पदें आळविती ॥ ३ ॥ निळा म्हणे निमग्न झाले । हरिपदा पावले हरिनामें ॥ ४ ॥

९५२ आदि मग हे अनादि बोली । निशीनें प्रगटिली सूर्यमहिमा ॥ १ ॥ अर्थ याचा आणा चित्ता । मग विचारितां कळेल ॥ २ ॥ कडुनि नसतां कैंचें गोड । उष्मेविण सुरवाड छायेचा ॥ ३ ॥ निळा म्हणे पुत्रेंविण । न शोभे आपण वायाणें ॥ ४ ॥

९५३ आधीं भक्त पाठी देव । प्रगटे भाव देखोनी ॥ १ ॥ कांभोळी पाठीं कण । भुस निकण मग दाणा ॥ २ ॥ आधीं तंतु पाठी वस्त्र । कनका अळंकार रूप करी ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्ताविण । कैंचें देवपण देवासीं ॥ ४ ॥

९५४ आपपरते नोखळती । अवघाचि देखती विठ्ठल ॥ १ ॥ पूर्ण

होउनी ठेलें काम । आत्माराम देह त्याचा ॥ २ ॥ विठ्ठल कानीं विठ्ठल प्राणीं । विठ्ठल नयनीं मनामाजीं ॥ ३ ॥ निळा म्हणे विठ्ठल अंगें । रंगलें रंगें विठ्ठलाच्या ॥ ४ ॥

९५५ आपणचि ते येती घरा । देखोनि बरा निजभाव ॥ १ ॥ आप्तपणें आलिंगिती । मनींचा पुरविती हेत सकळ ॥ २ ॥ अनाथ अनन्य देखोनी रंक । करिती कौतुक खेळविती ॥ ३ ॥ निळा म्हणे लाविती सेवे । आपुलिया वैभवें गौरविती ॥ ४ ॥

९५६ आपणा सारिखे । देखे नाढळे पारिखे ॥ १ ॥ गुरु कृपा तो लाधला । व्यापुनी चराचर एकला ॥ २ ॥ निंदा स्पर्धा द्वेषाद्वेष । तुटले कामक्रोध पाश ॥ ३ ॥ निळा म्हणे पात्र सुखा । झाला एकाएकीं देखा ॥ ४ ॥

९५७ आंवरुनियां ज्यांनीं चित्त । ठेविलें सतत हरी चरणीं ॥ १ ॥ झाली त्याची कार्यसिद्धी । तुटल्या व्याधि जन्म जरा ॥ २ ॥ एकविध भजले देवा । उतरले भव समुद्रातें ॥ ३ ॥ निळा म्हणे निश्चय पदा । पावले गोविंदा आठवितां ॥ ४ ॥

९५८ आले भेटी संत जन । गर्जे गगन हरिनामें ॥ १ ॥ टाळ विणे मृदंग भेरी । छत्रिने अंबरीं झळकती ॥ २ ॥ विठ्ठल देव धांवती पुढें । भेटती कोडें जिवलगा ॥ ३ ॥ निळा म्हणे आलिंगनें । नव्हती भिन्न वेगळे ॥ ४ ॥

९५९ इंद्र चंद्र महेंद्र सर्व । मानवती देव हरिभक्तां ॥ १ ॥ म्हणती इहींचि केला ऋणी । चक्रपाणि कीर्तनें ॥ २ ॥ नेंदि तिये वैकुंठवासी । आपणाचि पाशीं गोंवियेला ॥ ३ ॥ निळा म्हणे हे सदैव सदां । कीर्तनें गोविंदा रंजविती ॥ ४ ॥

९६० उगाचि राहेन संतापासीं । सेवुनी चरणांसी निरंतर ॥ १ ॥ पुसेन तया सांडुनी लाज । आपुलीये गुज अंतरींचें ॥ २ ॥ फेडितील ते मनिंची शंका । वचनेंचि एका क्षणमात्रें ॥ ३ ॥ निळा म्हणे उणेचि नाहीं । त्याचिये पायीं निजानंदा ॥ ४ ॥

९६१ उत्तीर्ण नव्हीजेची वेचतां जीवें । ऐसे बरवे उपकार याचे ॥ १ ॥ सांगावें तें कोठवरी । जे जे अवसरीं जें केलें ॥ २ ॥ वाटे तिटे घरीं

दारीं । आपुल्यापरी सांभाळी ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुल्या नेमा । नटळे महिमा हाचि याचा ॥ ४ ॥

९६२ उदार ऐसा न दिसेचि दृष्टी । पहातां ही सृष्टी मज आतां ॥ १ जयाचीया वचनें जीवा जीवपण । तुमसेचि शीवपण शीवा अंगीं ॥ २ ॥ अविद्येनासीं अहंता मावळे । बोध भानु उजळे प्रकाशीतु ॥ ३ ॥ निळा म्हणे दावी आनंदाआनंदु । भोगवी निजानंदु निजानंदा ॥ ४ ॥

९६३ उदार संत उदार संत । जया तैसा हेत पुरविती ॥ १ ॥ अपार देणें अपार देणें । पावती पेणें वैकुंठींचें ॥ २ ॥ न सरे ऐसें न सरे ऐसें । देती सहवासें निजात्मसुख ॥ ३ ॥ निळा म्हणे यांचिये पायीं । निज वस्ती देई देवा मज ॥ ४ ॥

९६४ उभारुनी बाहो ध्वज । सांगती पैज घेउनी ॥ १ ॥ विठ्ठल म्हणा विठ्ठल म्हणा । कळिकाळ आंकणा मग तुम्हां ॥ २ ॥ लहानां थोरां नारीनरां । करिती हांकारा विश्वाचिया ॥ ३ ॥ निळा म्हणे तत्वता बीज । देताती सहज निवडुनी ॥ ४ ॥

९६५ एक एका अवलोकिती । एक मिसळती एकांत ॥ १ ॥ संत तेचि झाले देव । संतीं देव विराजे ॥ २ ॥ येरायेरां मिठी पडे । आतां निवडे तें कैसें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्ति सुखें । झाले सारखे उभयतां ॥ ४ ॥

९६६ एकचि आशीर्वाद देती । जरी अवलोकिती कृपेनें ॥ १ ॥ तरि त्या पावविती पदा । जेथें सर्वदा रमती मुनी ॥ २ ॥ निश्चयाचें देणें त्याचें । हरिती जीवाचें जीवपणा ॥ ३ ॥ निळा म्हणे अगाध वाचा । संत वरदाचा महिमा हा ॥ ४ ॥

९६७ एकचि वचन मानस पायीं । ठेविलें नवाई काय सांगों ॥ १ ॥ धन्य ते संत धन्य ते संत । जाणती हृद्गत सकळांचें ॥ २ ॥ दवडुनी अभिमान देवाचि देति । आणिकांही करिती आपणासें ॥ ३ ॥ निळा म्हणे अघटित चर्या । लागतांचि पायां पालटती ॥ ४ ॥

९६८ एकनिष्ठ झाला भाव । आतां देव तेचि अंगें ॥ १ ॥ द्वंद्वें त्याचीं करिती काई । सर्वां ठायीं देव तयां ॥ २ ॥ ध्यानीं मनीं जनीं वनीं । प्रगटे लोचनीं अहोरात्र ॥ ३ ॥ निळा म्हणे वियोग वार्ता । नेणती सर्वथा हरिभक्त ॥ ४ ॥

९६९ एकाहुनी आगळे एक। झाले हरिभक्त अनेक ॥ १ ॥ भक्ती निजज्ञानें वैराग्यें। देवचि होउनि ठेले अंगें ॥ २ ॥ प्रेमभक्ति अनुसरले। विठ्ठल देवें ते पूजिले ॥ ३ ॥ निळा म्हणे सांगों किती। न पुरे अल्प माझी मती ॥ ४ ॥

९७० एका नामें बहुत तरले। एका भावें जे अनुसरले। एका तुमतेंचि ते पावले। एकाएकीं गोविंदा ॥ १ ॥ एका जाणोनियां तुमतें। एका रुसले अहंकारातें। एका विसरोनियां संसारातें। एका सुखातें पावले ॥२॥ एका तुमच्या निजध्यासें। एकाचि तुमच्या नामघोषें। एका तुमच्या कृपालेशें। आपणा ऐसे तुम्ही केले ॥ ३ ॥ एका तुमच्या कीर्तिमेळें। एका तुमच्या भावबळें। एकाएकींचि उठोनि पळें। पाप सगळें गोविंदा ॥ ४ ॥ निळा म्हणे एकाएकीं। स्मरणमात्रेंचि झाले सुखी। एका नामोच्चारें मुखीं। वैकुंठलोकीं बैसविलें ॥ ५॥

९७१ एका विठ्ठलींचि ठेविला। जिहीं निश्चय आपुला ॥ १ ॥ तेचि विठ्ठल झाले आतां। मोह सांडुनियां ममता ॥ २ ॥ देवावीण सहसा कांहीं। दुजें तयां उरलेंचि नाहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे स्वानुभव ल्याले। विठ्ठलची अंगें होउनि ठेले ॥ ४ ॥

९७२ एकीं देव अनेकीं देव। नेणेचि भाव पालटों ॥ १ ॥ देवाचि भासे धरामंडळ। सूक्ष्म स्थूळ महदादी ॥ २ ॥ अन्न जीवन भूक तहान। देवचि भोजन तृप्तीचें ॥ ३ ॥ निळा म्हणे अंगें मनें। जीवें प्राणें देवचि ते ॥ ४ ॥

९७३ ऐश्वर्याचीं वचनाक्षरें। वदती मधुरें तत्वदातीं ॥ १ ॥ श्रवण करिती सात्विक लोक। पावती सुख कैवल्य ॥ २ ॥ भोगुनियां नित्यानंदा। सुखें निजपदा लिगटती ॥ ३ ॥ निळा म्हणे हे संत साधु। आर्तबंधु दीनाचे ॥ ४ ॥

९७४ ऐसी जोडलिया सत्संगती। परम विश्रांती भाविका ॥ १ ॥ ब्रम्हानंदाचें पारणें। नित्य स्मरणें श्रीहरिच्या ॥ २ ॥ सकळही लाभाच्या

संपत्ती । सामोऱ्या धांवती पारमार्थिक ॥ ३ ॥ निळा म्हणे कृत्य झालें । ज्यालागीं आलें नरदेहा ॥ ४ ॥

९७५ ऐसे हरिचे दास हरिनामीं रंगले । हरिचि होउनी ठेले एकाएकीं ॥ १ ॥ आपपर तया न दिसेचि पाहतां । विश्वीं एकात्मता अवलोकीती ॥ २ ॥ काम क्रोध लोभ मोह ममता माया । पळताती देखोनियां आशा तृष्णा ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांच्या दर्शनेंचि मुक्त । होताती पतीत महापापी ॥ ४ ॥

९७६ ओंवाळिती विठोबासी । नित्यानित्य परमादरेंसी ॥ १ ॥ नवनिताचीं विलेपनें । पंचामृतें अभिषेचनें ॥ २ ॥ नाना उपभोग अर्पिती । नैवेद्य माळा पुष्पयाती ॥ ४ ॥ निळा म्हणे नामघोषें । करिती आनंद उल्हासें ॥ ४ ॥

९७७ अंगीं ऐश्वर्य येऊनी बाणे । तुमचे भक्तीचीं लक्षणें ॥ १ ॥ ते तो मान्य होय जगीं । विश्ववंद्य तयालागीं ॥ २ ॥ शांती क्षमा आलिया वस्ती । संतलक्षणाची प्रशस्ती ॥ ३ ॥ काम क्रोध मोडली चाली । सर्व भूतीं साम्यता झाली ॥ ४ ॥ तुटोन गेले आशापाश । नुरोनि कल्पना निःशेष ॥ ५ ॥ निळा म्हणे नाहीं ममता । कृपा तुमची ते अनंता ॥ ६ ॥

९७८ अंतरींचा जाणती हेत । कृपावंत मग होती ॥ १ ॥ सर्व जाण सर्व जाण । संत निपुण ये अर्थीं ॥ २ ॥ देखोनियां आर्तिकांसी । करिती त्यांसी निजबोध ॥ ३ ॥ निळा म्हणे विठ्ठल मंत्रीं । देती श्रोत्रीं उपदेश ॥ ४ ॥

९७९ काळिच्या काळा नागवती । जिहीं विठ्ठल धरिला चित्तीं ॥ १ ॥ तेचि देव झाले अंगें । अहं मोह ममता त्यागें ॥ २ ॥ देहचि असोनि देहातीत । भोगीं अभोक्ते सतत ॥ ३ ॥ निळा म्हणे नामासाठीं । विठ्ठल सांठविला पोटीं ॥ ४ ॥

९८० काय त्यांचा महिमा वाणूं वारंवार । हरिभक्त थोर भूमंडळीं ॥ १ ॥ ज्याचिये भेटीचे आर्त ब्रम्हादिकां । पूज्य सकळ लोकां

विश्वा झालें ॥ २ ॥ यमधर्म वास पाहे नित्य काळ । म्हणे धन्य वेळ भेटती ते ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्व भाग्यें चोजविती । रीद्धि सिद्धि येती वोळंगणें ॥ ४ ॥

९८१ कांहीं करी ना हा करवी । असोनि जीवी जीववी हीन ॥१॥ संताचि ओळखती यासी । जाणतां आणिकांसीं दुर्लभ ॥ २ ॥ बुद्धीचिये पाठीं पोटीं । न देखे शेवटीं बुद्धी तया ॥ ३ ॥ निळा म्हणे सत्ता याचि । न देखे विरंची आणी रुद्र ॥ ४ ॥

९८२ केली पायवाट । उलंघिला पायाघट ॥ १ ॥ जिहीं हरी आठविला । जिवें हृदयीं धरिला ॥ २ ॥ जिंकोनियां काळा । वरि गेले भूमंडळा ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रम्हेशान । पावोनी लाविलें निशाण ॥ ४ ॥

९८३ कैसी सांपडली वेळ । तया केवळ लाभाची ॥ १ ॥ देवीचे झाले चित्तें वित्तें । गणगोतें सहीत ॥ २ ॥ नयेचि विकल्पाचा वारा । त्याचिया शारिरा आतळों ॥ ३ ॥ निळा म्हणे पहाती तेथें । देवापरतें न देखती ॥ ४ ॥

९८४ गर्जत जाती ब्रम्हानंदें । हरिचीं पदें हरिभक्त ॥ १ ॥ धाक त्यांचा काळिज्या काळा । कांपे चळचळां देखोनी ॥ २ ॥ विबुद्ध अवघे करिती मान । तीर्थे वंदन चरणाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे धन्य ते जगीं । झाले श्रीरंगीं रंगतां ॥ ४ ॥

९८५ गर्जत नामाच्या कल्लोळीं । आले महीतळीं उद्धरीत ॥ १ ॥ ते हे वीर वैष्णव गाढे । कळीकाळ त्यांपुढे तृणप्राय ॥ २ ॥ वचनमात्रेंचि देती बोध । करिती अगाध सच्छिष्या ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याचिये वाणी । अमृत वोळुनी वृष्टि करी ॥ ४ ॥

९८६ गर्जतां विठोबाच्या नामें । जाळिलीं कर्में शुभाशुभें ॥ १ ॥ रिघाले अवघियां बाहेरी । विठ्ठल अंतरीं धरूनियां ॥ २ ॥ कैचे तयां मायाजाळ । विरोली तळमळ कल्पनेची ॥ ३ ॥ निळा म्हणे भोग त्याग । त्याचे पांडुरंग हो सरला ॥ ४ ॥

९८७ गर्जविती भगवद्गुणीं । सर्वदा वाणी नीति घोषें ॥ १ ॥ तेणेंचि पावन करिती जगा । भवभयभंगा पावउनी ॥ २ ॥ भाग्याचे ते पावती तेथें । वसती जेथें हरिभक्त ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांच्या गोठी । ऐकतां कोटी सुखाच्या ॥ ४ ॥

९८८ गजेंद्राच्या संगें नाडीया उद्धार । प्रल्हादें असुर उद्धरीले ॥ १ ॥ हनुमंतें जुत्पत्ती रिस आणि वानर । पावले पार भवसिंधु ॥ २ ॥ बिभीषणें राक्षस लावियेले भक्ती । केली पावन क्षिती धर्मराजें ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसें संतीं उद्धरिलें । नव जाती बोलिले संख्यारहित ॥ ४ ॥

९८९ गोड तुमची ब्रीदावळी । गोड गातां नित्यकाळीं । गोड भक्त भावें बळी । तूं वनमाळी त्यापाशीं ॥ १ ॥ गोड तुमचीं नामें गाती । गोड कीर्तनीं उभे ठाकती । गोडा गोड तूं श्रीपती । त्याची भुक्ति मुक्ति तुं-चि तूं ॥ २ ॥ गोड त्याचे स्वानुभव । तुमच्या पायीं ठेविला जीव । गोड भक्ति दृढ भाव । तुमच्या चरणीं लिगटले ॥ ३ ॥ गोड त्याचें याती कुळ । गोड सत्कर्म तें सोज्वळ । गोड त्याचें बुद्धीबळ । तुज धरिलें निश्चयें ॥ ४ ॥ निळा म्हणे त्याची मती । गोड कीर्तनीं नवी स्फुर्ती । गोड तुमची सगुण मूर्ती । हृदयीं त्याचे स्थिरावली ॥ ५ ॥

९९० घडो त्याचा समागम । ज्याचें प्रेम विठ्ठलीं ॥ १ ॥ सहज त्याच्या ऐकता गोठी । परमार्थ पोटीं दृढावे ॥ २ ॥ अनुतापासी दुणीव चढे । वैराग्य वाढे चढोवढी ॥ ३ निळा म्हणे वाढे भाव । संचरे स्वानुभव निजांगीं ॥ ४ ॥

९९१ चोजवीत घरां येती । ज्यांचा देखती शुद्ध भाव ॥ १ ॥ ऐसे करुणाघन हे संत । करिती हेत परिपूर्ण ॥ २ ॥ पाचारुनियां हृदयीं धरिती । निकट बैसविती जवळी त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे अ-नुभव झाला । तोचि दाविला बोलोनी ॥ ४ ॥

९९२ जडोनियां ठेली । वृत्ति पायीं लिगटली ॥ १ ॥ मुखीं ना-मांची गर्जना । हरिचा आठव क्षणक्षणा ॥ २ ॥ रूपाचें चिंतन । तेथेंचि गुंतलें मन ॥ ३ ॥ निळा म्हणे दिलें । देह पायीं समर्पिलें ॥ ४ ॥

९९३ जन्ममरणा निवारिती । जे दाविती सुपंथ ॥ १ ॥ बैसविती अक्षय पदीं । ब्रम्हानंदीं कृपाळु ॥ २ ॥ एकाचि वचनें सिद्धासनीं । करिती बैसउनी अगाध ॥ ३ ॥ निळा म्हणे उत्तीर्णत्वासी । दुर्लभ पाशीं कवण वस्तु ॥ ४ ॥

९९४ जया नाहीं आपपर । सांगतां विचार स्वहिताचा ॥ १ ॥ जेथें देव जोडे जोडी । दाविती परवडी त्या साचा ॥ २ ॥ संदेहाचे तोडिती पाश । सहज उपदेश बोलणें ॥ ३ ॥ निळा म्हणे अनुताप उठी । ऐकतां गोठी भाविका ॥ ४ ॥

९९५ जिणें मरणें नाहीं आतां । हरिच्या भक्तां कल्पांतीं ॥ १ ॥ त्याच्या ध्यानें तैसेंचि आलें । आपुला विसरले देहभाव ॥ २ ॥ जडोनि ठेली अखंडता । एकात्मता हरिरूपीं ॥ ३ ॥ निळा म्हणे झाले संत । गुणातीत निजबोधें ॥ ४ ॥

९९६ जिहीं जोडिला विश्वासें । निज निष्ठेच्या मानसें ॥ १ ॥ मुखें आळविलें नाम । याचें धरूनियां प्रेम ॥ २ ॥ बैसली आवडी । याच्या पायीं दिली बुडी ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याच्या घरा । धांवे करी येरझारा ॥ ४ ॥

९९७ जिहीं निमिषमात्रें देह पालटिला । स्त्रियेचाचि केला पुरुष उभा ॥ १ ॥ त्यांचे नवल कोण तारिती जड जीवा । यालागीं घडावा संतसंग ॥ २ ॥ जिहीं फिरविलें औंढ्याचें देऊळ । बोलविले बोल मूर्तिकरवीं ॥ ३ निळा म्हणे जिहीं प्रेतें जिवविलीं । वरदें उपजविलीं बाळें स्त्रिया ॥ ४ ॥

९९८ जे जे होऊनियां अनुरक्त । झाले विरक्त हरिनामें ॥ १ ॥ त्यांचे अंगीं दिसावला । हृदयींच राहिला प्रगटोनी ॥ २ ॥ नेदी उरों दुसरेपणें । त्यांचेनि प्राणें जीवें जितु ॥ ३ ॥ निळा म्हणे घालुनी मिठी । त्यांतें कल्प कोटी न विसंबे ॥ ४ ॥

९९९ ज्यांचीं वचनें ऐके देव । पंढरिराव प्रीतीनें ॥ १ ॥ भेटविती

भेटे तया । पसरूनियां निज कर ॥ २ ॥ जें जें तया वाटे गोड । तें तें कोड पुरउनी ॥ ३ ॥ निळा म्हणे जवळी राहे । त्यांची पाहे निज वास ॥ ४ ॥

१००० तेचि भक्त भागवत । संतसेवे जे निरत ॥ १ ॥ शुद्ध त्यांचा भक्तिभावो । संत वरदें लाभे देवो ॥ २ ॥ संतवचनीं विश्वासती सत्य परमार्थ त्यांचे हातीं ॥ ३ ॥ निळा म्हणे संतसेवा । घडे त्या उदयो झाला देवा ॥ ४ ॥

१००१ तेचि वाणिती आनंद । परमानंद अंतरींचा ॥ १ ॥ जनीं लावावया गोडी । कीर्ति परवडी पोकारिती ॥ २ ॥ आपण पावोनिया सुखा । आणिकां हरिखा मेळविती ॥ ३ ॥ निळा म्हणे निगमादिक ज्याचें कौतुक वानिती ॥ ४ ॥

१००२ तेचि संत तेचि संत । ज्यांचा हेत विठ्ठलीं ॥ १ ॥ नेणती कांहीं टाणेटोणे । नामस्मरणें वांचुनी ॥ २ ॥ काया वाचा आणि मनें । घाले चिंतनें डुल्लती ॥ ३ ॥ निळा म्हणे विरक्त देहीं । आठवचि नाहीं विषयांचा ॥ ४ ॥

१००३ तेथें माझे कायसे बोल । संत सखोल संवाद ॥ १ ॥ आइकतांचि समाधान । होतसे उन्मन मनाचें ॥ २ ॥ सिद्ध प्रसादाची वाणी । जे तुमच्या गुणीं मिरवली ॥ ३ ॥ निळा म्हणे ती तो रंक । जाणती लोक सकळही ॥ ४ ॥

१००४ देखती तें विठ्ठलरूप । वाचे विठ्ठल नाम जप ॥ १ ॥ तेहि विठ्ठल झाले अंगें । मोह ममता विषयत्यागें ॥ २ ॥ विठ्ठल किर्ति लेइले अंगीं । विठ्ठल झाले भोगीं त्यागीं ॥ ३ ॥ निळा म्हणे विठ्ठल झाले । द्वैतभावातें मुकले ॥ ४ ॥

१००५ देखती लोचनीं । निजात्मता अनुदिनीं ॥ १ ॥ त्यांच्या भाग्याचा तो महिमा । नेणे चतुर्मुख ब्रह्मा ॥ २ ॥ हरीसंगें हरिचेंचि रूप । झाली भावना तद्रूप ॥ ३ ॥ निळा म्हणे अवलोकनें । तैसेचि झाले अंगें मनें ॥ ४ ॥

१००६ देखोनियां त्याचा अंतरभाव । बोळला देव कृपा सिंधु ॥ १ ॥ येऊनि जवळी हृदयीं धरी । आणी मुखीं भरी ब्रह्मरस ॥ २ ॥ देऊनि विभाग आपला मान । करी वाढवून मान्य जगीं ॥ ३ ॥ निळा म्हणे ठाकूनि आलेला वेळ । आवडी गोपाळ आलंगी त्या ॥ ४ ॥

१००७ देतां कांहींचि न घेति । भुक्ति मुक्ति रिद्धी सिद्धी ॥ १ ॥ म्हणोनियां संकट थोर । वाटे दुस्तर मज यांचें ॥ २ ॥ वैकुंठासी नेऊं म्हणतां । विटती तत्त्वतां ऐकोनि ॥ ३ ॥ निळा म्हणे रंगले रंगीं । माझिया निजांगीं लिगटले ॥ ४ ॥

१००८ देतां कांहींचि न घेती । संत उदासीन चित्तीं ॥ १ ॥ त्रैलोक्यींचा मान धन । नावडे तयां देवाविण ॥ २ ॥ नाहीं आस्था देहावरी । आशा तृष्णा कैंची उरी ॥ ३ ॥ निळा म्हणे ते देवचि झाले । कल्पकल्पांतीं संचले ॥ ४ ॥

१००९ देश काळ वर्तमान । तया नाढळेचि भिन्न ॥ १ ॥ जया कृपावंत माय । विठाई कवळुनी राहे ॥ २ ॥ आपुलें पारिखें । नेणती ते इच्छा सुखें ॥ ३ ॥ निळा म्हणे केली । ओळखी ठायींची ते भली ॥ ४ ॥

१०१० देव अंगें निराभास । भक्त रूपस चांगला॥ १ ॥म्हणोनियां ते आणिती रूपा । दर्पणीं पहा पां जेवीं नभ ॥ २ ॥ नामें रूपें मंडित केला । शृंगारिला अळंकारें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्त जनक । देव बाळक या हेतु ॥ ४ ॥

१०११ देवाचि झाले अंगें । देवा भजतां अनुरागें ॥ १ ॥ शुक प्रल्हाद नारद । अंबऋषी रुक्मांगद ॥ २ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान । नामा संधना आणि जाल्हाण ॥ ३ ॥ कूर्म विसोबा खेचर । सांवतां चांगा वटेश्वर ॥ ४ ॥. कबीर सेना सूरदास । नरसी मेहता भानुदास ॥ ५ ॥ निळा म्हणे जनार्दन एका । देवचि होउनी ठेला तुका ॥ ६ ॥

१०१२ देवाचें वर्म सांपडलें भा.व । नवजाये जवळुनी आडकला

देव ॥ १ ॥ देव म्हणे माझी नव्हेचि सुटका । भावेंविण म्हणती देवोचि लटिका ॥ २ ॥ वर्म हें यासीं दाविलें कोणें । संतासी ठाउकें येर कोणीही नेणे ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तासी तिहींचि दाविलें । न सोडिती आतां जिवेंसी बांधलें ॥ ४ ॥

१०१३ देवासाठीं घेउनी जोग । अवघाचि भोग त्यजियला ॥ १ ॥ तेचि एक बाळिये गाढे । कांपे त्यापुढें काळिकाळ ॥ २ ॥ आशा मात्र नाहीं ज्यांसी । शांतिसुखासी लिगटले ॥ ३ ॥ निळा म्हणे हरीच्या ध्यानें । गेले विसरोन देहभावा ॥ ४ ॥

१०१४ दृढ विश्वासें हरिसी भजतां । सायुज्यता पावले ॥ १ ॥ ऐसे भक्त नेणों किती । झाले वानिती पुराणें ॥ २ ॥ जिहीं केलें पिंडदान । पदीं मन प्राणेंसी ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांची कीर्ति । संतहि गाती कीर्तनीं ॥ ४ ॥

१०१५ दृश्य नेणती आभास । अवघा ब्रम्हींचा प्रकाश ॥ १ ॥ तया नाहीं दुजी परी । एकावीण उरसी हरी ॥ २ ॥ अवघेंचि नेणोनि जाणते । अवघ्या राहिले आंतौते ॥ ३ ॥ निळा म्हणे जनीं वनीं अवघ्या अंगें जनार्दनीं ॥ ४ ॥

१०१६ धन्य त्याचा शुद्ध भावो । आराधिला देवो पंढरीचा ॥ १ ॥ धन्य त्याचें जन्मकर्म । गाईलें नाम विठोबाचें ॥ २ ॥ धन्य त्याची देहक्रिया । आन उपाया नातळती ॥ ३ ॥ निळा म्हणे धन्य झाले । जे या गेले शरण हरी ॥ ४ ॥

१०१७ धरिती ज्या हातीं संत कृपावंत । पाळी पंढरीनाथ लळा त्याचा ॥ १ ॥ न विसंबे त्या घडी पळ युग मानी । दिसों नेदी जनीं किविलवाणें ॥ २ ॥ पाजी प्रेमपेहे वाहे तया अंकीं । म्हणे हे लाडकी तान्ही माझी ॥ ३ ॥ निळा म्हणे दावी स्वहिताचा पंथ । नेदी त्या आघात येऊं आड ॥ ४ ॥

१०१८ न करितीचि कांहीं वाणी । देतां पुरविती आयणी ॥ १ ॥ म्हणतीं घ्यारे घ्या निज सुखें । अवघ्यां एकचि धन सारिखें ॥ २ ॥ नाहीं

वांछितां भागले । सदां सर्वेशां हरिलें ॥ ३ ॥ निळा म्हणे पूर्णपणें । नेदिती पडों कोठें उणें ॥ ४ ॥

१०१९ नव्हे हे सांगितली मात । महिमाचि अद्भुत सद्गुरूचा ॥ १ ॥ जीवाजीवपणाचा वंगु । तोडूनि अभंगु ब्रम्हकरी ॥ २ ॥ आपुलीये मूळ मिरासी । नांदवी ज्यासी हातीं धरी ॥ ३ ॥ निळा म्हणे करितां सेवा । ऐसिया दैवा पात्र करी ॥ ४ ॥

१०२० न हों अविश्वासी तैसे । अधम जैसे कृतघ्न ॥ १ ॥ केले उपकार ते संतीं । आठवूं चित्तीं प्रीतीनें ॥ २ ॥ तेचि करिती साभिमानें । सत्य वचनें आपुलीं ॥ ३ ॥ निळा म्हणे न सांडूं वाट । दाविली नीट संतीं ते ॥ ४ ॥

१०२१ नाठवी तो स्वयें द्यावी आठवण । हे तों आहे खुण सद्गुरूची ॥ १ ॥ ऐशिया प्रकारें बोधवितां शिष्या । अंतरीं प्रकाशा काय उणें ॥ २ ॥ आपुलें स्वराज्य फावे आपणांसी । नित्य दृश्यासी तद्रुपता ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशी सद्रूपें कळा । परि आहे विरळा बोधक तो ॥ ४ ॥

१०२२ नामधारक हरिचे दास । करिती नाश पापाचा ॥ १ ॥ वसती त्यांच्या सहवासें ते । होताती सरते वैकुंठीं ॥ २ ॥ यमधर्म लागतो पायां । लोकत्रयामाजीं धन्य ॥ ३ ॥ निळा म्हणे हरिहर देव । करिती राणीव त्याच्या घरीं ॥ ४ ॥

१०२३ नाहीं तरि संत झकवित कोणा । थोरलहाना सारिखेचि ॥ १ ॥ नाहीं तेथें काने कोंचे । उपद्या वाचे उच्चार ॥ २ ॥ न लागे पूजनासी धन वित्त । एकचि चित्त भाव पुरे ॥ ३ ॥ निळा म्हणे उपदेश देती । कानीं सांगती विठ्ठल म्हणा ॥ ४ ॥

१०२४ नाहीं भिन्नत्व उरलें । अवघ्या अंगें अवघें झालें ॥ १ ॥ नेणती ते मानामान । जन तैसें तयां वन ॥२ ॥ न लागे साधन त्या संपत्ती । देवचि झाले सर्वां भूतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे एकाएकीं । एकचि होऊनि ठेले लोकीं ॥ ४ ॥

१०२५ नित्य कथाश्रवणीं प्रीति। चित्तवृत्ति अर्थांतरीं ॥ १ ॥ तेचि अधिकारी या सुखा। स्वानुभव निका पावती ॥ २ ॥ जया बोलतां चित्तीं। प्रसन्न होती तात्काळ ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्व जाण। हेंचि ओळखणें संतांचें ॥ ४ ॥

१०२६ नित्य वदनीं हरीचें नाम। अंतरीं प्रेम विसावलें ॥ १ ॥ त्यांच्या भाग्या नाहीं सिमा। पुरषोत्तमा प्रिय झाले ॥ २ ॥ आवडी ते सर्वदा हरी। न वाचे दुरी पासुनी त्यां ॥ ३ ॥ निळा म्हणे मेघःशाम। पुरवी काम सर्व त्यांचे ॥ ४ ॥

१०२७ नित्यानंदाचिया घरा। विवेक पैल तीरा पावविती ॥ १ ॥ तेचि सद्गुरु संतजन। निजात्मज्ञान फळदाते ॥ २ ॥ वदनीं वसविली वेदोनिती। स्वधर्म स्थापिती सकळांचे ॥ ३ ॥ निळा म्हणे नेती धामा। वैकुंठग्रामा विश्रांती ॥ ४ ॥

१०२८ निजानंद मुसावला। विठ्ठल झाला रूपाकृती ॥ १ ॥ तेणें लांचावलीं मानसें। लाविलें पिसें संतजनां ॥ २ ॥ नित्य त्यातेंचि अवलोकिती। आणि वानिती गुण वाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे नाचती रंगीं। करिती जगीं उत्साह ॥ ४ ॥

१०२९ मेणती ते आप्पर। दिशा झाले दिगंबर ॥ १ ॥ नाहीं देहाची भावना। करितां नामसंकीर्तन ॥ २ ॥ हरीच्या नामामृतें धाले। गिळुनी ब्रम्हांडा राहिले ॥ ३ ॥ निळा म्हणे अवघ्याचि परीं। झाले व्यापक चराचरीं ॥ ४ ॥

१०३० पशुमुखें वेदाच्या श्रुती। पढवा कीर्ती तुमचिये ॥ १ ॥ अचेतन भिंती चालवणें। हेंही करणें विचित्र ॥ २ ॥ तेरा दिवस उदकीं ठेवा। कागद देवा कोरडे ॥ ३ ॥ निळा म्हणे नारायण। ब्राम्हणजन तुम्हा घरीं ॥ ४ ॥

१०३१ पापी आणि दुराचारी। सहपरीवारीं संतांच्या ॥ १ ॥ तरले आणिक तरती पुढें। दिधलें येवढें सामर्थ्य त्या ॥ २ ॥ तुम्ही देवा

कृपावंत । केले निजभक्त आपणसे ॥ ३ ॥ निळा म्हणे जगदोद्धारा केला हा बरा उपाय ॥ ४ ॥

१०३२ पावले ते झाले सुखी । ज्याची वोळखी संतचरणीं ॥ १ ॥ कीटक पतंग पशु याती । मानव सत्संगतीं उद्धरले ॥ २ ॥ जिहीं विश्वास धरिला पायीं । तरले ते डोहीं भवाब्धीच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे निर्वाणरूप । पावले स्वरूप श्री हरीचें ॥ ४ ॥

१०३३ पाहोनियां आले ठाव । संत गांव सुखाचा ॥ १ ॥ त्याचि दाविताती वाटा । सुगमा वैकुंठा जावया ॥ २ ॥ भाळ्या भोळ्या सात्विक लोकां । करुनी नेटका उपदेश ॥ ३ ॥ निळा म्हणे परोपकारा । लागीं वसुंधरा विचरती ॥ ४ ॥

१०३४ पाहोनियां सकळ मतांतरें । बैसला धुरें जाणतीयां ॥ १ ॥ परि ते दुर्लभ निपुण ज्ञानी । जे कां जाणोनि नेणते ॥ २ ॥ बोलती उदंड सारांश गोष्टी । परत्वीं भेटी विरळे ते ॥ ३ ॥ निळा म्हणे वरदळवेषी । नुतरती कसीं तयांपुढें ॥ ४ ॥

१०३५ पूर्ण कृपा झाली तया । गेलों लगटेनियां निजचरणीं ॥१॥ न देखती ते हरिविण । जनीं जनार्दन कोंदला ॥ २ ॥ आनंदें त्या आळविती । वोसणती हरिनामें ॥ ३ ॥ निळा म्हणे देवाचि झाले । भावा आले तयाचिया ॥ ४ ॥

१०३६ प्रताप तुमचा आहेचि जैसा । करितां जी तैसा बडिवारही ॥ १ ॥ नव्हे जें कोणा तें करूनी दावितां । अघटित घडवितां निमिष्यमात्रें ॥ २ ॥ स्त्रियांचे पुरुष पशुमुखें श्रुती । चालविल्या भिंती उदकीं वह्या ॥ ३ ॥ निळा म्हणे माझा करा अंगीकार । तरी महिमा थोर वाढेल तुमचा ॥ ४ ॥

१०३७ फळलें तया जन्मांतर । न पडे विसर नामाचा ॥ १ ॥ अत्यादरें हरीची भक्ति । झाली विरक्ति विषयाची ॥ २ ॥ कामक्रोधां गिळिलें शांति । अहंकार समाप्ति मदमत्सरा ॥ ३ ॥ निळा म्हणे अचिंतन । लागलें अनुसंधान हरिरूपीं ॥ ४ ॥

१०३८ बहुत भाग्यें भूमंडळा । आले सकळां उद्धराया ॥ १ ॥ वर्तोनियां दाविती लोकां । पाविती परिपाका आणिकांहीं ॥२ ॥ सहज त्यांचा क्रीडा खेळ । हाचि मंगळ सुखकर्ता ॥ ३ ॥ निळा म्हणे हें महीतळ । ज्यांचिया अढळ धर्मक्रिया ॥ ४ ॥

१०३९ बोलणें त्यांचें तें निःशब्द । देखणें देखती सच्चिदानंद ॥ करणें चाळितां आत्मबोध । विषयीं विषय ब्रम्हरूप ॥ १ ॥ जाणें येणें आणिका दिसे । अचळपणें तें जैसें तैसें ॥ कल्लोळ सागरीं उमसे । रश्मि जैसे निजबिंबीं ॥ २ ॥ न मोडे त्या अखंडता । घेतां देतां सर्वही करितां ॥ हांसतां खेळतां बोलतां । निजीं निजतां यथासुखें ॥ ३ ॥ लेणीं अळंकारहि मिरविती । जयापरि तैसेचि दिसती ॥ न मोडतां स्वरूपस्थिती । चित्तीं चिंतन सर्वदां ॥ ४ ॥ निळा म्हणे गुणातीत । देहीं देहातें नातळत ॥ होऊनियां ठेले संत । अखंडित अखंड ॥ ५ ॥

१०४० बोलाविला बोले वेद । म्हैसा सुबुद्ध स्वरान्वयें ॥ १ ॥ काय एक न करा देवा । भिंती चालवा निचेष्टिता ॥ २ ॥ शिष्यालागीं देतां बोध । नलगे पलार्ध निमिष्यहि ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्ञानेश्वरा । मजहि अंगीकारा रंका दीना ॥ ४ ॥

१०४१ ब्रम्ह संपत्ती वरी तया । आवडे जया संतसंग ॥ १ ॥ त्रिकाळज्ञानी होय तो नर । आत्मसाक्षात्कार भोग प्राप्ती ॥ २ ॥ शांति दया क्षमा सिद्धी । बोलतां समाधी चालतां त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे एवढा लाभ । जोडे त्या स्वयंभ भाग्यवंता ॥ ४ ॥

१०४२ भक्तसेवेच्या उपकार । बहुत आभारें दाटलों ॥ १ ॥ काय उत्तीर्ण व्हावें यासी । रुक्माईसी विचारी ॥ २ ॥ देतां कांहींच न घेती उदासवृत्ती सर्वदां ॥ ३ ॥ निळा म्हणे जिवींचि जडले । तिहीं मज केलें अंकित ॥ ४ ॥

१०४३ भक्त उत्तीर्णत्वालागीं । राहिला युगीं युगें आतां ॥ १ ॥ न फिटे तरी त्यांचें ऋण । भक्त संपन्न वैभवें ॥ २ ॥ देती अन्न आ-

च्छादन । म्हणती येथून नवजावें ॥ ३ ॥ निळा म्हणे केला उभा । जो या नभा व्यापका ॥ ४ ॥

१०४४ भक्तभावांच्या संपत्ती । भोग, ऐश्वर्यें श्रीपती ॥ १ ॥ करा त्यांचें समाधान । न सांडितां सिंहासन ॥ २ ॥ केली नामाची घोकणी । जिहीं तुमच्या चक्रपाणी ॥ ३ ॥ निळा म्हणे ठेविली जिहीं । निष्ठा अखंड तुमचे पायीं ॥ ४ ॥

१०४५ भक्त म्हणावें तयासी । न गुंते जो आशापाशीं ॥ १ ॥ अहंकार निरसिला । देहभाव पालटला ॥ २ ॥ निंदा स्तुति हे नावडे । पाहतां परब्रम्ह आवडे ॥ ३ ॥ निळा म्हणे तया ध्यातां । स्वानंद तो येत हातां ॥ ४ ॥

१०४६ भक्तांचिया गांवां आला । देव परमानंदें धाला ॥ १ ॥ म्हणे नवजायें येथुनी । आतां भक्तांसी टाकुनी ॥ २ ॥ शीण माझा हरला भाग । गोड वाटे याचा संग ॥ ३ ॥ निळा म्हणे विजयी झाले । देवा भक्त घेउनी आले ॥ ४ ॥

१०४७ भक्तांविण देवा कोण । सोयरा सज्जन तिहीं लोकीं ॥१॥ यालागीं त्यांचीच वास पाहे । आज्ञेंत राहे भक्तांचिया ॥ २ ॥ आवडी ऐसीं रूपें धरी । भक्तांचें करी सांगितलें ॥ ३ ॥ निळा म्हणे लोकीं तिहीं । भक्तांविण आप्त नाहीं देवा ॥ ४ ॥

१०४८ भक्ताविण देवालागीं । पुसतें जगीं कोण दुजें ॥ १ ॥ नामहि नव्हतें रूपहि नव्हतें । कैसेनि जाणतें कोण तया ॥ २ ॥ परेहि परता परदेशी होता । केला भक्तीं सरता आपुल्या बळें ॥ ३ ॥ निळा म्हणे तो देवसा केला । भक्ति आणिला नामरूपां ॥ ४ ॥

१०४९ भक्तिसिंधु त्यां पायवाट । माया घाट उतरले ॥ १ ॥ गर्जत विठोबाच्या नामें । गेले व्योमें निज पंथें ॥ २ ॥ परब्रम्हा बरावरी । भेटले हरि विश्वात्मया ॥ ३ ॥ निळा म्हणे जोडलीं पदें । ब्रम्हानंदें डुल्लती ॥ ४ ॥

१०५० भाग्यें जोडे सत्संगती । जरि होय हातीं सुकृती ॥ १ ॥ भाव शुद्ध संचित गांठीं । तरीच भेटी तयासवें ॥ २ ॥ शुद्धचर्या आचरण । लाभती चरण तरि हातीं ॥ ३ ॥ निळा म्हणे सज्जनसंग । देवा भाग दुर्लभ तो ॥ ४ ॥

१०५१ भाव भक्ती भाग्यवंत । तयां संत भेटती ॥ १ ॥ येर ते भाग्यें जाती वायां । न भजतां पायां संतांच्या ॥ २ ॥ वचनीं यांचे विश्वास धरिती । धन्य ते होती उभय लोकीं ॥ ३ ॥ निळा म्हणे या सज्जनापायीं । जीवभाव जिहीं समर्पिला ॥ ४ ॥

१०५२ भाविकांची उत्तम जाती । विश्वास धरिती संतवचनीं ॥ १ ॥ तयां फळे त्यांचा भाव । प्रगटे देव हृदयांत ॥ २ ॥ जाणीवेचा नाहीं फुंद । शुद्धबुद्ध होती ते ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांची स्थिती । न ये ते गती जाणतिया ॥ ४ ॥

१०५३ भूतीं भगवंत देखिला । मानामान सहजाचि गेला ॥ १ ॥ तुमचे कृपेची हे जाती । स्वरूपीं वेध झाला वृत्ती ॥ २ ॥ द्वेषाद्वेष निंदा नेणें । चिंता असूया पळती भेणें ॥ ३ ॥ निळा म्हणे भूतमात्रीं । झाला कृपेसी तो धात्री ॥ ४ ॥

१०५४ भूतीं भूतात्मा देखतां । ठेली जडोनि एकात्मता ॥ नाढळे गुणदोष वार्ता । नमन नम्रता त्यां अंगीं ॥ १ ॥ धन्य त्यांचें जन्मकर्म । सम नाढळे ज्या विषम ॥ गळोनियां क्रोध काम । झाले निष्काम निर्लोभ ॥ २ ॥ संकल्प नासले विकल्प । पुण्य कैंचें तया पाप ॥ ठेलें स्वरूपीं स्वरूप । विठ्ठलरूप विठ्ठलीं ॥ ३ ॥ अहंकार नुरे उरीं । झाले व्यापक चराचरीं ॥ निजानंदाची उजरी । सन्मुख तयां सर्वदां ॥ ४ ॥ निळा म्हणे स्थैर्य बुद्धी । निर्द्वंद्व झाले निजात्मसिद्धी ॥ सच्चिदानंद पदोपदीं । कैवल्यसुखें डुल्लतो ॥ ५ ॥

१०५५ म्याला देवं देखोनि भक्तां । म्हणे मी आतां केउता पळों ॥ १ ॥ जोंवरीचि इहीं केली साठी । सोडवितां मिठी न सोडिती ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति देतों यासी । परि हे उदासी न घेती त्यां ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तीं मोकालितां आशा । देवाचे फांसा पडिलों म्हणे ॥ ४ ॥

१०५६ मस्तक माझा पायांवरी। राहो निरंतरीं संताच्या ॥ १ ॥ इतुलेन मी कृतकृत्य । होईनी निश्चित संसारीं ॥ २ ॥ धरिल्या जन्माचें सार्थक । भवभ[illegible]क साधन हें ॥ ३ ॥ निळा म्हणे नलगे फार । करणें विचार यावरी ॥ ४ ॥

१०५७ म्हणोनियां शब्द न पवेचि तत्त्वतां । बुद्धीचिया माथां वळघे कोण ॥ १ ॥ मना पवना कैंवि घडेल संचार । श्रुती परात्पर म्हणती ज्यातें ॥ २ ॥ नाद बिंदु कळा ज्योती हीं बोलणीं । आरौतीं निर्वाणीं विरती तेथें ॥ ३ ॥ निळा म्हणे वर्म नेणती ते सकळें । वाचकें वाचाळे संतांवीण ॥ ४ ॥

१०५८ म्हणोनियां संतजनां । देती आलिंगना पूजिती ॥ १ ॥ त्यांचियां मुखें ऐकती कथा । मानिती परमार्था फळ आलें ॥ २ ॥ म्हणती आजीं धन्य झालों । प्रसाद पावलों संतांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे उत्साह देवा । मानला वैभवा देखोनियां ॥ ४ ॥

१०५९ मानामान संकल्प आशा । तुटला मोहजाळ फांसा ॥ १ ॥ तया गुरूचियां भक्तां । नुरेचि कोठें गोंवा गुंता ॥ २ ॥ सर्वांतरीं आपुलें रूप । देखती नेणतां विकल्प ॥ ३ ॥ निळा म्हणे कर्मातीत । झाले होउनी कर्मीं रत ॥ ४ ॥

१०६० मार्ग दाउनी गेले आधीं । दयानिधी संत पुढें ॥ १ ॥ तेणेंचि पथें चालों जातां । न पडे गुंता कोठें कांहीं ॥ २ ॥ मोडूनियां नाना मतें । देती सिद्धांतें सौरसु ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसे संत । कृपावंत सुखसिंधु ॥ ४ ॥

१०६१ मुक्ति येती धांवोनियां । प्रीति वरावया हरिभक्तां ॥ १ ॥ रिद्धी सिद्धी वोळगे येती । समागम इच्छिती पुरुषार्थ ॥ २ ॥ शांति क्षमा दया सिद्धी । सारिती उपाधी होऊनिया ॥ ३ ॥ निळा म्हणे निरहंकृती । न ढळे परती नैराश्या ॥ ४ ॥

१०६२ मृत प्राणी ते जिवविले । पुरुषही केले स्त्रियांचे ॥ १ ॥ हे तों तुमची सहजस्थिति । लोकांसी भक्ति प्रगटावया ॥ २ ॥ प्रसादेंचि

विघवेसी बाळ । जन्मविला केवळ भातलंड ॥ ३ ॥ निळा म्हणे तु-मची करणी । देवाहुनी अधिक ॥ ४ ॥

१०६३ याचिलागीं परांगना । मानिती हुताशना ज्ञाते ॥ १ ॥ जवळी गेल्या जाळूं शके । म्हणोनि धाकें पळती त्या ॥ २ ॥ आधीं तों न करिती संभाषण । मा एकांत दर्शन कैंचें त्यां ॥ ३ ॥ निळा म्हणे शुचिर्भूत । वसती निर्धूत जनीं वनीं ॥ ४ ॥

१०६४ यात्रेहूनि आले गांवा । घेऊनियां विठ्ठल देवा ॥ १ ॥ भक्त पूजिती आदरें । टाळ विणे मृदंगस्वरें ॥ २ ॥ दिंड्या पताका छबिने । नृत्य हरिकथा गायनें ॥ ३ ॥ निळा म्हणे निज भुवनीं । पूजिती स्त-विती अनुदिनीं ॥ ४ ॥

१०६५ येकायेक पण । नसंपडे दुजेनविण ॥ १ ॥ म्हणोनिया भक्त केला । आधीं मग देव जाहला ॥ २ ॥ फुला आधीं फळ । नव्हेचि मु-ळेंविण डाळ ॥ ३ ॥ निळा म्हणे लेंक । होता बापपणा निक ॥ ४ ॥

१०६६ रात्रि पळे येतांचि सविता । सिंहगर्जनें कुंजर चळता ॥ १ ॥ तैसें हरिभक्ता सांकडें । येतांचि पळे दृष्टीपुढें ॥ २ ॥ महालक्ष्मीचें वारें । येतांचि दरिद्र घे माघारें ॥ ३ ॥ निळा म्हणे हरीच्या स्मरणें । हारपोनि जाती जन्ममरणें ॥ ४ ॥

१०६७ रंगले ते संतसंगे । झाले अंगें शुद्ध बुद्ध ॥ १ ॥ देवचि संत देवचि संत । आणिकांहीं करित देवचि ते ॥ २ ॥ कैंचें तेथें व्यव-धान । ब्रम्ह सनातन पाववितां ॥ ३ ॥ निळा म्हणे न लभे देवा । आणिती भावा त्या संत ॥ ४ ॥

१०६८ लाजोनियां समाधी सुख । ठाके अधोमुख हरिभेटी ॥ १ ॥ म्हणोनियां रतले दास । करिती उल्हास नित्य नवा ॥ २ ॥ ऐकोनियां नामावळी । धांवोनी कवळी हृदयीं त्यां ॥ ३ ॥ निळा म्हणे जवळी ठाके । नेदी पारिखें दिसोंचि ॥ ४ ॥

१०६९ वाचेतें वदवी रसनेतें चाखवी । नेत्रातें दाखवी परि त्या दुरी ॥ १ ॥ बुद्धी बोधविता चित्ता चेतविता । देहीं देहातीता कैसेनि दावूं ॥ २ ॥ भावाभावातीत अद्वैता अद्वैत । ज्यातें श्रुती म्हणत नेति

नेति ॥ ३ ॥ निळा म्हणे कांहीं न होऊनियां जें आहे । दाविती त्याचि सोय सद्‌गुरु संत ॥ ४ ॥

१०७० विठ्ठलनामें विठ्ठल झाले । देहभावा विसरूनि गेले ॥ १ ॥ सर्व काळ विठ्ठल चित्तीं । ब्रम्हानंदें ते डुलती ॥ २ ॥ विठ्ठल ध्यानीं मनीं जनीं । विठ्ठल लोचनीं चिंतनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे भोगीं त्यागीं । विठ्ठल तया जडला आंगीं ॥ ४ ॥

१०७१ वैष्णव वसती जये स्थळीं । तेथें धुमाळी कथेची ॥ १ ॥ विठ्ठल देव नाचे उभा । दाटे सभा संतांची ॥ २ ॥ सुखी होती महानुभाव । पावती ठाव तत्वीं ॥ ३ ॥ निळा म्हणे नारी नर । होती तत्पर परमार्थीं ॥ ४ ॥

१०७२ शुक प्रल्हाद हरीच्या नामें । गातां सुख संभ्रमें निवाले ॥ १ ॥ त्यांनीं उघडुनियां मार्गा । दाविली जगा हरिभक्ती ॥ २ ॥ तैसाचि नामा विष्णुदास । पावला सौरस परब्रम्हीं ॥ ३ ॥ निळा म्हणे दाउनी तुका । गेला एका जनार्दन ॥ ४ ॥

१०७३ शोधूनियां आले संत । हिताहित जगाचें ॥ १ ॥ तेचि वचनें अनुवादती । सकळां नीतिप्रमाणें ॥ २ ॥ सत्यासत्य ठावें तया । पाहोनियां ठेविलें ॥ ३ ॥ निळा म्हणे गुंता गोंवा । कांहींचि जिवा न करिती ॥ ४ ॥

१०७४ सकळहि संत आराधिती । हृदयकमळीं ते पुजिती ॥ १ ॥ चरण गोमटे म्हणवूनि । पापा तापा करित धुणी ॥ २ ॥ नित्यानित्यें आठविती । जिवें भावें वोवाळिती ॥ ३ ॥ निळा म्हणे तृप्त झाले । चरणामृतेंचि ते धाले ॥ ४ ॥

१०७५ सकळाठायीं भगवद्भाव । हाचि अनुभव जयाचा ॥ १ ॥ त्याच्या चरणीं लीन व्हावें । उद्धरावें कृपेनें ॥ २ ॥ मावळले कामक्रोध । वृत्ति सन्निध हरीच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याच्या नामें । पापें अधर्म नाशती ॥ ४ ॥

१०७६ सद्गुरुकृपा वोळली तयां । जे पंढरीराया अनुसरले ॥ १ ॥ भक्ति ज्ञान वैराग्यशीळ । शांति अढळ निर्वैरता ॥ २ ॥ भूतदया मानसीं वसे । मातले प्रेमरसें गर्जती ॥ ३ ॥ निळा म्हणे हृदयीं ध्यान । मुखीं नामचिंतन अहर्निशीं ॥ ४ ॥

१०७७ सारुनि अवघींच मतांतरें । जे लटिक्यासी खरें मानिती ॥ १ ॥ एकचि दृढाविती भावो । जेणें देवो जोडे तो ॥ २ ॥ सत्य भजन सत्य भक्ति । सत्यचि बोधिती परमार्थ ॥ ३ ॥ निळा म्हणे एकाचि वचनीं । ब्रह्मसनातनीं मेळविती ॥ ४ ॥

१०७८ सांगों जातां शब्दचि विरे । जैसि अंधारें रविभेटीं ॥ १ ॥ सागरीं ठाव बुडीही देतां । न लभेची सर्वथा निर्बुजला ॥ २ ॥ यापरि शब्द न पवेचि तेथें । कैसेनि सुखातें अनुवादों ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणती संत । आहे सिद्धांत तेथींचा तो ॥ ४ ॥

१०७९ सांपडली हे सुगम वाट । हरीचिया पाठ नामाचा ॥ १ ॥ ब्रह्मानंदें करिती घोष । कीर्तनीं उल्हास नित्यानीं ॥ २ ॥ हरीचिया प्रेमें रंगोनियां गेले । देहींचे विसरले देहभाव ॥ ३ ॥ निळा म्हणे जिंकोनि काळा । भोगिती सोहळा वैकुंठींचा ॥ ४ ॥

१०८० सीत बुंद प्राप्त ज्यासी । निजात्मसुखासी तो पावे ॥ १ ॥ जेथें उभे संतजन । नारायण समावेत ॥ २ ॥ तया सुखा उणें नाहीं । लोकीं तिहीं पूज्य तो ॥ ३ ॥ निळा म्हणे हरीचे शेष । करीत नाश कल्मषा ॥ ४ ॥

१०८१ *सुखाचीच ओतली । मूर्ति याची ठसावली* ॥ १ ॥ *अविच्छिन्न भगवतबुद्धी । सर्व भूतीं निरवधी* ॥ २ ॥ मोह ममता कैची आतां । आशा कल्पना हरीच्या भक्तां ॥ ३ ॥ निळा म्हणे सनकादिकां । अनुभव तैसा त्याचा निका ॥ ४ ॥

१०८२ सुरवर इच्छा करिती त्यांची । नित्य हरिभक्तांची भेटावया ॥ १ ॥ म्हणती धन्य हरीचे दास । सर्वदां उदास देहभावीं ॥ २ ॥

दर्शनें यांच्या सर्वही सिद्धी । तुटती उपाधी जन्ममरणें ॥ ३ ॥ निळा म्हणे वैकुंठवासी । रंगला प्रेमासीं यांचिया ॥ ४ ॥

१०८३ सुरदास आंधळा पंजाबी ब्राह्मण । गातां तुमचे गुण धन्य झाला ॥ १ ॥ विसोबा खेचर चांगा वटेश्वर । नरहरी सोनार पाठक नामा ॥ २ ॥ जिवलग तुम्हां सांगाती जीवाचे । विभागी भाग्याचे केले तुम्हीं ॥ ३ ॥ निळा म्हणे भेद नाहीं तुम्हां संतां । दाविली भिन्नता प्रीतीसाठीं ॥ ४ ॥

१०८४ सूर्य न देखे अंधकारा । अग्नि जेवीं शीत ज्वरा ॥ १ ॥ तेंवि हरिभक्तां सांकडें । येऊंचि न शके तयापुढें ॥ २ ॥ हनुमंतासी भूतबाधा । नव्हे कल्पांतींही कदा ॥ ३ ॥ निळा म्हणे दत्तात्रया । न बाधी मोह ममता माया ॥ ४ ॥

१०८५ सोडोनियां जाती पोतीं । कृपा करुनी दिधलीं हातीं ॥ १ ॥ संत उदार उदार । लुटविलें निज भांडार ॥ २ ॥ होतें सायासें जोडिलें । निक्षेपींचें तें दाविलें ॥ ३ ॥ निळा म्हणे उदारपणा । मेरु संतांच्या ठेंगणा ॥ ४ ॥

१०८६ संतकृपा त्यांसीचि फळे । ज्यांचें चित्त वोळे परमार्थीं ॥ १ ॥ काय उणें सुखा मग । संतसंग जोडतां ॥ २ ॥ देवचि हातीं लागे तयां । संत जया प्रसन्न ॥ ३ ॥ निळा म्हणे संतांपाशीं । आहे अनायासीं सर्वसिद्धी ॥ ४ ॥

१०८७ संतरूपें तुम्हीचि धरा । विश्वंभरा अवतार ॥ १ ॥ म्हणोनि महिमा कीर्ती जगीं । वागविती अंगीं सामर्थ्य ॥ २ ॥ बोलउनी रेडा चालविती भिंती । विमानीं होती उपविष्ट ॥ ३ ॥ निळा म्हणे मानवी तनु । जाती घेऊन वैकुंठा ॥ ४ ॥

१०८८ संतप्रसाद लाधले । तेचि धाले ब्रम्हरसें ॥ १ ॥ सदा नामीं जडली प्रीति । तेचि करिती उद्धार ॥ २ ॥ भक्ति भाग्य वोसंडलें । वैराग्य आलें मांडोनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे अंगीं शांति । क्षमा विश्रांति ज्ञानाची ॥ ४ ॥

१०८९ संत ऐसा उदार एक । त्रैलोक्यनायक श्रीविठ्ठल ॥ १ ॥ आणखी नये तुळणें दुजा । धुंडितां समाना त्रिभुवनीं ॥ २ ॥ ज्याचिया वचनें भवसिंधु सुरे । माया पुरें दूरी पळे ॥ ३ ॥ निळा म्हणे सगुणावतार । तेचि परात्पर श्रीहरीचें ॥ ४ ॥

१०९० संताचा वास जये स्थळीं । तेथें रवंदळी पापाची ॥ १ ॥ काम क्रोध जाती विलया । ममता माया देशधडी ॥ २ ॥ तृष्णे कल्पनेचा गांव । वोस ठाव संदेहा ॥ ३ ॥ निळा म्हणे अहंकारा । मद मत्सरा उरी नुरे ॥ ४ ॥

१०९१ संतापाशीं अपार सुख । हरिखा हरिख वोसंडे ॥ १ ॥ बोलती वचनें तेचि वेद । शास्त्रानुवाद विहिताचे ॥ २ ॥ पुरातन ज्या ज्या उत्तम वाटा । दाविती चोखटा भाविकां ॥ ३ ॥ निळा म्हणे यांचा धंदा । हाचि सर्वदा गुण वाणी ॥ ४ ॥

१०९२ संतीं जया हातीं धरिलें । ब्रह्मसनातन ते पावले ॥ १ ॥ आणिकां दुर्लभ जें साधनें । यांच्या प्राप्त अवलोकनें ॥ २ ॥ फळ अनापेक्ष पावती । प्राणियांचिये संगतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कल्पतरु । सामान्य दाते हे ईश्वरु ॥ ४ ॥

१०९३ हरावया कलीचे दोष । साधु हे अंश श्रीहरीचे ॥ १ ॥ म्हणोनियां सामर्थ्य अंगीं । वागविती जगीं निभ्रांत ॥ २ ॥ भक्तिलेणें लेऊनियां । विचरती माया लाघवी ॥ ३ ॥ निळा म्हणे संदेह नाहीं । यदर्थीं कांहीं त्रिसत्य ॥ ४ ॥

१०९४ हरीचिया भजनें हरिचे जन । करिती पावन पतितांसी ॥ १ ॥ ऐसा त्यांचा अगाध महिमा । निरुपमा तो न वर्णवे ॥ २ ॥ देऊनियां परमार्थसिद्धी । पावविती पदीं श्रीहरीच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे सत्संगसुख । गणितां अधिक परमामृता ॥ ४ ॥

१०९५ हरीच्या पडोनियां स्वभावळीं । करितां होळी महादोषा ॥ १ ॥ तेचि धन्य देहधारी । या माझारीं कलियुगा ॥ २ ॥ [illegible]

सत्याचि क्रिया । जे आचरोनियां वर्तती ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांचिया संगें । उद्धरिजे जगें अनायासें ॥ ४ ॥

१०९६ हरिभक्त माझे जिवलग सांगाती । सांभाळूनि नेती परलोका ॥ १ ॥ वचनेंचि त्यांच्या होय महा लाभ । करी पद्मनाभ कृपादृष्टी ॥ २ ॥ मोहादि बंधनें जाती तुटोनियां । कळिकाळहि पायांतळीं दडे ॥ ३ ॥ निळा म्हणे मुक्त मोकळिया वाटा । जावया वैकुंठा त्यांच्या संगें ॥ ४ ॥

१०९७ हरिभक्तीच्या जाणोनी नीति । त्याचि उपदेशिती भाविकां ॥ १ ॥ पडों नेदिती अडचणी गोवा । जातां देवा भेटिसी ॥ २ ॥ बैसवूनियां सुखासनीं । पाववितो निधनीं वैकुंठा ॥ ३ ॥ निळा म्हणे देउनी संग । ठाविती अभंग हरिपदीं ॥ ४ ॥

१०९८ हेंचि त्यांचें नित्य काम । दावणें धर्म विहिताचे ॥ १ ॥ ज्याचें तया स्वहित जोडे । ऐसें उघडें बोलती ॥ २ ॥ निःसीम पांडुरंगीं भक्ति । उपजे विरक्ति भाविकां ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसी वाणी । वदती पुराणीं प्रतिपाद्य ॥ ४ ॥

## सद्गुरू तुकोबारायांचे वर्णन.

१०९९. अवघे वर्ण बावन्न परी । शब्दीं शब्दांच्या कुसरी ॥ १ ॥ आपत दिले जोडुनियां । स्वामी सद्गुरु तुकया ॥ २ ॥ नलगे करणेंचि बडामोडी । अर्थी अक्षरें उघडीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपावंता । कैसेनि उत्तीर्ण होऊं आतां ॥ ४ ॥

११००. एकाक्षरीं विस्तार करा । अर्थांतरा मेळवूनी ॥ १ ॥ हे तों माझी नव्हे युक्ति । चेतवणें स्फूर्ति तुमची हे ॥ २ ॥ वसंताच्या ईक्षण मात्रें । पल्लव पत्रें फळें वृक्षा ॥ ३ ॥ निळा म्हणे रविकिर्णीं । विकाशवणें कमळासी ॥ ४ ॥

११०१. कृपावंता सद्गुरुराया । केला जो माझीया मना बोध ॥ १ ॥ तो काय बोलोनि दावऊं आतां । बोलणें बोलतां आरौतें पडे ॥ २ ॥

शब्दांतील परात्पर । ध्वनि ॐकार न पवेचि ॥ ३ ॥ निळा म्हणे आनंद कोटी । उथळोनी सृष्टी गगनीं भरे ॥ ४ ॥

११०२. चाडिया मुखें दाणा पडे । तरि तो निवडे कणभारें ॥ १ ॥ तैसें कडवळ कोकिलें नोव्हे । सोंपटचि राहे वाढोनियां ॥ २ ॥ तैसें सद्गुरुमुखींचें वचन । पाववी निज स्थान पदातें ॥ ३ ॥ वाचाळ ज्ञानें ऐकतां गोष्टी । वाउग्याचि शेवटीं भरोवरी ॥ ४ ॥ निळा म्हणे सांप्रदाय शुद्ध । उपजवी बोध गुरु शिष्या ॥ ५ ॥

११०३ तुकोबाचे कीर्तनमेळीं । नाचे कल्लोळीं स्वानंदें ॥ १ ॥ क्षिरापती वांटी हातें । काळाहि सांगातें वरू धांवे ॥ २ ॥ उदकामाजीं रक्षी वह्या । आलिंगी बाह्या पसरुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशा कीर्ति । वाढवी श्रीपती दासांच्या ॥ ४ ॥

११०४ पशुमुखें ज्ञानेश्वर । करविला उच्चार वेदघोषु ॥ १ ॥ तैसेंचि तुम्हीं मजही केलें । सामर्थ्यें वदविलें आपुलिया ॥ २ ॥ मी तों मुळींचाचि मतिमंद । जाणोनिया भेद अंतरींचा ॥ ३ ॥ निळा म्हणे अंगीकार । केला जी वर देऊनियां ॥ ४ ॥

११०५ मी तों नेणें व्यासवाणी । अर्थ गुह्यार्थ जे जे पुराणी । बोलिले कवी प्रसादवाणी । तेही अर्थ मी नेणें ॥ १ ॥ आपुलिये आवडीचिये भरीं । गौरविली म्यां हे वैखरी । श्रवण करावी हे चतुरीं । ऐशी नव्हेचि मुग्ध वाणी ॥ २ ॥ परी एक आहे विश्वास थोरु । स्वामी तुकया हा सद्गुरु । न करील कदाही अव्हेरु । भाव माझा जाणोनी ॥ ३ ॥ कृष्णचरित्रीं हे वाग्वाणी । वदविली तिहींचि वर देउनी । पुरविली माझी हे आयणी । आर्त जाणोनी अंतरींचें ॥ ४ ॥ निळा म्हणे कृष्णार्पण । होतु कथिले ते कृष्णगुण । ऐशी हे प्रार्थना करून । ठेविला मस्तक चरणावरी ॥ ५ ॥

११०६ येऊनियां कृपावंतें । तुकयास्वामी सद्गुरुनाथें ॥ १ ॥ हात ठेविला मस्तकीं । देउनी प्रसाद केलें सुखी ॥ २ ॥ माझी वाढविली मती ।

गुण वर्णावया स्फुर्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे मी बोलता । दिसे परी हे त्याची सत्ता ॥ ४ ॥

११०७ वंदुनि तुकया सद्गुरूचें चरण । ब्रह्मानंदें गर्जोनि पूर्ण ॥ स्वानुभवभरें हांकारून । औषध घ्या घ्या म्हणतुसे ॥ १ ॥ निजात्मनगरींहुनी धडफुडा । वैद्य आलों गा या तुमच्या चाडा ॥ तोडीन नाना व्याधींचा झगडा । करीन रोकडा अमरा ऐसा ॥ २ ॥ जे औषधींचेनि सुवासमेळें । द्वैतरोग उठोनि पळे ॥ अहं कुपित्ताचें पेटाळें । उमळोनियां सगळें तात्काळ पडे ॥ ३ ॥ घेतां माझी दिव्य औषधें । सनकादिकांसी निघालीं दोंदें ॥ महर्षि मातले ब्रह्मानंदें । जाणिजे नारदें प्रतीत हे ॥ ४ ॥ अहं विषानळें घेरला । सदाशिवही झिजणीं पडिला ॥ त्रिविध तापें होता आहाळला । तो म्यां उपचारिला निजात्मवेद्यें ॥ ५ ॥ देऊनि स्मरणाचें रसायण । हरिलें बद्धतेचें कठीणपण ॥ देहातीत करूनियां जाण । ठेविला करून पूर्वी जैसा ॥ ६ ॥ क्षराक्षरातींत वृक्षाची मुळी । ते म्यां प्रल्हादाचिया हृदयकमळीं ॥ घातली होती म्हणोनि विषकल्लोळीं । वांचला अग्निज्वाळीं शस्त्रघातीं ॥ ७ ॥ ऐसे एकैक स्वानुभव । सांगतां नवल त्याची ठेव ॥ कैंचा उरेल अहंभाव । जाईल ठाव सांडोनियां ॥ ८ ॥ ऐशा नानाप्रकारच्या दिव्य औषधी । देऊनि उपचारिलीं लक्षावधी ॥ भ्रमें भ्रमलीयांचिये शुद्धी । उपाव त्रिशुद्धी मज हातीं ॥ ९ ॥ म्हणोनियां आलों गा धांवत । विश्वास पहावया या हो हात । नाहीं नाडीलेति केला घात । फुटली घात अहंकारें ॥ १० ॥ विषय कुपथ्याचेनि भरें । त्रिविध तापें तापलेती ज्वरें ॥ अहंममतेचें लागलें वारें । बद्धतां थोरें देहबुद्धी ॥ ११ ॥ ममाभिमानेंसी कुंथत । भेदबुद्धीचेनि विकारें बरळत ॥ मी माझें लटिकेंचि बोलत । पडिलेती लोळत शुद्धि नाहीं ॥ १२ ॥ विधीचा न साहोचि वारा । अविधि जातसां चाचरा । तेणेंचि सन्निपात विकारा ॥ प्रबळ शरीरा वाढली तृष्णा ॥ १३ ॥ न चलवे ऐक्याचिया भूमिके । विपरीत ज्ञानाचे

खातसे झोके । अंधारीं पडिलेती देखोनि निकें ॥ सत्यातेंचि लटिकें मानुनि ॥ १४ ॥ तयासी एकचि विचार । क्षणमात्रेंचि होईल उतार ॥ ध्या माझें वचन हें साचार । द्वैत कल्पना संचार न करावा ॥ १५ ॥ एक चमत्कारिक औषध देईन । वैराग्य वल्लीचें रसायन ॥ वरी माझिये अभेद-मात्रेसी सेवन । चिदैक्यभावें करावें ॥ १६ ॥ सांडुनी रसनें रसाची गोडी । नित्यानित्यविवेक आवडी ॥ प्रत्यगावृत्ति धारणा फुडी । निरसेल गाढी भ्रमभावना ॥ १७ ॥ पथ्येंसी असावें निरंतर । हो नेदावा विपरीत ज्ञानाचा संचार ॥ माझीये वचनीं विश्वास धरा । धरितां साचार हरेल व्यथा ॥ १८ ॥ मागें म्यां थोरथोराकारणें । दिधलीं होतीं हीं रसायनें ॥ नांवें सांगों तरी शास्त्रें पुराणें । उदंड व्याख्यानें गर्जताती ॥ १९ ॥ अर्जुन वांचविला नाना सांकडी । उद्धव उपचारिला काढाकाढी ॥ शुक वामदेवादिक परवडी । ऋषींची भवभयसांकडीं निवारिलीं ॥ २० ॥ ऐसें उपचारिले बहुत जन । संख्यारहित विचक्षण ॥ आतांही हे रसायन । सेविती ते होऊनी आरोग्य ठाती ॥ २१ ॥ निळा म्हणे वस्ताद माझा । शिरीं असतां सद्गुरुराजा । निवारीन रोग घेउनी पैजा ॥ धरितां वोजा विश्वास मनीं ॥ २२ ॥ यापरि सादावूनियां सकळां । जातो आपुल्या निजात्म स्थळा ॥ रामराम करूनियां म्हणे निळा । कृपा अखंडित असों द्यावी ॥ २३ ॥

## संत कृपेनें प्राप्त झालेल्या स्थिती संबंधानें जगापाशीं काढलेले उद्गार व संतापाशीं काढलेले उद्गार.

११०८ अवघ्याचि संपत्ती आलीया घरा । तुमचिया दातारा आगमनें ॥ १ ॥ सीतळ झालों पावन झालों । तुमचिया लागलों चरणासी । ॥ २ ॥ धरिलीया जन्माचें सार्थक झालें । तुम्हीं अवलोकिलें म्हणोनिया ॥ ३ ॥ निळा म्हणे धरिलें हातीं । जेव्हांचि संतीं तुम्ही मज ॥ ४ ॥

११०९ आईका हो संत तुम्ही मुनेश्वर । माझिये निर्धार अंतरींचा ॥ १ ॥ विठोबाव चुनी न मनींचि दैवत । न धरी माझें चित्त भाव

कोठें ॥ २ ॥ काय मतांतरें करूं ते साधनें । हरीनाम कीर्तनें वांचुनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे न लगे वायूची धारणा । तत्त्वसंख्या कोणा कामा आली ॥ ४ ॥

१११० उपायाच्या करितां श्रेणी । परि जेथ कोणी न पवेचि । ॥ १ ॥ तया पावविलों ठायां । संतीं करूनियां निज कृपा ॥ २ ॥ ज्याचे प्राप्ती लागीं योगी । धांवती मार्गी सुषुम्नेच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे सिद्ध मुनी । ज्यातें अनुदिनीं चिंतिती ॥ ४ ॥

११११ उत्तीर्ण त्याचें काय व्हावें । न कळे भावें वंदितों ॥ १ ॥ जीव पायीं ठेवूं म्हणे । लटिकेपणें तो मिथ्या ॥ २ ॥ देह मांस चर्म हाडें । अर्पितां आपाडें नैश्वर तीं ॥ ३ ॥ निळा म्हणे चरणीं माथा । ठेवूं आतां संतांचिये ॥ ४ ॥

१११२ उत्तीर्ण त्याचें नाव्हिजे आतां । जीवही अर्पितां थोडाची ॥ ॥ १ ॥ ओंवाळुनी सांडूं काया । वरुनी पाया संतांच्या ॥ २ ॥ मायबापा काय द्यावें । कैसें व्हावें उतराई ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्याची कृपा । जन्म खेपा निवारी ॥ ४ ॥

१११३ उत्तम संचित होतें गांठीं । तेणेंचि या भेटी संतासवें ॥ १ ॥ सुकृतासी आलीं फळें । भावबळें लगटोनी ॥ २ ॥ त्याच्या भाग्या आले भाग्यें । लाधले संग संतांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे पूर्णते आले । जिहीं या सेविलें संतचरणा ॥ ४ ॥

१११४ ऐसा संतांचा उपकार । काय मी पामर आठवूं ॥ १ ॥ करूनियां अनुमोदन । दिधलें वचन अभयाचें ॥ २ ॥ धृ० ॥ म्हणती करि नाम-पाठ । न करी खटपट यावीण ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपावंत । करिल सनाथ श्रीहरि ॥ ४ ॥

१११५ कोठें फावो येतां मग । निश्चळ ऐसा हा प्रसंग ॥ १ ॥ आजि संतसंगगुणें । हरिचीं नामें उच्चारणें ॥ २ ॥ अनायासेंचि कथा कीर्ती । जोडली याची संगती ॥ ३ ॥ निळा म्हणे फळोन्मुख । झालें परमार्थिक सुख ॥ ४ ॥

१११६ कृपा केली संतजनीं । लाविलों भजनीं श्रीहरिच्या ॥ १ ॥ नाहीं तरी जातों वायां । लक्ष भोगावया चौऱ्यायसी ॥ २ ॥ आणिका

साधनीं गुंताचि पडतां । अभिमान वाढता नित्य नवा ॥ ३ ॥ निळा म्हणे धांवणें केलें । सुपंथें लादिलें नीट वाटे ॥ ४ ॥

१११७ खाती आपण जें जेविती । तेंचि आणिकांहीं वाढिती ॥ १ ॥ आजि बहुता भाग्यें भेटी । झाली चरणीं पडली मिठी ॥ २ ॥ नाहींचि आम्हांसी वंचिलें । निज गुज अवघेंचि आपुलें ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपावंत । केलें अनाथा सनाथ ॥ ४ ॥

१११८ जिकडे जिकडे भासे रवी । प्रभा नीचनवी सांगातें ॥ १ ॥ तैसें केलें माझें वाचें । तुम्हीं सामर्थ्याचें बोलणें ॥ २ ॥ उजळिल्या दाहीं दिशा । करुनी प्रकाशा निजबोधें ॥ ३ ॥ निळा म्हणे सत्या चाली । वाट दाविली तुम्हीं ते ॥ ४ ॥

१११९ धन्य काळ आजिचा दिवस । हरिचे दास भेटले ॥ १ ॥ दंडवत घालीन पायां । करीन काया कुरवंडी ॥ २ ॥ पाप ताप दैन्य गेलें। येथुनी पाउलें देखतां ॥ ३ ॥ निळा म्हणे पावलों फळ । केलिया निर्मळ सुकृतातें ॥ ४ ॥

११२० धन्य झालों कृपा केली। भेटी दिधली अवचिती ॥ १ ॥ सांभाळिलें तुम्ही संतीं । केल्या आर्ती परिपूर्ण ॥ २ ॥ मी तो दीन तुमचा रंक । घातली भीक अभयाचि ॥ ३ ॥ निळा म्हणे न भेणें आतां । सन्मुख येतां कळिकाळ ॥ ४ ॥

११२१ नव्हती माझे फुकट बोल । जाणे विठ्ठल सत्य मिथ्या ॥ १ ॥ संतकृपेची हे जाती । ओघेंचि चालती अक्षरें ॥ २ ॥ कैंची मती बोलावया । ठायींचि पाया विदित तें ॥ ३ ॥ निळा म्हणे बाहेरी आलें । होतें सांठवलें हृदयीं जें ॥ ४ ॥

११२२ न वजों यावरी आतां कोठें । सांडुनी चरण हे गोमटे ॥ १ ॥ जोडलें तें भाग्ययोगें । येणें काळें संतसंगें ॥ २ ॥ दुभिन्नले वरसोनी वरी । प्रेम अमृताच्या धारीं ॥ ३ ॥ निळा म्हणोनी साठीं । केली जिवें देउनी मिठी ॥ ४ ॥

११२३ निज सायासें जोडुनी । होतें निक्षेपुनी ठेविलें ॥ १ ॥ तेंचि दिधलें माझ्या हातीं । आजीं संतीं कृपादान ॥ २ ॥ कल्पादीचें

पुरातन । जें महा धन परमार्थिक ॥ ३ ॥ निळा म्हणे पोटा आलों । म्हणोनि झालों अधिकारी ॥ ४ ॥

११२४ नेणोनिया आपपर । होतें सुकर निक्षेपींचें ॥ १ ॥ तेणें हातीं धरोनिया । संतीं ठाया पावविलों ॥ २ ॥ विटेवरी दाविलें धन । होतें पोटाळून महर्षी ज्या ॥ ३ ॥ निळा म्हणे बैसला ध्यानीं । ज्याचिये चिंतनीं सदाशिव ॥ ४ ॥

११२५ परम सुखाचा सुकाळ । चित्तीं वसे सर्वही काळ ॥ १ ॥ ऐसें केलें कृपादान । तुम्हीं मनातें मोहून ॥ २ ॥ जिवा पैलाडिये खुणे। पावविलें सामर्थ्यें गुणें ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसे किती । उपकार वानूं पुढतोपुढतीं ॥ ४ ॥

११२६ पूर्ण केला पूर्ण केला । पूर्ण केला मनोरथ ॥ १ ॥ घरा आले घरा आले । घरा आले कृपाळु ॥ २ ॥ सांभाळिलें सांभाळिलें । सांभाळिलें अनाथा ॥ ३ ॥ केला निळा केला निळा केला । केला निळा पावन ॥ ४ ॥

११२७ पूर्वार्जित होतें पुण्य । तेणें हे चरण आतुडलों ॥ १ ॥ आतां सुखा नाहीं उणें । इहलोकीं भोगणें परत्रींचें ॥ २ ॥ ऐशिया सुखा पात्र केलें । तुम्हीं अवलोकिलें कृपादृष्टीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पूर्ण काम । पावलों संभ्रम सुखाचा ॥ ४ ॥

११२८ ब्रम्हानंद मुसावला । अंगीं बाणला आविर्भावो ॥ १ ॥ संतवचनामृतें तृप्ति । झाली विश्रांति इंद्रियां ॥ २ ॥ मन बैसलें ऐक्यासनीं । निश्चळ आसनीं सुखाचिये ॥ ३ ॥ निळा म्हणे लाभ ऐसा । जोडे सरिसा संतसंगें ॥ ४ ॥

११२९ बोलिले शब्द निश्चयाचे । प्रतीति साचे आले ते ॥ १ ॥ माझा मजाचि परिचय झाला । संतीं दाविला हितार्थ ॥ २ ॥ निमिषमात्रें सार्थक केलें । आपुलिये लाविलें निजसेवे ॥३॥ निळा म्हणे उपकार त्याचा। सहस्त्र वाचा न वर्णवे ॥ ४ ॥

११३० भाग्याची उजरी । दिसे यावरी वाढवली ॥ १ ॥ म्हणोनियां कृपावंत । आले संत मायबाप ॥ २ ॥ पाचारुनी देत सोहें । प्रेम

पेंहे पाजिती ॥ ३ ॥ निळा म्हणे सांगती कानीं । माझें मजलागुनी स्वहित ॥ ४ ॥

११३१ भाग्य माझें उभें ठेलें । संतीं दाविलें निधान ॥ १ ॥ आतां उणें कोठें कांहीं । न पडे ठायीं भरलेंसे ॥ २ ॥ जेथें पाहें तेथें आहे । न पाहतांही राहे कवळुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे व्यापुनी अंतरीं । गग नाही बाहेरीं तेंचि दिसे ॥ ४ ॥

११३२ भोळा देव दाखविला । आम्हां केला सन्मुख ॥१ ॥ पंढरिये विटेवरी । उभा द्वारीं पुंडलिका ॥ २ ॥ संतीं केला परोपकार । आम्हां उद्धार दीनांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे जवळी नेलें । हातीं दिलें निरवुनी ॥ ४ ॥

११३३ मज तों सांभाळिलें संतीं । धरिलें हातीं दीन म्हणूनि ॥१॥ सांगतां नये विश्वास लोकां । बाधी अशंका ज्याची त्या ॥ २ ॥ मी तों बोलें त्याचिया सत्ता । पुढें विचारितां कळेल ॥ ३ ॥ निळा म्हणे जुनाट नाणें । नव्हे हें उणें पारखितां ॥ ४ ॥

११३४ मायबाप उत्तीण होणें । न घडे देणें अपत्या ॥ १ ॥ जरी लक्ष जोडी दिली । तरी ते झाली उपाधी ॥ २ ॥ तैसा आत्मा विश्व प्रसवे । तेणें त्या व्हावें उत्तीर्ण कैं ॥ ३ ॥ निळा म्हणे शुद्ध भावें । चरणा जावें लिगटोनी ॥ ४ ॥

११३५ मी तों संतांचें पोसणें । देतां समयीं तेंचि खाणें ॥ १ ॥ अवघी चुकली जाचणी । उण्या पुऱ्याची सोसणी ॥ २ ॥ करूं सांगितलें काज । चिंता दवडूनियां लाज ॥ ३ ॥ निळा म्हणे फिटली खंती । जिणें मरणें त्याचे हातीं ॥ ४ ॥

११३६ मी ज्या बोलिलों निगुती । संतकृपेच्या त्या युक्ती ॥ १ ॥ येरवीं हें काय जाणें । प्रसादाचें करणें त्यांचिया ॥ २ ॥ छाया चित्र नाचवितां । प्रकाशितां दीप त्यासी ॥ ३ ॥ निळा म्हणे माझें कर्म । जाणती वर्म ते संत ॥ ४ ॥

११३७ लेवविले अलंकार । केलें थोर वाढवुनी ॥ १ ॥ आपुली दृष्टी विंमूंपितां । मी तों नेणतां ळळेवाड ॥ २ ॥ गोड घांस मुखीं

भरा । जेवितां पाचारा आवडी ॥ ३ ॥ निळा म्हणे शिकवा बोलों । पुढें चालों आपणा ॥ ४ ॥

११३८ होतें तैसें पाईं केलें निवेदन । अंतरलों दीन बहुत होतों ॥ १ ॥ संबोखून केलें समाधान चित्ता। बोगळूनि भांता प्रेमरस ॥ २ ॥ नाम रत्नमणी करूनी भूषण । अळंकारीं मंडण माळा दिली ॥ ३ ॥ निळा तेणें सुखें झाला निरामय । नामीं नाम सोये निमग्नता ॥ ४ ॥

---

# ढोंगी संत.

११३९ अंधःकारीं प्रकाश दावी । दीप रवीपुढें मिथ्या ॥ १ ॥ तैशीं प्राप्तापुढें ज्ञानें । युक्तीचीं दिनें लेवासे ॥ २ ॥ जिवे मेवे गोडिये निके । परि ते फिके परमामृतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे दाविती भाव । परि ते स्वमेव संत भिन्न ॥ ४ ॥

११४० आणिकांतें उपदेशी । आपण मळिन मानसीं ॥ १ ॥ बोले ते ते धूर्त वादें । लटिक्याचि प्रेमें रडे स्फुंदे ॥ २ ॥ सोंग परमार्थ हा सार । आशा अंतरीं विस्तार ॥ ३ ॥ निळा म्हणे देहाभिमानें । गेलीं भोगिती ते पतनें ॥ ४ ॥

११४१ आतां अभक्त कातर । मळिन जयाचें अंतर ॥ १ ॥ दाऊ नियां वरदळ वेष । मना अंगीं आशापाश ॥ २ ॥ वाचे सात्विक बोलणें। विषयीं वासनेचें ठाणें ॥ ३ ॥ निळा म्हणे घेउनी सोंगें । मिरवे चार करीत उगे ॥ ४ ॥

११४२ ऐसींचि देखिलीं उदंडें । जळो त्यांचीं काळीं तोंडें ॥ १ ॥ मुखें सांगती परमार्थ । स्वार्थ अंतरीं अनर्थ ॥ २ ॥ अनुताप दाविती वैराग्यें । वरी अंतरबाह्य रंगें ॥ ३ ॥ निळा म्हणे उगीची रीति । पडली संसारीं कुंथिता ॥ ४ ॥

११४३ कोण तया लेखी । नाहीं विठ्ठलीं ओळखी ॥ १ ॥ करिती तितकें पोटासाठीं । गाणें नाचणें आटाआटी ॥ २ ॥ कळा दाविती युत्पत्ती । चातुर्य जाणिवेची संपत्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे संतांपुढें । येतां जाणती तीं माकडें ॥ ४ ॥

११४४ बोलणें परमार्थ । अंतरीं अनर्थ ॥ १ ॥ काय करूं ते व्युत्पत्ती । बहुरुप्याची संपत्ती ॥ २ ॥ रसाळ कवेसी बोलणें । माळा मुद्रांजीं भूषणें ॥ ३ ॥ निळा म्हणे गेलीं । वाया न भजतां विठ्ठलीं ॥ ४ ॥

११४५ प्रत्यक्ष जनीं जनार्दन । नेणोनियां कैचें ज्ञान ॥ १ ॥ काय तैसीं ते वाचाळें । करिती चावटी तोंडबळें ॥ २ ॥ नाहीं अंगीं हरिची भक्ति । दाविती कोरडीच विरक्ति ॥ ३ ॥ निळा म्हणे नेणतां वर्म । केलें पाठीं लागे कर्म ॥ ४ ॥

११४६ सोंवळ्या नांव क्षीरसागर । वृथाचि मांजर गाजरीं ॥ १ ॥ काय तैसा तें वायाणें । लटिकीच भूषणें मिरविती ॥ २ ॥ शुभा नांवें विकती शेणी । मृगजळ पाणी काय खरें ॥ ३ ॥ निळा म्हणे पाखांड करिती । जगीं म्हणविती गोसावी ॥ ४ ॥

## गौळणी.

११४७ आमुचा जिवलग सांगाती । जन्मोजन्मींचा हा श्रीपती ॥ एकीसवें एकी बोलती । आणि आळंगिती हृदयेंसी ॥ १ ॥ नाना परींच्या विनोदवार्ता । सांगती बोलविती अनंता ॥ तुझेनि भाग्यें भाग्यवंता । म्हणती आम्ही संसारी ॥ २ ॥ कृष्णा आत्मया सुखानंदा । परात्परा जी आनंदकंदा ॥ नित्या अचिंत्या अभेद्या । देवत्रया तूं वंद्य ॥ ३ ॥ ऐसा असोनिया आम्हां आरना । खेळणें झालासी आजिच्या काजा ॥ धन्य आम्हींही गरुडध्वजा । तुझे पादपद्म देखतों ॥ ४ ॥ आणिखीही एक नवल थोर । परमात्मा तूं परात्पर ॥ आम्हांलागी रूप साकार । आवडी ऐसेंचि धरियलें ॥ ५ ॥ कृष्णा ह्मणोनियां पाचारितां । वो म्हणोनिया येसी धांवतां ॥ येरवी वेदाचियाही संमता । उरविसी रूप निर्धारीं ॥ ६ ॥ निळा म्हणे ऐसिया प्रेमें । अनुसरल्या त्या भक्तिसंभ्रमें ॥ तेसोंचि जाणोनियां त्या परब्रम्हें । पुरविले त्यांचे सोहळे ॥ ७ ॥

११४८ आम्ही लेंकुरें लळेवाडें । तुमचीं तैसीं त्याहि पुढें ॥ क्रीडा करूनी वाडे कोडें । येऊं भेटोनियां वोरसें ॥ १ ॥ नाहीं तया पोटीं मैल । अत्यादरें घाडिलें असे मूळ ॥ अक्रूर सांगताहे केवळ । भेटी

आमुची इच्छितो ॥ २ ॥ तुम्ही कां धरावा संशय । तेथें आम्हां नाहीं भय ॥ मामा भेटी जातां काय । उद्वेग वाटे माचिया ॥ ३ ॥ ते म्हणती रे नव्हे कृष्णा । तुम्हीं त्याच्या कार्यार्थ जाणा ॥ कालिचि पहा पां पूतना । आली होती घातावया ॥ ४ ॥ केवढी दाउनियां माया । बैसली तूतें स्तन द्यावया ॥ कृष्ण म्हणे मी धाळों तिचिया । स्तनपानेंची आजिवरी ॥ ५ ॥ तिणें वेंचोनियां कायाशक्ती । आम्हांसि तोषविलें प्राणांतीं ॥ उपकार तिचेहि श्रीपती । म्हणे मुखें मी काय वानूं ॥ ६ ॥ निळा म्हणे बोलोनि ऐसें । न रहातांचि चालिले उद्देशें ॥ गोपिका गौळणिही ऐकोनि ऐसें । आल्या धांवत हरिपाशीं ॥ ७ ॥

११४९. एक ना दुसरें वो नव्हतें मजपाशीं । मी मज नोळखतां आप आपणासी ॥ होतें ये निर्जनीं वो निराभास देशीं । नेणों कोणें आणियेलें कर्म भूमिसी ॥ १ ॥ तैंच पाहुनियां विसरलें निजसुखा । वाटे जीव माझाचि परि मज वो पारिखा ॥ देखोनि आपपर पात्र जालें बहु दुःखा । सांगों कोणापाशीं स्वयें जाला ऐसा वाखा वो ॥ २ ॥ मी मज माझियानि वेढाळिलें बाई । चिंतासि या चित्तनें वो घातलें प्रवाहीं ॥ नेणेंचि विश्रांति कोठें विचरतां मही । जेथुनियां आलिये ते नाठवेचि कांहीं वो ॥ ३ ॥ नसतींचि काम क्रोध लागले हे वैरी । येउनियां आशा चिंता बैसल्या जिव्हारी ॥ द्वेष निंदेचिया नित्य नाना परोपरी । कामना कल्पना ह्या दाटल्या शरीरीं वो ॥ ४ ॥ किती तरी करूं वो या संसारा फुरवणी । किती सोसूं येऊं जाऊं यमाची जाचणी ॥ ५ ॥ किती येऊं जाऊं भोगूं नानायातिचिया खाणी । किती गर्भवासी बैसो थोर अडचणि वो ॥ ६ ॥ ऐसि जाजावलि बहु अनुतापें बाळा । घेउनियां विकृतिया विषयाचा कंटाळा ॥ मनोभावें चिंतिला बा श्रीरंग सांवळा । पावलीं निजस्थान पुनरपि म्हणे निळा वो ॥ ७ ॥

११५० एकली एक दुजी होती ये सदनीं । तव आईकिली मुरलीची ध्वनी ॥ गेलें धांवोनियां पाहावया लोचनीं । तव गोळिये देहभाव विसरोनी ॥ १ ॥ हरि देखतांची मदनाचा पुतळा । मेला जडोनियां बैसला तो डोळा ॥ मनीं आठवे साजणी वेळोवेळा । नेल्या सोडुनी माझिया जीवनकळा वो ॥ २ ॥ नव्हतें प्रवर्ली दुसरें कार्य कोण्ही । नको जाऊं

ऐसें सांगावया लागुनी ॥ नेईल जीवभाव सर्व हा हरूनी । मग पडसि तूं याचेचि व्यसनीं वो ॥ ३ ॥ ऐसि जाजावोनि बोले सखियाप्रती । येरि टकमका पाहोनि हांसती ॥ म्हणती जाणोनियां होसि कां नेणती । भाग्य लाधलिसी धरुनी राहे चित्तीं वो ॥ ४ ॥ आजि तुझिया भाग्यासी नाहीं पार । झाला परिचय पाहीला सारंगधर ॥ ज्यालागीं शिणति हे योगि मुनेश्वर । तोचि तुझे हृदयींचा परात्पर वो ॥ ५ ॥ निळा म्हणे आजि दैवासि ही दैव । आलें मोडोनि वैभवा वैभव ॥ सकळहि सुखाचीच जोडली राणिव । देखिला यदुपति निजलावण्याची ठेव वो ॥ ६ ॥

११५१ एकलें न कंठवे याविण मज आतां । घेउनि विचरेन सर्व प्राणनाथा ॥ जनिं वनिं वो एकांतिं वसतां । न करि वेगळा हो युगें कल्प जातां वो ॥ १ ॥ हातीं लागला वो युगादिचा निध । भाग्यें माझिया वो जोडियला सिद्ध ॥ करुनि उपचार पूजिन सावध । न वंचिं शरीर सेविन एकविध वो ॥ २ ॥ याचिये संगतीं वो सुखाचिया कोडी । वेचतां युगें कल्प मज वाटे घडी ॥ भोगीन नित्य नवा जीवाचे आवडी । भरुनि निज दृष्टि पाहेन घडि घडि वो ॥ ३ ॥ अवघे निवेदिन अंतरिंचे भोग । यासि करुनियां सये अंगसंग ॥ कांहीं न वंचिता मन बुद्धि अंग । भोगिन निजसेजे घेऊनि श्रीरंग वो ॥ ४ ॥ त्यागें जीवाचिया घालिन यासि मिठी । जातां युगसंख्या कल्पाचिया कोटी ॥ धरिन अंतरिं वो बांधोनियां गांठीं । यावरि न करिं मी कदा यासि तुटि वो ॥ ५ ॥ कळे अंतरींचा भाव या परेशा । होय प्रियवादें जैसा केला तैसा ॥ पुरवी निजदासीं केला जो धिवसा । निळा म्हणे आहे कृपावंत ऐसा वो ॥ ६ ॥

११५२. ऐक्यिं ऐकपणाचा घेउनियां त्रास । जाला नानाकार स्वरूपें बहुवस ॥ म्हणोनि दुसरेंचि नाढळे वो यास । जयातयामाजी याचाचि रहिवासवो ॥ १ ॥ ऐसे निजआत्मया जाणोनि गोविंदा । जीवें अनुसरल्या सकळाही प्रमादा ॥ करिती सेवावृत्ति निशिदिनी संदीं । हसती रुसती करिती विनोदा वो ॥ २ ॥ सर्वसाक्षी सर्वही जाणता । सर्व करुनियां म्हणवि अकर्ता ॥ जीवीं जीवाचा हा आप्तचि सर्वथा । जेथें तेथें याची नित्य ऐक्यात्मता वो ॥ ३ ॥ नित्य अंगसंगें भोग त्यासि देति । दृष्टि अवलोकुनि गुण त्याचे गाती ॥ नेउनि ऐकांति वो निजगुज बोलती ।

करिती काम धाम परि त्याचि पासी वृत्ती वो ॥ ४ ॥ सासु सासुरिया भ्रतारासी चोरी । नणंदा जावा त्याही त्यजूनियां वरीं ॥ देती आलिंगन निजात्मया हरी । येथुनि म्हणति संसारा बाहिरी वो ॥ ५ ॥ ऐशा निळा म्हणे झाल्या हरिरता । त्या त्या विराजति मुक्तिचीया माथा ॥ नानासा धनाच्या लाजउनि चळथा । जाल्या असोनि संसारिं नित्यमुक्ता वो ॥६॥

११५३ एकिं येकटेचि असोनि एकला । विश्वीं विश्वाकार होउनियां ठेला ॥ जयापरी वो तैसाचि गमला । नंदनंदन हा अन्वोज आंबुला वो ॥ ॥ १ ॥ ऐशा गौळणी त्या बोलति परस्परीं । करूनि विस्मय आपुल्या अंतरीं ॥ विश्वलाघवीया हाचिं चराचरीं । नेणो महिमा यासीं म्हणो व्यभिचारी वो ॥ २ ॥ गिरि गोवर्धन येणें उचलिला । काळिया महासर्प नाथुनि आणिला ॥ जळतं वनवा वो मुखेंचि प्राशीला । गिळीता आघासुर चीरुनि सांडीला वो ॥ ३ ॥ कपट्या माभळभटा दिल्हें पिंडे दान । शोंषिली पुतना विषें पाजितांचि स्तन ॥ उखळिं बांधतां उपटिले विमळार्जुन । भक्षुनि मृतिका वदनीं दाविलीं भुवनें वो ॥ ४ ॥ आणिखीं एक येणें नवलावो केला । काला वांटितां वो विधाता ठकवीला ॥ भाग नेदितां तो वत्सें गोवळ घेउनि गेला । तैसिच आपण येथें होउनियां ठेला वो ॥ ५ ॥ इंद्र चंद्र महेंद्र यातेंचि पूजीती । श्रुति शास्त्रें तेही यातेंचि स्तविती । माहासिद्ध मुनि ध्यानिं आराधीती । निळा म्हणे तो हा जोडला सांगाती वो ॥ ६ ॥

११५४ एकी म्हणे हरि आमुचा शेजारी । दुजी म्हणे दुरी मित्र माझा ॥ १ ॥ तिजी म्हणे सखा आमुचा जिवलग । चौथी म्हणे निःसंग सदांचा हा ॥ २ ॥ एकी म्हणे कुमारि देउनि आणिला । एकी म्हणे जन्मला यशोदे पोटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे एकमेकां न मिळती । पुराणें भांडती तैशापरी ॥ ४ ॥

११५५ एकी म्हणती हरि आमुचा सोयरा । दुजी म्हणे घरा पुसों जाई ॥ १ ॥ तिजी म्हणे काली आणिला पोसणा । चौथी म्हणे तान्हा यशोदेचा कीं ॥ २ ॥ एकी म्हणे माझा नोवरा साजणी । एकी म्हणे बहिणी पाठीची मी ॥ ३ ॥ निळा म्हणे एकी म्हणती आमुचा पिता । एकी म्हणे चुलता सखा माझा ॥ ४ ॥

११५६ एकी म्हणती हा आमुचा सांगाती । दुजी म्हणे परती भाऊ माझा ॥ १ ॥ तिजी म्हणे हरि आमुचा मेहुणा । चौथी म्हणे पैसुन्या देखसी झणे ॥ २ ॥ एकि म्हणती हा आमुचा गोवळ । साहावी म्हणे बाळ नंदाचा कीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जैशा श्रुती वेवादती । तैशा या भांडती परस्परें ॥ ४ ॥

११५७ करितां तयां काम धाम । तमाळ श्याम ध्यानीं मनीं ॥१॥ तेणें पावल्या आनंदा । वेधीं गोविंदा वेधलिया ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ती आंत । नेणति मात आणिकांची ॥ ३ ॥ निळा म्हणे अहोरात्रीं । देखती नेत्रीं तेचि रूप ॥ ४ ॥

११५८ काल्हि माजुम घेतला होता । गडियांसवें म्यां नेणतां । तेणेंचि आजि माझिया चित्ता । झाला विभ्रम ऐशापरी ॥ १ ॥ न यें सोडाल आजि तरी । तुमचे घरीं न करीं चोरी । मस्तक ठेवितों पायांवरी । करा उपकार आजि मज ॥२॥ एकी म्हणती विश्वास नाहीं । याचिया शब्दाचा वो कांहीं । आजि सोडितां हा उद्यांही । ऐसेंचि करील येउनी ॥ ३ ॥ अवघाचि चोरुनी गोरस । नित्य खातो सावकाश ॥ आमुचे घरीं नुरवी लेश । पहा माणसें रोडेलीं ॥ ४ ॥ आपुलिये हा सुटिकेसाठीं । उदंड सांगेल ऐशिया गोष्टी ॥ परि निष्ठुर आणि कपटी । या ऐसा नाहीं भूमंडळीं ॥ ५ ॥ आतां यासी न्यावें तेथें । यशोदा दावावें निरुतें ॥ तियेसि सत्य वाटत नव्हतें । फेडावा संदेह तियेचा ॥ ६ ॥ निळा म्हणे मग बांधोनी गळा । घुलकाविती अवघ्या बाळा ॥ गाळी वोपुनियां सकळा । आणिला धरुनी यशोदेपें ॥ ७ ॥

११५९ कांहिंच नहोनिया कांहीं येक होता । नामारुपातीत आपण नेणता ॥ होण्यानहोण्याच्या नेणोनिया वार्ता । त्याचा संकल्पचि झाला त्या प्रसवता वो ॥ १ ॥ ऐशा परि हा मूर्तिमंत झाला । विश्वि विश्वाकार होउनिया ठेला ॥ भाग्यें आमुचिया मुर्ती मुसावला । गाऊं वानूं ऐसा आम्हासी फावला वो ॥ २ ॥ नव्हे ते पुरुष ना नारी पण जेथें शून्या निशून्याहि पैलाडी परते ॥ नाकळे नाद बिंदु काळा ना ज्योति तें । परा पश्यंतींचा प्रवेश नाहीं जेथें वो ॥ ३ ॥ गुणलावण्याची उघडली खाणी । मांडित चतुर्भूज मुगुट माळा मणी । मुख मनोहर कुंडलें श्रवणीं । श्रीव-

त्सलांछन हृदयीं साजणी वो ॥ ४ ॥ ध्यागे उचलुनि जाऊं निजघरा। आजि फावला तो पाहों यदुवीरा ॥ खेळों आदरें या खेळवूं सुंदरा। याच्यासंगें नाहीं सुखा पारावारा वो ॥ ५ ॥ निळा म्हणे ऐशा संवादति सुंदरी। करिती क्रीडा सवें घेऊनि मुरारी ॥ सुखी सुखरूप झाल्या कल्पवरी। पुन्हा न येती त्या फिरोनि संसारीं वो ॥ ६ ॥

११६० कृष्णरूपा वेधल्या नारी। देखती अंतरीं तेंचि रूप ॥ १ ॥ गमनीं शयनीं आसनीं भोजनीं। देखती जनीं वनीं दृष्टीपुढें ॥ २ ॥ एकांतीं लोकांतीं घरीं दारीं बाहेरी। त्याविण निजाचारी नेणती दुजें ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वहि त्याचा परिवार। होवोनी सारंगधर ठेला घरीं ॥ ४ ॥

११६१ खेळिं खेळता वो विकळ सुंदरा। जालि आठविता नंदाच्या कुमारा ॥ स्वेद कंपखेद हाटला शरिरा। जाला विरह तो नेणती ईतरवो ॥ १ ॥ धरा आवरुनी म्हणाति वोसाजणी। धिर न धरत पडीलि धरणी ॥ येकि सांगति वोजालि झडपणी। वेगि आणा आतां पंचाक्षरी गुणीवो ॥ २ ॥ जातो प्राण वो येताति लहरे। येकी म्हणतिवो डंखिली विखारें ॥ आंग तापलें वो येतु आसे शियारे। येकि म्हणति वो मोडासि येचाभेंरं वो ॥ ३ ॥ येकि म्हणति गे लागलें दैवत। कुळिचें दारुणा वो नेदि करुनि मान ॥ घाला गोंधळ वो विनवा समस्त। ठेवा आण भाक करूनि येकचित्त वो ॥ ४ ॥ ऐसा मिळाला वो भोंवताला पाळा। होति चुकुर येकी रडताती बाळा ॥ पाजा वो खेंदें वो वांचवा ल्हाळा। नका उशिर गे थांबा उतावेळा वो ॥ ५ ॥ मग ते येकांतिची सांगें सखियासी। नका बाहेरि वो फुटो कोणापाशीं। आणा नंदाचा नंदनु येकांतासी। निळ्या स्वामिची हे भावना निश्चयेसी वो ॥ ४ ॥

११६२ दिसे सगुण हा स्वरूप सुंदर। परि व्यापूनियां ठेला चराचर ॥ देवदानवादि मानव असुर। याविण उरला ऐसा नाहीं तृणांकुर वो ॥ १ ॥ ऐशा गौळणी त्या अनुवाद करिती। ज्या ज्या रंगलिया याच्या अनुवृत्ती। रजनीं दिवो जयां याचीचि संगती ॥ त्या त्या स्वानुभवें आपुल्या बोलती वो ॥ २ ॥ महि अंबु तेज मारुत गगन। जगा बीज रूप हाचि वो लपोन ॥ महन्मायेचें हा अनादि कारण। देवत्रयाशि हा मूळ

अधिष्ठान हो ॥ ३ ॥ एकानेक झाला आपुल्याचि गुणीं । उरला भरोनियां चाऱ्ही वाणी खाणी ॥ जया परि हा तैसाचि साजणी । रूपें गुणें क्रिया मांडित भूषणीं वो ॥ ४ ॥ भुवनें चतुर्दश तींहि याच्या पोटीं । स्वर्गीं एकविसाहि आदि हा शेवटीं ॥ होण्या न होण्याचा नेणोनियां गोठी । आपीं आपणाचि एकट एकटी ॥ ५ ॥ निळा म्हणे आम्ही नेणोनि अबळा । हासों रुसों यासी करूं गदरोळा ॥ खेळतां खेळ यासी भांडों वेळोवेळां । केले अपराध ते मागों या गोपाळा वो ॥ ६ ॥

११६३ देखोनी तें यशोदा ऐकोनि गोठी । क्रोधें संतप्त झाली पोटीं ॥ म्हणे हा चोरिया करितां महा हाटीं । न राहेचि मी काय करूं ॥ १ ॥ कितीं तरी हे अपवाद । सोसूं जनाचे वेवाद ॥ उदंड सांगताहि हा गोविंद । न सांडीचि खोडी आपुली ॥ २ ॥ मग म्हणे तूं गोपाळा । न सांडिशीचि आपुला चाळा ॥ शिक्षा लावीन याचि वेळां । मग तूं शहाणा होशील ॥ ३ ॥ यावरी नेदीं घरांत येऊं । तुजला न घालीं खाऊं जेऊं ॥ तुझिया खोडी माझा जिऊ । बहुत विंतला या काळें ॥ ४ ॥ मग लाऊनियां दावें गळां । नेऊनि बांधला त्या उखळा ॥ म्हणे न संडितां ऐसा चाळा । तुज सर्वथा न सोडीं ॥ ५ ॥ हांसती भोंवत्या अवघ्या नारी । म्हणती करिशील आतां चोरी ॥ नासिलें खादलें तें आजिवरी । फावलें ऐसें म्हणो नको ॥ ६ ॥ यावरी येशी आमुच्या घरां । चोरिये जरी दधीक्षीरा ॥ तरी नेऊनियां कौंसासुरा । हातीं देऊं तुजलागीं ॥ ७ ॥ ऐसें बोलोनियां सुंदरा । गेल्या आपुलालिया मंदिरां ॥ यशोदा म्हणे रे चक्रधरा । घरीं काय उणें तुज ॥ ८ ॥ निळा म्हणे बोले हरी । गोड न लागेचि तें निर्धारीं । चोरियेचेंचि आवडे भारी । करीन याहिवरी चोरिया ॥ ९ ॥

११६४ देतां आलिंगन नंदाच्या कुमरा । पडेल उतार हे वांचले सुंदरा ॥ नका आड घालूं संदेह दुसरा । लावा उठवूनि जाऊं द्या इतरां वो ॥ १ ॥ ऐसे बोलती त्या जीवींच्या जिवलगा । झाला विरह गे वांचवा सुभगा ॥ आणा पाचारुनी गे एकांता श्रीरंगा । दुजा उपावोचि नचले या प्रसंगा वो ॥ २ ॥ आहे ठाउकें हें अंतरीं आम्हांसी । याचा वेध झाल्या दशाचि हे ऐसी ॥ होते आटणी गे जिवा आणि

शिवासी । तेथें देहबुद्धी नाठवे देहासी वो ॥ ३ ॥ हृदयीं होतांचि या कामाचा संसार । न्यावा एकांतासि निष्काम यदुवीर ॥ देईल सुख तोचि नाहीं ज्यासि पार । सांडा चावटी आणिक विचार वो ॥ ४ ॥ नाहीं अनुभव हा ठाउका जयासी । त्याचि भोगिती या अनुदिनीं दुःखासी ॥ येती जाति पुन्हा होति कासाविसी । आम्ही न विसंबों या सावळ्या कृष्णासी वो ॥ ५ ॥ नाहीं जीवीं या जीविताचि चाड । याच्या संगसुखें घालूं वो धुमाड । स्वामी निळ्याचा पुरवील कोड । आणा तोचि आतां सांडा बडबड वो ॥ ६ ॥

११६५ नित्य श्रीहरीचे आठवितें गुण । वदनीं त्याचिया वो नामाचें स्मरण ॥ हृदयीं धरूनियां निजभावें चरण । करितें आनुदिनीं हेंचि अनुष्ठान वो ॥ १ ॥ येथें आलियें वो याचि निजकार्या । केलीं कर्में तीं मागील भोगाया ॥ आतां घडतीं तीं यातें समर्पाया । नाहीं भय त्या निजस्थाना जावया वो ॥ २ ॥ वाचे असत्याचा नेदी लागों वारा । केलें सांडणें वो देह संसारा ॥ चित्तीं विषयाचा मोडियला थारा । नाहीं गुंतलें या दंभ अहंकारा वो ॥ ३ ॥ संतीं सांगितलें केलें तें जतन । नाहीं आज्ञे त्याचें केलें उल्लंघन ॥ मतमतांतरां नाहीं दिल्हें मन । हृदयीं धारिलें या हरीचें चिंतन वो ॥ ४ ॥ कांहीं ठाकलें तें केलें लोकहित । काया वाचा वो हें वेंचूनीयां चित्त ॥ नाहीं वंचूनिया ठेविलें संचित । काळयाचि परि सारियेला वो ॥५॥ नित्य नवा वो हा आवडीचा दिवस । केला करूनियां कीर्तनीं उल्हास । नाहीं गोवियेला कोठें आशापाश । निळा म्हणे वर्तोनि उदास वो ॥ ६ ॥

११६६ नित्यानंदा पुढे आनंद तो कोण । विषयसुख बाई बापुडे ते क्षीण ॥ जेथें न सरेची वैकुंठसदन । शेषशार्या वो त्रिकूटभुवन वो ॥१॥ नेघो म्हणोनिया त्यागिती परातें । घेऊं संगसुख हरीच्या सांगातें ॥ गाऊं वानूं रूप पाहोनि निरुतें । हांसों खेळों ठायीं जेववूं सांगातें वो ॥ २ ॥ नेघो समाधीचे सुख तुच्छ वाटे । नित्यानित्याचिये न पडों खटपटे ॥ काय करूं ते तपाचे बोभाट । एका हरिविण अवघें तें फलकट वो ॥ ३ ॥ काय जाऊनियां करूं निजधामा । तेथें मी नातुडें नाढळे विश्रामा । येथें मांडुनियां तमालमेघःशामा । नेघो नाईका आणिका दुर्गमा वो ॥ ४ ॥

स्वर्गभोग ते हीन लागती असार । क्षणें होती जाती क्षणेंचि नैश्वर ॥ येथें हरिसंगें क्रीडों निरंतर । सर्वही सुखांचें हा जोडला आगर वो ॥ ५ ॥ निळा म्हणे नित्य निःसीम स्वानुभवें । ऐशा गोपिका त्या रंगल्या हरीसवें ॥ अधिकाधिक हें प्रेम त्यांचें नवें । जाणोनि आवडी ते पुरविली देवें वो ॥ ६ ॥

११६७ मग त्यां मिळोनिया सकळ जनीं । मध्यें बैसवूनियां शारंगपाणी ॥ भोंवत्या खेळविती खेळणीं । नाचती नाचणीं गीतस्वरें ॥ १ ॥ कृष्णा म्हणोनियां आळविती । मधुर स्वरें गायनें गाती ॥ तेणेंचि मिसें त्या कृष्णासि स्ताविती । आणि रंजविती परमात्मया ॥ २ ॥ म्हणती गे नंदयशोदेचें पुण्य । उरलें त्रैलोक्या पुरोन ॥ आम्हां झालें तें सुप्रसन्न । कृष्णाकृती या काळें ॥ ३ ॥ म्हणोनियां जिवेंप्राणें । ओंवाळिती तनुमनें घालुनियां दिव्यासनें । वरी कृष्णातें बैसविती ॥ ४ ॥ करूनियां आनंद सोहळा । खेळती नानापरीच्या खेळा ॥ लई लई लखोटे पिंगे सकळा । फुगड्या घालिती निज बोरें ॥ ५ ॥ हेटी मेटी कपाळ झेटी । पक्कें घालिती नमन ल्लाटीं ॥ टोकर खडेही झेलिती बेटी । नाचती टिपरी घेऊनियां ॥ ॥ ६ ॥ निळा म्हणे ऐशियापरी । रंजविती जगदात्मयाहरी ॥ आणि घेऊनियां अंकावरी । क्रीडा विनोदें खेळविती ॥ ७ ॥

११६८ मी मज माझें यानी केली वो निरस । वीण आपणा येणें आणियेला त्रास ॥ नेदी आड येऊं दुजियाचा आभास । कैसें काय करूं सांगा मज यास वो ॥ १ ॥ ऐसें जाजावोनी बोले एक नारी । हरीचा सुखानंद भरुनी अंतरीं ॥ लटिकाची वालभाचा भाव लोकाचारीं । दाऊनि एकांतीं हरिसी काम सारी वो ॥ २ ॥ म्हणे वृत्ति माझी नुरे देहावरी । क्षणही न कंठे वो सासुरामाहेरीं ॥ काय करूं मी वो नगमे घरदारीं । नेऊनी घाला जेथें अनंग मुरारी वो ॥ ३ ॥ यावरी गेलें आतां माझें माणुसपण । करितां उपचार ते हरिती माझे प्राण । गेलें होऊनियां होतें तें निर्माण । सोडा आस माझी द्या वो मोकलून वो ॥ ४ ॥ ऐशी देहगेहीं होऊनि उदास । गेले तुटोनियां अवघे आशापाश ॥ निद्रा । जागृती ना स्वप्नाचा आभास । एक लागला त्या हरीचा निजध्यास वो ॥ ५ ॥ निळा म्हणे नेणें आपपर दुसरें । भरली निजानंदी न पाहे माघारें कैचें येईल तेथें अविद्येचें वारें । झालें हृदयीं स्वानुभव चेईरें वो ॥ ६ ॥

११६९ म्हणती कृष्ण आवडे कैसा । जीवप्राण कापटिये जैसा । एकी म्हणती गे हा मानसा । भुलवणाचि सुंदरपणें ॥ १ ॥ यातें पाहों जातां दिठी । पहाते पाहाणेंचि नुरे शेवटीं ॥ संचरोनियां हा पाठीपोटीं । करी आपणासारिखें ॥ २ ॥ वेधूचि लावियला मना । येणें गोविलें वो लोचना ॥ आमुच्या चित्ताचिया वासना । येणेंचि हिरोनियां घेतल्या॥३॥ वाटे तयासीचि परिचार । करुनी असावें निरंतर ॥ क्षणहि एक न व्हावा दूर । माया माहेर आमुचा हा ॥ ४ ॥ विनोद चर्चा याशींच करणें । आवडे कृष्णाशीं बोलणें ॥ याविण दुजें नावडे मनें । हाचि पढियें सर्वस्व ॥ ५ ॥ न पडो याविण दुजें दृष्टी । नावडो याविण आणिकी गोष्टी ॥ विश्वआधि हा शेवटीं । पहावा पोटीं हेचि अवस्था ॥ ६ ॥ निळा म्हणे ऐशीं कृष्णें । हिरोनी घेतलियाचि मनें ॥ मग या राजीवलोचनें । मांडिलीं विंदानें आणिकीही ॥ ७ ॥

११७० म्हणती नको नको जाऊं हरी । सांडोनी आम्हां कोठें दुरी । तुजवाचोनियां संसारीं कोण आम्हां जिवलग ॥१॥ जातील प्राण तुतें जातां । वियोग न साहावे ते व्यथा । पळमातीच वेगळे पाहतां । जेवि कां मासोळी जळांतील ॥ २ ॥ नव्हे अक्रुर हा ढीवर । करूं आला येथें संहार । जीवन नेलिया यदुवीर । आम्हां सहजचि प्राणांतु ॥ ३ ॥ इतुक्यांचिही येईल हत्या । जरि तूं कृष्णा नेसील आतां । ऐसें बोलोनिया समस्ता । लोळती कृष्ण चरणावरी ॥ ४ ॥ वधुनी आम्हां आपुल्या हातें । जाई मग तूं जाणें तेथें । करूनियां दीर्घ रुदनातें । उकसाबुकसी स्फुंदती ॥५॥ आमुचा जीव तुंचि प्राण । तुजविण न वाचो तुझीचि आण । नको आमुचे हें निर्वाण । पाहो आपुले निज नेत्रीं ॥ ६ ॥ निळा म्हणे यावरी हरी । शांतवी तया निज उत्तरीं । म्हणे आम्ही वरावरी । येऊं भेटोनी मामासी ॥ ७ ॥

११७१ याच्या संगसुखें गर्भवास घेतां । येत जात गे कल्पाच्या चथळा । नेत्रीं भुक्ति मुक्ति देतां सायुज्यता । ऐशा गोपी त्या सुखानंद भरिता वो ॥ १ ॥ धन्य प्रेमळा त्या रंगल्या श्रीरंगीं । नेणती दुसरें वो संसारीं विरागी । हरिचीं भूषणें त्या लेऊनि निजांगीं । सुखी सुखरूप भोगी नित्य त्यागी वो ॥ २ ॥ याच्या सहवासें भोगित निज भोग । भोगी भोगातीना सर्वदा निःसंग । नयेनि दृश्यावरी देखतीहि जग ।

ऐशा विचरनी होऊनि अनंग वो ॥ ३ ॥ नित्य जागवनीं हरीतें देखतीं । हरीचि होऊनियां हरीतें भजती । हरिरूप झाली त्यांची अंगकांति । हरि-चि ध्यानीं मुसावला मनीं चित्तीं वो ॥४॥ येती जाती त्या हरीच्या सांगातें । वसती नित्य काळ हरि वसे जेथें । करिती भोजन त्यां जेववितां हरितें । हरीविण त्या न भेती जीवनातें वो ॥ ५ ॥ निळा म्हणे तया हरीच सांगाती । त्याहि वर्तताती हरीच्या अनुवृती । नाहीं उरविली दोनीपणें खंता । वसती एकएकीं निजात्मता युक्ती वो ॥ ६ ॥

११७२ यावरी गौळणी सुंदरी । नेऊनियां निजमंदिरीं ॥ खेळाविती परमात्मयां श्रीहरी । नाना उपचारीं पूजिती ॥ १ ॥ देऊनियां चंदनउटी । केशरी टिळक लाविती ल्लाटीं ॥ नाना सुमनहार कंठीं । घालिती बरवंटी श्रीकृष्णा ॥ २ ॥ गुंफुनी सुमनटोप शिरीं । विचित्र तुरे खोंविती वरी ॥ लेववुनियां दिव्य अळंकारीं । वस्त्रें परिधानें गौराविती ॥ ३ ॥ एकी जाणाविती विंजणवारा । एकी चवरी विंजती सुंदरा ॥ ह्मणती वो नंदकुमरा । दासी आम्ही तुमचिया ॥ ४ ॥ शर्करा घृत परिपक्क लाडू । नाना स्वाद फळांचे घडू ॥ आणुनियां करिती सुरवाडू । कृष्ण वदनीं समर्पिती ॥ ५ ॥ एकी उचलुयां कडिये घेती । एकी खांदिये बैसाविती ॥ एकी हृदयींचि आळंगिती । चुंबन देती पैं एकी ॥ ६ ॥ निळा म्हणे परब्रम्ह सेजे । आवडीं घेऊनी निजती निजें ॥ ऐशिया सुखाचीं नाचती भोजें । परमात्मा आप्त झालिया ॥ ७ ॥

११७३ येऊनि जाऊनि करि गौळणीचे काडे । पुरवूनि सकळाहि अंतरींची चाड । नेदी प्रेम त्यांचें खंडो करी वाड । ऐसा कृपाळू हा सुखा चा सुरवाड वो ॥ १ ॥ धन्य भाग्याच्या त्या जन्मल्या संसारीं । ज्यांचि ध्यानीं मनीं नित्य काळ हरी । करितां काम काज दृष्टी त्याचि वरी । बोलतां चालतां जेवितां निरंतरीं वो ॥ २ ॥ त्यांचा विकिला ऐसा रावें त्यांच्या घरीं । पडिलें काम काज तेंहि आपण करी । नवचे पळभरी त्या सांडु-नियां दुरी । त्यांची न लाजेचि म्हणवितां कामारी वो ॥३॥ त्यांचा येवजा व सासुरें माहेर । झाला आपणाचि लेणें आलंकार । अवघें धन वित्त गोत परिचार । झाला नाम रूप दीर भावे वर वो ॥ ४ ॥ नेदी उरो त्या आणिक दुसरें । विण आपण वो सोयरे धायरे । गाई म्हैशी

पोटींची लेंकुरें । झाला घर दार त्यांचें एकसरें वो ॥ ५ ॥ खाती जेविती ते भोग सकळही । झाला आपणचि संचरोनी देही । नेदी आपपर ऐसें दिसों कांहीं । निळा म्हणे ऐसी ऐक्याची नवाई वो ॥ ६ ॥

११७४ येकलें न कंठेचि म्हणोनियां येणें । केलीं निर्माणें वो चौदाही भुवनें ॥ गगन चंद्र सूर्य मेघ तारांगणें । पांचही महा भूतें भौतिकें भिन्नें भिन्नें वो ॥ १ ॥ ऐसा लाघविया माया सूत्रधारी । येकला येकटाचि झाला नानाकारी ॥ स्थूळ सूक्ष्म जीव जीवाचे अंतरीं । तो हा नंदनंदन सये बाळब्रम्हचारी वो ॥ २ ॥ याचिये नाभिकमळीं जन्म चतुरानना । याचिया निजप्रभा प्रकाश रविकिरणा ॥ याचिया महातेजें तेज हुताशना । येणेंचि पढवुनि वेद केला ब्राह्मणा वो ॥ ३ ॥ याचिया द्रावणें समुद्रासी जळ । याचियां चपळाणें पवन हा चंचळ ॥ याचिया अवकाशें आकाश पघळ । याचिया धृतिबळें अवनी हि अढळ वो ॥ ४ ॥ येणेंचि मेरुस्तंभ अचळ धरियेला । दिशादिग्पाळांसी येणेंचि ठाव दिधला । विधिविधानाचा शास्त्रा बोध केला । येणेंचि सुरपति स्वर्गीं बैसविला वो ॥५॥ भोगूनि अंगना हा बाळ ब्रम्हचारी । येकला जेथें तेथें सोळा सहस्त्रा घरीं ॥ आम्हां तुम्हां भोगूनि अलिप्त मुरारी । निळा म्हणे ऐसा विवादति नारी वो ॥ ६ ॥

११७५ येणें एकलें वो जाणेंही शेवटीं । येथें राहणेंचि नाहीं कल्पकोटी ॥ जोडिलें धन तें न चले लक्ष कोटी । म्हणोनि आलिये या सांवळियाचे भेटी वो ॥ १ ॥ आतां घाला वो याच्या पायांवरी । हाचि चुकवील जन्माचि भोंवरी ॥ शिणलें बहुत वो चौऱ्यायशींचे फेरीं । तोडील चिंता हा हेचि आशा थोरी वो ॥ २ ॥ बहुत गांजियलें माया मोह भ्रमें । रततां विषयीं या विषयाच्या कामें ॥ करितां भरोवरी रित्या मनोधर्में । याशी कृपा येतां हरील हा कर्में वो ॥ ३ ॥ कामक्रोधीं वो जांचिलें बहुत । नेदी राहो वो क्षण एक निवांत । वरी पडती वो गर्वाचे आघात । म्हणोनि विनवणी सांगा त्वरित वो ॥ ४ ॥ आशा कल्पना या कातल्या पापिणी । मनशा चिंता डाकिणी सर्पिणी ॥ येती लहरी वो जाणिवेचि जाचणी ॥ म्हणोनि विनविते हेंचि क्षणक्षणीं वो ॥ ५ ॥

आहे शेवटींचं माझें येथें पेणें । वाटे निश्चय हा याचिया दर्शनें । राहिलें चित्तीं वो याचेंचि चिंतन । निळा म्हणे आजि ऐकिलें गाऱ्हाणें वो ॥ ६ ॥

११७६ येतां देखोनियां भार । गाई मनोहर गोवळांचे ॥ १ ॥ धांवचि घेऊनि गौळणी येती । पहावया श्रीपती मदनमूर्ती ॥ २ ॥ एकीस न पुसतां एकी । माय लेकी सास्वा सुना ॥ ३ ॥ निळा म्हणे पाहोनि मुख । भोगिताती सुख कैवल्यपर ॥ ४ ॥

११७७ रत्नखचित पालख । सूर्या ऐसा निर्मिला चोख ॥ निरालंबीं गोउनी देख । मोहें उत्साह मांडियेला ॥ १ ॥ महर्षि ऋषीही सकळीक । आले पहावया कवतूक ॥ अवलोकूनियां यदुनायक । करिती प्राणें कुरवंडिया ॥ २ ॥ आले गोळियांचे भार । नाना याती नारीनर ॥ नाना परीचे शृंगार । लेणीं लुगडीं मिरविती ॥ ३ ॥ वाणें घेऊनियां नारी । रत्नजडितें तबकें करीं । देवांगना तेसिया परी । कृष्णवैभवें मंडितां ॥ ४ ॥ पालखीं घालितां चक्रपाणी ॥ नाना आल्हादें गाती गाणीं । नाना स्वरें उमटल्या ध्वनी । उठती गगनीं पडिसाद ते ॥ ५ ॥ नामें ठेवूनियां पाचारिती । गोविंदा गोपाळा यदुपती । सच्चिदानंदा आनंद मूर्ती ॥ जगपती श्रीपती अमरपिता ॥ ६ ॥ अच्युता अनंता अपारा । देवकीनंदना । जगदोद्धारा । मुनिमनमोहना सर्वेश्वरा । आत्मया श्रीवरा सर्वगता ॥ ७ ॥ सुंदरा राजीवलोचना । जगदादीशा पंकजवदना । योगीमानसमनोरंजना । सुखनिधाना सुखमूर्ती ॥ ८ ॥ मधुमाधवा मधुसूदना । त्रिविक्रमा वामना संकर्षणा ॥ मुकुंदा मंदारा शेषशयना । राजीवाक्षा जनार्दना श्रीकृष्णा॥ ॥ ९ ॥ निळा म्हणे ऐशियां नामें । गर्जती गोळणी सप्रेमा प्रेमें । ऐकोनियां ते पुरुषोत्तमें । केलिया संभ्रमें अति वाड ॥ १० ॥

११७८ शुकादिकांचिये हृदईंनें ध्यान । आम्हा जोडलें वो न करितां साधन ॥ सहजाचि पाचारितां येतसे धांवोन । प्रेमें आलिंगितां निवे तनु मन वो ॥ १ ॥ ऐशा गौळणी आनंद भरितां । दृष्टीं अवलोकूनि मदनाचिया ताता ॥ म्हणती धन्य भाग्य आमुचें वो आतां । लाधलों जन्म झाली कृतार्थी कृत्यता वो ॥ २ ॥ नित्य हरीचिया समागमें बाई । नाहीं देखिलें तें सुख भोगूं देहीं ॥ प्रालब्ध संचित वो क्रियमाण तेंही ।

गेलें हारपोनियां ठाईंचें ठाई वो ॥ ३ ॥ येतां जातां नेणों काळाचा आडदरा । देखतां सन्मुख तो पळतुसे माघारा । रंग श्रीरंगाचा उमटला शरीरा । तेणें वाताहात जन्मदुःखजरा वो ॥ ४ ॥ हरीचे सन्निधी वो सहवासें वर्ततां । यासि बोलतां चालतां कृष्ण खेळतां ॥ आंगीं ऐश्वर्याची दृढावली सत्ता । तेणें अजरामर झालों असों निभ्रांता वो ॥ ५ ॥ ऐशा कृष्णरूपीं रूपसा बाळा । होऊनि स्तविती पूजिती वेळोवेळां ॥ कडिये खांदिये घेऊनी घननीळा । नीळ्या स्वामीतें अवलोकिती डोळा वो ॥ ६ ॥

११७९ सये आनंदाचा अवचिता आला पूर । याचे मुरलीचा उठितांचि गजर ॥ मी मज नाठवेचि कैंचें घर दार । ठेलें तटस्थचि राहिलें शीर वो ॥ १ ॥ ऐसें मोहन नाटक येणें केलें । जीव चैतन्य वो हरूनि नेलें ॥ एकलें एकवटचि करुनी ठेविलें । नाठवे सासुरें ना माहेर ऐसें झालें वो ॥ २ ॥ याचा नवलावो हाचि एक वाटे । जीवीं जीव नुरे आनंदचि भेटे ॥ तेणें सुखानंदें संसारुचि आटे । मी हें माझें तों न दिसेचि कोठें वो ॥ ३ ॥ मनीं मानसीही नुरोनियां थार । हृदयभुवनीं होय याचाचि प्रसार । बुद्धी चाकाटली राहे निरंतर । सुखीं सुखाचाचि होतसे आदर वो ॥ ॥ ४ ॥ होतें आपुलीये घरीं वो निश्चळ । कोठें पाहों गेलें याचा निज खेळ । तैंचि पासूनि वृत्ति झाली वो वोढाळ । मनीं नाठवेचि लेंकरूं ना बाळ वो ॥ ५ ॥ एका एकीचा पडियेला फाला । याचा नेणोनियां स्वभाव वो ऐसा ॥ माझा मनीचि हा नवलावो मानसा । निळा म्हणे होता संचिताचा ठसा वो ॥ ६ ॥

---

## बाल क्रीडा.

—※:※—

११८० अग्नीची व्हावया शांती । उपाय आहे तुमच्याचि हातीं ॥ लावोनियां बैसा पातीं । डोळेचि झांकुनी बळकट ॥ १ ॥ उघडे ठेवितां चेतले वन्हीं । मग तो नाटोपे आम्हां लागुनी ॥ सांडील अवघीयांसीच जाळुनी । झांका म्हणउनी निज नेत्र ॥ २ ॥ गोवळ म्हणती कैसे डोळे । झांकउनी मारवितोसी रे सकळे ॥ येरू म्हणे तुम्हां हें नकळे । तोटका

या काळें ऐसाची ॥ ३ ॥ येथें न धरितांची विश्वास । जळाल अवघेही निःशेष ॥ ऐसें सांगोनियां त्यांस । डोळे निज करें धरविले ॥ ४ ॥ मग आपण वाढोनियां श्रीहरी । जाहला विराटरूपिया गगनवरी ॥ मुखपसरोनिया स्वासेंची करी । वाढियल्या अग्निज्वाळा ॥ ५ ॥ पोटीं घालूनियां दावानळ । जाहला पहिल्याचि ऐसा गोपाळ ॥ हें देखोनी अवघेची गोवळ । बोटांसंधीं लक्षितां ॥ ६ ॥ तयां म्हणे उघडा नेत्र । ऐकोनी बोलती ते सर्वत्र ॥ म्हणती देखिलें हें चारित्र । तूंचि गगनवरी वाढलासी ॥ ॥ ७ ॥ निजमुखें गिळिले ज्वाळ । तूंचि तूं काळाचाही काळ ॥ आजी देखिला तुझा खेळ । आम्हीं आपुलिया निज दृष्टीं ॥ ८ ॥ निळा म्हणे बोलोनी ऐसें । लोळती पायांवरी उल्हासें ॥ मनीं जाणोनियां विश्वासें । हाचि परमात्मा ईश्वर ॥ ९ ॥

११८१ अग्निसंस्कार देऊनी त्यासी । संपादिलें उत्तर विधीसी ॥ मग निजगजरें उग्रसेनासी । स्थापिलें राज्यसिंहासनीं ॥ १ ॥ नवाचि ध्वज नवें छत्र । द्वाही फिरविली सर्वत्र ॥ साखरा वांटुनियां नगरांत । केले दानपात्र परमसुखी ॥ २ ॥ रायाचे पूर्वील जे प्रधान । सन्मानिले ते गौरऊन ॥ प्रजेसी सिरपाव देऊन । अधिकारी जन सुखी केले ॥ ३ ॥ यावरी मातापिता बंदिखानीं । होती त्या बाहेरी काढुनी ॥ वाद्यें लावुनी मंगळस्नानीं । बरव्या प्रकारीं पुजिली ॥ ४ ॥ वस्त्रें अलंकारें गौरविलीं । निजमंदिरां तें आणियली ॥ सिबिकायानीं बैसविली । घोषगजरें मिरवित ॥५॥ तये काळींचा तो आनंद । सांगावया मी मतिमंद ॥ जेथें परमात्मा गोविंद संतोषवित मातापिता ॥ ६ ॥ निळा म्हणे नावड्या बोलीं । हरिची कीर्ती हे वाखाणिली ॥ संतीं पाहिजे उपसाहिली । नेणते लडिवाळ म्हणोनियां ॥ ७ ॥

११८२ अवघे करुनी जयजयकार । हर्षें झाले सुखनिर्भर ॥ म्हणती आतां वारंवार । भय संकोच न धरावा ॥ १ ॥ तंव येशोदा म्हणे पूर्वींही ऐसें । गर्गाचार्यें कथिलें विन्यासें ॥ राशिनक्षत्राचेनिया मिसें । उदंड भाषार्थ सांगितला ॥ २ ॥ पुढें वधील कंसासुरा । सोडवील हा मातापितरां ॥ मथुरेसी उग्रसेना नृपवरा । भद्र सिंहासनीं बैसवील ॥ ३॥ करील धर्माचें पाळण । सकळ पांडवांचें संरक्षण ॥ भीमकीचेंही पाणिग्रहण ।

करील अरिवीरां मर्दुनी ॥ ४ ॥ वधुनियां भौमासुरा । सोळा सहस्र अंतःपुरा ॥ प्रणुनियां हा एकसरा । पुत्रपौत्रीं नांदेल ॥ ५ ॥ कौरवा वधील पांडवाहातें । राज्यीं स्थापील हा धर्मातें ॥ उतरुनी भूभारातें । अवनी उत्फुल्लित करील ॥ ६ ॥ गोकुळींचिया नगरनारी । रंजवील हा नानापरी ॥ गोवळ गाईचा मनोहरी । क्रीडा करील कौतुकें ॥ ७ ॥ अतुर्बळिया नारायण ।यशोदे तुझा हा नंदन ॥ नाटकी कौसाल कान्ह । करील पवाडे अगणित ॥ ८ ॥ निळा म्हणे ते प्रसंगीं । स्मरलें अवघें यशोदेलागीं ॥ मग नाना वस्तु पदार्थ चांगीं । वरुनी सांडी श्रीकृष्णा ॥ ९ ॥

११८३ अश्वरूपिया केसासूर । ठाणमाण अति सुंदर ॥ जैसा उच्चैःश्रवा रहंवर । देवलोकीं इंद्राचा ॥ १ ॥ शोभिवंत तयाहुनी आगळा । असमाई अवलोकितां डोळा ॥ पाहावाचि ऐसा वेळोवेळा । आठवो नेदी आणिक ॥ २ ॥ शोधितांही सप्तद्वीपांतरु । नाढळेचि कोठें ऐसा वारु ॥ सुंदराहुनी अति सुंदरु । रूपें नागरु भुळवणा ॥ ३ ॥ दांडिमान कळाव्या डोळे । कर्ण जैसे केतकिदळें ॥ गुडघे सुंब मेजागळे । सर्वहि शृंगारमंडित ॥ ४ ॥ खोगिर जीन लगाम तोंडीं । इलाखे रिकेबियांची जोडी ॥ गाशा वागदोर दुमचिया दांडी । खुरुस नवरत्न खचितांचे ॥ ५ ॥ तंव संवगडियांसी खेळत । आले अकस्मात गोपिनाथ ॥ वारु देखोनि गडिया म्हणत । पैल पाहारे विचित्र तेजी ॥ ६ ॥ आम्हा राय कंसासुरें । बैसावया अति आदरें ॥ धाडिलें हें वहान खरें । अनुवादिजे गडियासी ॥ ७ ॥ आतां यावरी घालुनी स्वारी । पाहों बैसोनियां घटिका चारी ॥ नये मना तरी माघारी । देऊं पाठवुनी त्याचा त्या ॥ ८ ॥ परी तुम्हीं राहोनियां दुरी । बैसोनि पहावें गोपुरावरी ॥ ऐसें सांगोनिया श्रीहरी । मग सांवरी आपणियां ॥ ९ ॥ आइता साज आहे वरी । रूपाकृती ही साजिरी ॥ मायावी हा जाणोनियां हरी । कास कसिली बळकट ॥ १० ॥ निळा म्हणे मनोगत । आर्त केशियाचे उत्कंठित । वरी बैसलिया कृष्णनाथ । नेईन दिगांता उडवुनी ॥ ११ ॥

११८४ आजि पुरलें वो आर्तीचें आरत । होतें हृदयीं वो बहु दिवस चिंतित ॥ मना आवरुनि इंद्रियां सनत । दृष्टी पाहों हा धणि वरी गोपिनाथ वो ॥ १ ॥ तेंचि घडोनियां आलें अनायासें । जातां यशोदे

घरा वाणाचिया मिसे ॥ आशा खेळत खेळत बाळेवेष । कवळी घालि मिठी गद्गदां हांसे वो ॥२॥ मुख अमृताचा मयंक उगवला । दंत हिऱ्याचा प्रकाश फाकला ॥ नयनीं रत्न कीळ तारा वो चमकला । देखतां हृदयीं निज वास त्याचा झाला वो ॥ ३ ॥ जन्म जन्मांतरीं बहु केलें सायास । याचे भेटिलागीं व्रतें उपवास ॥ सेविलीं गंगची तटाकें उदास । त्यांचिया सुकृताचे आले नेणो घोष वो ॥ ४ ॥ आजि आनंदाशीं आनंद माझ्या झाला । आजि सुखाशीं सुखें लाभ केला ॥ आजि हर्षाशीं हर्ष भेटों आला । तेणें श्रीरंग निजदृष्टीं स्थिरावला वो ॥ ५ ॥ भोग भोगितां वो सरले समस्त । गेलें उडोनियां प्रालब्ध संचित विटलें विषयावरुनियां चित्त । निळा म्हणे घडला हरिशीं एकांत वो ॥ ६ ॥

११८५ आठउनियां श्रीकृष्णचरण । अक्रुरें रायातें पुसोन ॥ चालिला रथावरी बैसोन । मार्गीं हरिगुण आठवितु ॥ १ ॥ गोकुळा पाठविला अक्रुर । परीं कंसामनीं दचक थोर ॥ तेणें पाचारुनियां धनुर्धर । चौकिये बाहेर बसविले ॥ २ ॥ म्हणे येतां देखोनियां कृष्णासी । युद्ध करावें अति आवेशीं ॥ उतरुनी त्याचिया मस्तकासी । मजपाशीं आणावें ॥ ३ ॥ रजका सांगे निजमुखें । कृष्ण येतांचि धोपटीं सुखें ॥ तुझिये पाठीसि हे आसीके । सावध ठेविले धनुर्धर ॥ ४ ॥ मग बोलाउनियां मल्लजेठी । बैसविले ते दारवंटीं । मातला हस्ती त्याचिये पुष्टी । कुळवई ठेवियेला ॥ ५ ॥ तया भोंवते आणिक कुंजर । उभे केले ते दळभार । तंव इकडे जाउनियां अक्रुर । भेटला नंद यशोदेसी ॥ ६ ॥ निळा म्हणे पुसेकृष्णा । तंव ते म्हणतीं गेला राणा ॥ मग रथ तेथेंचि ठेउनी जाणा । चालिला दर्शना कृष्णाचिया ॥ ७ ॥

११८६ आतां तरी बाळका आणीं । आपुल्या करें मी लेववीन लेणीं ॥ यशोदा म्हणे मांडिली हाणी । निवांत पोरटें नसेची ॥ १ ॥ मग जाउनियां पालखी जवळी । म्हणे मृत्यु पाचारितो तुतें वनमाळी ॥ उगाचि असतासि जरि ये काळीं । तरि वाचतांसी काय करूं ॥ २ ॥ ऐसें बोलोनियां आणिला । पूतने वोसंगा बैसविला ॥ देखतांचि पूतने वोसंडला । उभड प्रेमाचा न सांवरे ॥ ३ ॥ सुंदरपणाची झाली सिमा । उपमेशीं मदना अंगीं कालिमा ॥ अवलोकुनियां पुरुषोत्तमा । तनुमनप्राणें

निवाली ॥ ४ ॥ म्हणे गे यशोदे साजणी । परम सुखाची हे लाधलीसी धणी ॥ जतन करी हा पुत्रमणी । दुर्लभ भाग्येंचि पावलिसी ॥ ५ ॥ पूतना राक्षसी अति क्रूर । तेहि देखोनिया कृष्णचंद्र ॥ नयनीं अश्रु आणूनियां वारंवार । श्रीमुखकमळ अवलोकी ॥ ६ ॥ निळा म्हणे अगाध बुद्धी । होउनी परतली प्रालब्ध सिद्धी ॥ म्हणे कार्य साधुनियां त्रिशुद्धी । जावें सत्वर राजभुवना ॥ ७ ॥

११८७ आतां पुढें बाळचरित्र । कृष्णक्रिडा अति विचित्र ॥ ऐकतां श्रवणीं होती पवित्र । गातां वक्ते शुचिर्भुत ॥ १ ॥ एक अजर एक अक्षर हे भगवत्कथा । श्रवणीं पडतांचि अवचिता । कैवल्यपदप्राप्तीची योग्यता । पावे श्रोता वक्ता तात्काळ ॥ २ ॥ श्रीकृष्णाची हे बाळ-लीळा । अद्भुत सुखाचा सोहळा ॥ वेधूनियां नरनारी बाळा । गाई आणि गोवळा ब्रम्हप्राप्ती ॥ ३ ॥ ब्रम्हादिक दर्शना येती । सकळही देव आणि सुरपती ॥ गगनीं विमानें दाटती । सुमनें वरुषति सुरवर ॥ ४ ॥ श्रीकृष्णाचें नामकरण । विधिविधानें द्विजभोजन ॥ नंदयशोदे उल्हास पूर्ण । सुवासिनी ब्राम्हण सर्व जना ॥ ५ ॥ मंगळघोषाचिया गजरीं । निशाणें दुमदुमिलिया भेरी ॥ टाळ मृदंग झणत्कारीं । नाचती वैष्णव पदें गाती ॥ ६ ॥ निळा म्हणे नगरवासी । प्रांतवासी देशवासी ॥ आले द्वीपांतरनिवासी ॥ कृष्ण सोहळा पहावया ॥ ७ ॥

११८८ आले संन्यासी तापसी । योगी मुनिजन प्रांतवासी ॥ पंडित पुराणिक ज्योतिषी । वेदाभ्यासी याज्ञिक ॥ १ ॥ शस्त्रपाणि रिक्तपाणि । पहाती कृष्णातें ते दुरुनी ॥ अवलोकुनियां निज नयनीं । परम विस्मयातें पावती ॥ २ ॥ घरें सांडुनियां नारी । आल्या कोणीचि नसतां घरीं ॥ म्हणती सर्वेचि जाइल गे श्रीहरी । आम्ही त्या दृष्टी न देखों ॥ ३ ॥ मग जें उद्विग्न व्हावें मनीं । तें आतांच कां न यावें पाहोनी ॥ ऐशिया निश्चयातें करुनी । आलिया एकांतवासीहि त्या ॥ ४ ॥ जिया बाहेरी येणेंचि नाहीं । आपुलिया सभाग्यपणें कदाही ॥ आल्या धांवोनियां त्या त्याही । कृष्णा दृष्टी अवलोकूं ॥ ५ ॥ निळा म्हणे वरा भाग्य । आलि-या अव्हेरी कोण त्या मग ॥ अधिका अधीक लाहो सवेग । करुनियां संग्रहिती ॥ ६ ॥

११८९ इंद्र म्हणे गा देवदेवा । न कळती आम्हा तुझिया भावा ॥ कळासूत्रीं तूं विश्वलाघवा । करिसी घडामोडी स्वर्गीच्या ॥ १ ॥ निर्मिला तुवां चतुरानन । आपुलिये नाभीं देऊनि स्थान ॥ तुझिया सत्ता मही गगन । पंचमहाभूतें वाढलीं ॥ २ ॥ तूं या आदिचिही आदी । विश्वीं विश्वात्मा तूं त्रिशुद्धी ॥ तुजवांचुनियां मना बुद्धी । कैंचें बोधव्य मंतव्य ॥ ३ ॥ तुवां अंतरिक्षीं धरिलें गगन । तुझिया आज्ञे विचरे पवन ॥ तुझिया सत्ता देदीप्यमान । सर्वदा हुताशन नवेचि ॥ ४ ॥ तुझिया तेजें प्रकाशे रवी । तुझिया क्षमा अचळ पृथ्वी ॥ तुझिया द्रावें सदा टवटवी । आपावर्ती गंगोदकां ॥५॥ समर्थां समर्थ तूं ईश्वर । होउनी नंदाचा कुमर ॥ केला पवाडा हा थोर । गोवर्धन उचलिला ॥ ६ ॥ आम्हीं तुझीं म्हण्यागतें । महिमा नेणोनियां येथें ॥ पाठविलें जें पर्जन्यातें । त्या अपराधा क्षमा कीजे ॥ ७ ॥ कोणा नेणवे तुझी लीळा । देवत्रयां तूं आगळा ॥ निजानंदाचा पुतळा । सगुण रूपीया श्रीहरी ॥ ८ ॥ निळा म्हणे ऐसी वाङ्मय पूजा । करुनियां कृष्णा विराटध्वजा ॥ आज्ञा घेउनियां अमरराजा । गेला आपुलिया भुवनासी ॥ ९ ॥

११९० ऐकोनी गजबजिली दैत्यसभा । धाकेंचि कंसही ठाकला उभा ॥ तंव भीभत्स मामळभटाजी शोभा । देखतें झाले सकळही ॥ १ ॥ नागवा उघडा आणि बोडका । जीवत्वपणें बुडाली शंका ॥ भोंवते देखतांही विषयालोकां । म्हणे धांवा धांवा सोडवा ॥ २ ॥ पाटेंचि पुरविली माझी पाठी । लक्षानुलक्ष आले कोटी ॥ उठा उठा पळारे शेवटीं । मारिले जाल व्यर्थचि ॥ ३ ॥ दैत्य पाहाती चहूंकडे । शस्त्रपाणी वेंधले हुडे ॥ दुर्गा सांभाळिती चहूंकडे । म्हणती न दिसे विघ्न डोळियां ॥ ४ ॥ राजा म्हणे झांका त्यासी । पुसा काय तें वार्तेसी ॥ मग नेसउनियां वस्त्रासी । आणिला सभेसी पूसती ॥ ५ ॥ तो म्हणे राया बाळिया बाळ । उपजला तो आमुचा काळ ॥ विचित्र पाहतां त्याचा खेळ । लाविली पिढींची मज पाठीं ॥ ६॥ निळा म्हणे रूपाकृती । सुंदरपणाची ओतली मुर्ती ॥ कोटी मदनाचीं अंगीं दीप्ती । न ढळती पातीं अवलोकितां ॥ ७ ॥

११९१ ऐकोनि बोल हांसे त्यांचे । म्हणे हे बेठ्याचे पोट पोसे ॥ १ ॥ आयतें आणुनि द्यावें हातीं । मग हे सेविती स्वानंदें ॥ २ ॥

तयां म्हणे यारे लागे । माझिया मागें चोजवित ॥ ३ ॥ निळा म्हणे पाळतिही करी । आपणचि चोरी वाटित्या ॥ ४ ॥

११९२ ऐकोनियां दासवाणी । चक्रपाणी संतोषे ॥ १ ॥ म्हणे तुह्मी प्राणसखे । बोलतां मुखें प्रीतिवादें ॥ २ ॥ सर्वही काळ माझीचि चाड । तरि मजाहि कोड तुमचेंचि ॥ ३ ॥ निळा म्हणे न फिटे ऋणी । भक्ता आणि देवाची ॥ ४ ॥

११९३ ऐकोनियां संतवाणी । चक्रपाणी संतोषे ॥ १ ॥ म्हणे यारे भिऊं नका । माझिया सेवकां भय नाहीं ॥ २ ॥ नाम मुखीं न संडावें । भजा भावें संताशी ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसी हरी । आज्ञा करी निज दासां ॥ ४ ॥

११९४ ऐकोनिया भक्तवचनें । देव संतोषले मनें ॥ १ ॥ म्हणती आहे नामापासीं । संदेह न धरावा मानसीं ॥ २ ॥ संत बोलिले ते खरें । साचाचि मानावें उत्तरें ॥ ३ ॥ निळा म्हणे संतोषविलें । कृपावचनीं या विठ्ठलें ॥ ४ ॥

११९५ ऐसें केशियाचें हनन । केलें देखोनियां सकळ जन ॥ गोकुळींचें विस्मयापन्न । म्हणतां न कळे महिमान श्रीहरीचें ॥ १ ॥ कृत्रिम वेषिया तुरंगम । आला इच्छूनियां संग्राम ॥ कैसा जाणोनियां मेघःशाम । तयावरी सरसावला ॥ २ ॥ त्याची केलीचि कार्यसिद्धि । तोडूनियां आधि व्याधी । बैसविला तो सभासंधी । मुक्तिस्थानीं मुक्ताचिये ॥ ३ ॥ वार्ता गेली कंसापुरा मर्दिलें केशिया महावीरा ॥ गोकुळीं आनंद नारीनरा । हर्षें साखरा वांटिती ॥४ ॥ कंस म्हणे विपरीत भाग्य । झालें ओढवलें उपसर्ग ॥ गेले माझे हे अंगलग । आतां विश्वास कोणाचा ॥ ५ ॥ गगनवाणी ऐकिली जेव्हां । सुत देवकीचा आठवा ॥ तोचि वधील दैत्यां सर्वां । तों हें विपरीत वर्तलें ॥ ६ ॥ गोकुळामाजि तुझा वैरी । नाहीं ऐकिलें हें भविष्यांतरीं । एकाचि वदली ते कुमारी । जे कां निष्ठिली हातींनी ॥ ७ ॥ व्यर्थचि पिडियेली देवकी । आणि वसुदेवही पुण्यश्लोकी ॥ होणार न चुकेचि कीं सेखीं । विघ्न आणिकाचि उदेलें ॥ ८ ॥ निळा म्हणे ऐसिया परी । कंस निमग्न दुःखसागरीं । गेली ऐश्वर्याची थोरी पडिला शरीरीं निचेष्टित ॥ ९ ॥

११९६ ऐसा चिंतावोनियां मनीं । म्हणे निमाली पूतना भगिनी ॥ माझिया राज्या आली हानी । म्हणोनी माभळभट पाठविला ॥ १ ॥ तंव पिंडदान त्या प्राप्त झालें । नवलचि अपूर्व हें ऐकिलें ॥ येउनी आम्हांतें जाणविलें । नव्हे बाळ हें तान्हुलें श्रीहरी ॥२॥ मग म्हणे वो रिठासुरा । जाउनीं तुम्ही बाळकासि मारा ॥ देईन अर्धराज्य भारा । कार्यसिद्धी झालिया ॥३॥ मग रिठासुर तो मायावी । गुंफिली रिठेमाळ अति बरवी । करीं घेउनियां सादावी । नंद चौबारा जाउनी ॥४॥ म्हणे हें बाळका लेववितां । सर्वकाळीं कंठीं असतां ॥ कोण्याहि भयाची तया वार्ता । स्पर्शोचि नेणें सामर्थ्यगुणें ॥५॥ कदापिहि नव्हे भूतबाधा । दिठीचें भय नाहीं त्या कदा ॥ ऐसें ऐकोनियां यशोदा । आवडी घाली हरिकंठीं ॥६॥ निळा म्हणे पालखीं बाळ । निजउनियां यशोदा वेल्हाळ । मेळउनियां स्त्रिया सकळ । हास्यविनोदें बैसली ॥७॥

११९७ ऐसा वैरिया मुक्तिदानीं । कृपावंत हा सारंगपाणी । कंसें ऐकुनियां श्रवणीं । परम खेद मानिजे ॥१॥ कृष्णाजवळी होतीं मुलें । तिहीं तें आश्चर्य देखिलें । वडिला सांगती नवल झालें । कृष्णें मर्दिलें अपार दैत्यां ॥२॥ कोट्यावत पसरुनी मुखें । आले कृष्णासन्निध तंव ते । तेणें अति लाघवें कौतुकें । भूमीसी आपटुनी मारिले ॥३॥ त्यांचीं शरीरें पर्वतराशी । पडिल्या आहेत गांवापाशीं । चला दाखवितों तुम्हांसी । म्हणवुनी सकळिकांसी हाकारिलें ॥४॥ तिहीं तें देखोनियां दिठी । भयें कांपती आपुल्या पोटीं । म्हणती अतुर्बळि हा जगजेठी । लेंकरूं कैसा म्हणावा ॥५॥ नंदहि विस्मयापन्न चित्तीं । म्हणे हे कोठुनी असुर येती । याचिया हातें पावोनी शांती । जाताती मुक्ती पदातें ॥६॥ निळा म्हणे गांवींचे लोक । करिती अवघेचि कौतुक । परी कंसा अधिकाअधिक । क्षतें उमटती दुःखाचीं ॥७॥

११९८ ऐशी अगाध चरित्रें याचीं । वर्णितां भागला शेष विरंची । लोक म्हणती हा सर्प विलेंचि । कैसेंनिपां वांचला ॥ १ ॥ मग त्यां सांगे नारायण । यासी गेलें वर्ष होऊन । गोवळ वत्से ब्रम्हसदन । पावोनी होते बैसले ॥ २ ॥ कालिची ते आले येथें । म्हणोनी सांगती नूतन वार्ते ॥ द्विगुणपणें हे कैसेनि तुमतें । प्राप्त झालें कां नेणा ॥ ३ ॥ ऐसें

सांगतां श्रीहरी । अवघ्यां जाणवलें अंतरीं । परम लाघविया मुरारी । खेळ खेळे विचित्र ॥ ४ ॥ अघासुरा वधिल्यावरी । पुढें धेनुका बोहरी । कैसी केली याचि परी । तेंहि सुजाण परिसतु ॥ ५ ॥ एकेक याचें कथानक । श्रवण भवबंधा मोचक । म्हणोनियां सात्विक लोक । हेंचि ऐकती अनुदिनी ॥ ६ ॥ निळा म्हणे हे बाळक्रीडा । परी परमार्थ साधं-माचा हुडा । श्रवण मनन होतांचि फुडा । ब्रम्हसाक्षात्कार पाविजे ॥ ७ ॥

११९९ ऐसें ऐकोनियां यशोदा । म्हणे तरी मी न सोडीं तूतें कदा । अंतरलें काम माझा धंदा । राहें गोविंदा ऐसाचि ॥ १ ॥ बोलोनियां तें ऐसें गेली । आपुल्या कामावरी पडि झाली । पुढें कृष्णें युक्ति केली । अति विचित्र ते एका ॥ २ ॥ मग त्या उपडुनियां उखळा । आला बाहेरी तया वेळा । दावें तैसेंचि असतां गळां । उखळ आडकवी वृक्षेसी ॥ ३ ॥ विमलार्जुन कुबेरनंदन । नारदवचनें शाप पावोन । होते राहिले वृक्ष होऊन ॥ कृष्णचरणस्पर्शें उद्धरावया ॥ ४ ॥ त्याचें उदित झालें भाग्य । यालागीं येउनियां श्रीरंग । करिते झाले तो प्रयोग । सावध मनें परियेसा ॥ ५ ॥ ते उभयतांहि शेजारीं । वाढले होते दिव्य सहस्त्रवर्षेंवरी । उंची पाहातां गगनोदरीं । शाखापल्लव डोलती ॥ ६ ॥ त्या उभयतां माजी उखळ । आडकउनी कृष्ण गोपाळ । तया नेटीं देउनी चरणतळ । हेलावा देऊनी उपटिलें ॥ ७ ॥ तिहीं गर्जना केली कैसी । प्रळयकाळींची विद्यु-ल्लता जैसी । उद्धार पावोनियां हरिचरणासीं । वंदूनिया ते गेले ॥ ८ ॥ ऐकोनियां तो घोषगजर । यशोदा धांवली अति सत्वर । पाहे तंव तो सारंगधर । माजि वृक्षा पडियला ॥ ९ ॥ मग उचलुनियां करतळीं । आलंगिला हृदय मेळीं । निढळ मेळउनी निढळीं । अवलोकी वदन क्षणक्षणा ॥ १० ॥ म्हणे म्यालिसी गे माझी माय । थोर केला म्यां अन्याय । उखळीं बांधलीसी हा अपाय । थोर वरूनि चूकला ॥ ११ ॥ मग सोडुनियां कंठींचें दावें । मुख पुसी निज पलवें । निळा म्हणे याचीं लाघवें । नेणवतीचि ब्रम्हादिकां ॥ १२ ॥

१२०० ऐसें जाणोनियां श्रीहरी । पाळखीं निजविल्या रुदन करी ॥ न राहे अंकींही क्षणभरी । निजवितां शेजारी तैसाची ॥ १ ॥ काय करूं गे यशोदा म्हणे । कां हें करिताहे रूदन ॥ दिठावलें माझें तान्हें ।

चांगला दिसतो नयनीं । परी धरूं कैसा देईल ॥ १ ॥ तुम्ही व्हारे पैलीकडे । दुसि परते वेघोनि हुडे । चौताळतां हा चहूंकडे ॥ करील रगडा सकळांचा ॥ २ ॥ ते म्हणती बरें कृष्णा । परी तूं सांभाळीं हो आपणा ॥ ऐसें म्हणोनियां पळती राणा । गिरिशिखरीं बैसले ॥ ३ ॥ मग कास घालुनी गोपीनाथ । चालिला पुढें चुचकारित ॥ तंव तो म्हणे आजी कार्यार्थ । बरा साधला एकांतीं ॥ ४ ॥ जवळी यावयाची वाट पाहे । उगाचि स्तब्ध उभा राहे ॥ हें जाणोनियां यादवराय । अंग राखोनी चमकतु ॥ ५ ॥ ऐसा आटोपिला हरी । तंव तो मायावी आसुरी ॥ धाविन्नला तयावरी । शिंगें पसरुनी विस्तीर्णें ॥ ६ ॥ निळा म्हणे फुंपात उठी । चौताळ लागे पाठीं ॥ तंव हा परमात्मा जगजेठी । गांठी पडों नेदीचि ॥ ७ ॥

१२०६ ऐसें सांगतां माभळभटा । राया दचक बैसला मोठा ॥ मग पाचारुनियां सुभटा । दैत्याप्रती काय बोले ॥ १ ॥ म्हणे वाढविलेती बहुता मानें । अपार संपदा देउनियां धनें ॥ आजि माझिया उपेगा येणें । बाळ कृष्ण वधणें भलत्यापरी ॥ २ ॥ नाना विद्या तुमच्या अंगीं । रूपें पालटुनी विचरतां जगीं ॥ मायारूपी म्हणउनियां स्वर्गीं । देवही भिती तुम्हांसी ॥ ३ ॥ ऐसें असोनि माझिये गांठी । कायसी बाळका जळुची गोठी ॥ तुमचेनी बळें हे सकळही सृष्टी । आर्चित झाली मजलागीं ॥ ॥ ४ ॥ पूतना गेली ते तंव नारी । दुसरा भट तोहि भिकारी ॥ काय जाणों कैशापरी । देखोनीं कळली तयासी ॥ ५ ॥ तो तंव अत्यंत सकुमार । सांगती अवघे लहान थोर ॥ सुंदरपणाचीही बहार । रूपा आली कृष्णाकृती ॥ ६ ॥ तरी तुम्ही जाऊनियां तेथें । प्रेतरूपचि आणावा येथें ॥ निळा म्हणे पाहोनियां त्यातें । करऊं अक्षवाणें अपणा ॥ ७ ॥

१२०७ कारितांचि सीमा उल्लंघन । म्हणती अक्रुरा एकें वचन । तुवां जावें रथ घेऊन । सांगावें वर्तमान रायासीं ॥ १ ॥ तेणें आज्ञा वंदुनी शिरीं । चालिला पुढें वेगें करी । बळराम कृष्ण गोवळ भारी आले बळिया रजकापै ॥ २ ॥ तंव तो वस्त्रें बाळवीत । उभा असे बळ प्रमत्त । गोवळांतें असें पुसत । तुम्ही आलेती कोठुनी ॥ ३ ॥ ते म्हणती गोकुळवासी । जातों रायाचे भेटीसी । आदरें बोलाविलें कृष्णासी ।

आणि बळीरामा सुजाणा ॥ ४ ॥ येरु म्हणे कोणता कृष्ण । गोवळ तुम्ही अवघे जण । आलेती घोंगडी पांघरोन । जाल कैसेन रायापुढें ॥ ५ ॥ तंव कृष्ण बळिराम म्हणे त्यासी । आम्हां देई उत्तम वस्त्रांसी । भेटोनी आलिया रायासी । देऊं उचित आणि तुझीं वस्त्रें ॥ ६ ॥तंव तो म्हणे भाग्यासी याल । बोलतांचि ऐसें ताडण पावाल । राजवस्त्रें हीं तुम्ही ल्याल । तैंचि वेंचाल जीवें प्राणें ॥ ७ ॥ बळिरामें हें ऐकतांचि कानीं । म्हणे वस्त्रें आणा रे लुटुनी । शंका मात्र न धरितां मनीं । हरा आवडती ज्यां जैसीं ॥ ८ ॥ निळा म्हणे धांवले सकळ । बाळिये अतुर्बळी गोवळ । तेथें झाला हालकल्होळ । रजक बळिया धांविन्नला ॥ ९ ॥

१२०८ कान्होबांचें चाटुनियां आंग । म्हणती मग पोट धालें ॥१॥ रोज ऐसिची देई धणी । लागती चरणीं गोपाळ ॥ २ ॥ म्हणती गोविंद मोठे व्हाल । मग तुम्ही सांडाल सोय माझी ॥ ३ ॥ निळा म्हणे ते वाहती आण । नेणों सुजाण तुजविण ॥ ४ ॥

१२०९ कुवळई मर्दुनियां उन्मत्त । उपटुनियां घेतले त्यांचे दांत ॥ बळिराम आणि कृष्णनाथ । आनंदें नाचत रणसौरे ॥ १ ॥ दोघेहि बंधु अति सुंदर । लावण्यगुणें गुणगंभीर ॥ हे देखोनिया महावीर । मुष्टीक चाणुर उठावले ॥ २ ॥ ते रायाचे परम आप्त । आतुर्बळी बळ प्रताप । जयां देखतांचि अहां कंप । देवां दैत्यां मानवां ॥ ३ ॥ दंडी मुडपी उरीं शिरीं अद्भुत बळाची उजरी ॥ काळासम तुल्य ते निशाचरी । जेठिया वस्ताद मल्लाचे ॥ ४ ॥ तयाचिये दृष्टीपुढें । मेरुमांदार भासती खडे ॥ मल्लविद्येमाजी निधडे । वीर उन्नत शिघ्रकोपी ॥५॥ जयाचा सदा आडदरा । समुद्रवलयांकिता वीरा ॥ धाकें त्याचिया कंसासुरा । देती करभार सर्वही नृप ॥ ६ ॥ निळा म्हणे ते आग्रगण । जेठियां माजी शिरोरत्न ॥ भुजादंडांतें थोपटुन । राहिले उठोन पुढें उभे ॥ ७ ॥

१२१० कंसराया पुजितें नित्य । धरितो असुरचि उन्मत । काय पुरवील मनींचा हेत । दासी किंकर मी त्याची ॥ १ ॥ परमात्मा हा सर्वेश्वर । कृष्ण सुंदरा अतिसुंदर । चर्चनामिसें लावीन कर । अति मनोहर करीन पूजा ॥२॥ मग येऊनियां ते निकट जवळी । मस्तक ठेवी चरणकमळीं । म्हणे चंदन चर्चीन हा करतळीं । जार तूं आज्ञा देसील ॥ ३ ॥

नित्य रायातें चर्चितां । चातुर्य आलें माझिया हाता । आतांही तेथेंचि जात जातां । तुंतें देखिलें निज दृष्टी ॥४॥ मग तेसीची मी येथें आलें । तुझिया चरणातें पावलें । दासी विद्रुपाचि परी मज ठेविलें । रायें याचि कार्या-वरी ॥५॥ जाणोनी तिचा अंतर्भावो । प्रसन्न झाले देवाधिदेवो । म्हणती तरी तूं अवश्यमेवो । चर्ची चंदन निज हस्तें ॥६॥ निळा म्हणे आली पूजा । नाहींचि त्यागणें गरुडध्वजा । जैसिया तैसे मग हा वोजा । करी देणें यथोचित ॥७॥

१२११ कंसा मनीं भयसंचारु । झाला तेणें चिंतातुरु । बैसोनियां करी विचारु । कृष्णवधार्थ प्रयोग ॥ १ ॥ तें ऐकोनी उत्पात वार्ता । गोकुळींचिया लोकां समस्ता । धैर्य नुरेचि म्हणती आतां । जावें प-ळोनी दुरिदेशा ॥ २ ॥ तंव नंद म्हणे ऐका मात । जावोनी वसों द-रकुटी आंत । सोडुनियां जातां आपुला प्रांत । घरें दारें नुरतील ॥ ३ ॥ विचार मानला सकळासी । गेलीं पळोनी दरकुटियेसी । गांवीं नाहीं मुंगी माशी । ऐसे ओस पडियेले ॥ ४ ॥ उष्णा वारियांचे आघात । साउली न मिळेचि त्या वनांत । तंव देखिल्या अकस्मात । माईक गाडा शकटासुर ॥ ॥ ५ ॥ यशोदा देखोनियां ते वेळीं । बाळकृष्ण निजवी गाडियातळीं । तंव हा लाघविया वनमाळी । पदघातेंचि उडविला ॥ ६ ॥ तेणें तो आ-क्रंदला । घोषें दणाणिला जाउनी मथुरेमाजि पाडिला । कंसा सन्मुख श-तचूर्ण ॥ ७ ॥ झाला शोणिताचा सडा । मांस विखुरलें चहूंकडा ॥ कंस म्हणे रे शकटाहि गाडा । आजि लाविला मृत्युपंथें ॥ ८ ॥ निळा म्हणे गौळिये म्हणती । गाडा उडाला कैसिया रीती ॥ तळीं होता हा श्री-पती । थोर भाग्ये वांचला ॥ ९ ॥

१२१२ कंसें बैसोनियां सभेसी । विडा मांडिला पैजेसी ॥ म्हणे जो वधील बाळकासी । जाऊनियां गोकुळा ॥ १ ॥ त्यासी देईन हें अर्ध-राज्य । न करी अन्यथा आपुली पैज ॥ जया साधेल हें काज । तेणें विलंब न करावा ॥ २ ॥ भगिनी पुतना प्रधानरासी । ऐकतांचि उठि-येली अति आवेशी ॥ म्हणे जाउनियां गोकुळांशीं । निर्दाळीन कुमर नंदाचा ॥ ३ ॥ आज्ञा घेउनियां ते त्वरित । विष स्तनांमाजी भरित ॥ म्हणे पाजूनियां कृष्णनाथ । करीन घात शस्त्रेंविण ॥ ४ ॥ घेऊनियां

बाळलेणीं । मनगटीं बांधिलीं सेळणीं ॥ जिवती वाघनखें माळा मणी । आंगडे टोपडें बाळंतविडा ॥ ५ मग सुखासनीं विराजित । दासी परि-चारिका वेष्टित ॥ येउनियां गोकुळा आंत । यशोदेगृहीं प्रवेशली ॥ ६ ॥ निळा म्हणे नवलकथा । वर्तेल ते येथें आतां ॥ पूतना पावेल सायोज्यता ॥ श्रीकृष्णनाथादर्शनें ॥ ७ ॥

१२१३ कृष्ण बळराम उठिले । मुखमार्जनें सारिलें । तंव दसवंतिया बोले । जेउनी जावें गोधनापाठीं ॥ १ ॥ गाई गोवळ खोळंबले होतें । पुढें गेले ते निरुते । मग आणुनियां भोजनातें । पुढें ठेविली रत्नताटें ॥ ॥ २ ॥ उभयतां जेउनियां उठिले । गोपशृंगार आणविले । विचित्र चोळणे कासिले । काचे वेष्टिले सुरंग ॥ ३ ॥ शिरीं मोरविसा टोप । कर्णी कुंडला तेज अमूप । केशर चंदनाचे विलेंप टिळे ल्लाटीं रेखियलें ॥ ४ ॥ गुंजाहार घातले कंठीं । खांदीं कांबळीं हातीं वेताटी । मोहरी पावा गांजिवा पाठीं । माजि दिव्यान्नें भरियेलीं ॥ ५ ॥ दंडीं रुमाल करीं कंकणें । पायीं वाहाणा शोभलें लेणें । ऐसे चालतां अतिसत्राणें । पुढें अघयातें ओळखिलें ॥ ६ ॥ एक जाभाडें गगनावरी । दुजें पृथ्वीची ऐसें निर्धारी । गाई गोपाळ गेले भीतरी । निळा म्हणे हें जाणवलें ॥ ७ ॥

१२१४ कृष्ण परमात्मा श्रीहरी । बाळिराम शेषअवतार निर्धारी ॥ केसे शोभले अलंकारीं । निजांगाचिये निज प्रभें ॥ १ ॥ मुगुट कुंडलें विशाळ डोळे । जैसीं विकासलीं सूर्य कमळें ॥ अंगकांती रूप सांवळें । पीतांबराचीं परिधानें ॥ २ ॥ कंठीं पदकें सुमनमाळा । कौस्तुभ एकावळी रुळती गळां ॥ बाहुभूषणें मुद्रिका सकळां । कांडोवाडी सुशोभित ॥ ३ ॥ सकुमार नागर अंगकांती । ज्याचिया तेजें रविशशीदीप्ती । हुताशनीं रत्नीं प्रकाश फांकती । ज्याचेनियां झगमगती तारांगणें ॥ ४ ॥ सुवर्ण म्हणती जे उत्तम तें याचिये अंगकांती सुमहिम । ऐसें सौंदर्य निरुपम । कृष्णाकृती बोसं-वलें ॥ ५ जैसिया परी तैसा भासे । हेंहि अपूर्वचि एक असे । कृष्णरूपें लाविलें पिसें । नंस्मरती पहातां देहगेहा ॥ निळा म्हणे बैसली दृष्टी । कृष्णरूपीं ते सहस्र तुंठीं । नरनारी विस्मित पोटीं । अवलो-किती श्रीकृष्णा ॥ ७ ॥

१२१५ कृष्ण बळियामाजि बलिष्ठ । कृष्ण अवघिया देवां श्रेष्ठ । तैसाचि बळिरामही उद्भट । मरील घोट देखतां ॥ १ ॥ एक नवनाग-सहस्रबळीं । दुजा तंव तो कल्पांत शुळी । येतांचि येथें निमिष मेळीं । करितील संहार कंसाचा ॥ २ ॥ कृष्ण परमात्मा ईश्वर । अनंतकोटीब्र-म्हांडधर । मायानियंता परात्पर । तया हा पामर आणावितो ॥ ३ ॥ पतंगा वडवानळेसी खेळणें । दर्दुर शेषातें गिळूं म्हणे । उलुकें रवितें संघ-टणें । कैंवि जीवें प्राणी वांचिजेल ॥ ४ ॥ तैसिचि परी झाली यातें । नेंवि खद्योत झगटूं पाहे रवितें । अरण्यमृगें शार्दूलातें । कैसेनि भेटीसी आणिजे ॥ ५ ॥ परी येथें प्रालब्धाचि बळी । घडवील घडावें तें तात्काळीं । पहा त्या हिरण्यकश्यपें आपुलियेचि नळीं । बसीवला नृसिंह पाचारुनी ॥ ॥ ६ ॥ निळा म्हणे होणार होईल । बुद्धीही तैसीच प्रवर्तवील । क्रियाहि शरीरीं उमटेल । भोगणें भोगवील प्राचीन ॥ ७ ॥

१२१६ कृष्ण बळिरामातें म्हणती । गोवळे तुम्हीं अर्भक जाती । मारिला म्हणोनी कुळवई हस्तीं । तेणेंचि स्फुंदेंस्फुंदूं नका ॥ १ ॥ बहुत दिवस खादलें लोणी । चोरिये वोसिली दुधाणी । सितरुनियां भोगिल्या गौळणी । त्याचीहि झडती निघेल ॥ २ ॥ न विचारित पतंग जैसा । झडपूं धांवे दीप प्रकाशा । तैसे तुम्ही नेणता कंसा । राया सान्निध पावलेती ॥ ३ ॥ पिपीलिके फुटतां पक्ष । म्हणे गगन लंघीन मी अंतरिक्ष । परी मृत्यु पातलाहे प्रत्यक्ष । न लक्षेचि परी ते झाली तुम्हां ॥ ४ ॥ रजक मदु-नियां बलौता । निदसुरियां धनुर्धरा समस्तां । यश मानियेलें परि तें आतां । येचि क्षणीं जाणवेल ॥ ५ ॥ पूतना बाई माभळ भट । एक ते स्त्रीणक ते भट । कागबगादिदैत्य आदट । नेणती मल्ल संग्राम ॥ ६ ॥ निळा म्हणे ठाकिलें त्यांसी । तेचि पाहों येथ आलेसी । ऐसें बोलोनियां अति आवेशीं भुजा थापटोनी उठिले ॥ ७ ॥

१२१७ गडिया म्हणे पळतां घरें । नवनितें क्षिरें असती ते ॥१॥ म्हणती गोवळ ऐके कान्हा । आहेसि तूं देखणा पुढें होई ॥२॥ आम्ही मेणी थारेमारे । अवनीं गुरें तुज ठायीं ॥३॥ निळा म्हणे कांहीं नाहीं । आम्ही सवेग येऊं मागें ॥४॥

१२१८ मकळी होते राखणाईत । ते ते म्हणती झाला घात । गाई चुकाल्या अकस्मात । पडणपात त्या झाला ॥१॥ मग ते आले प्राथवाळा ॥ पाहाती गाई तंव सुभटा । वत्सें पान्हा घेती घटघटा । पूर लोटले क्षीराचे । ॥२॥ नेणों क्षीरसिंधु सोहळा । पाहों आला कृष्णलीळा । तेणें क्षीराचिया सुकाळा । केले वत्सा आणि गौळियां ॥ ३ ॥ ऐसा झाला संध्याकाळ । तंव पातले गौळणींचे मेळ । सांजवणी दुडिया घेउनि सकळ । करिन गायनें सुस्वर ॥ ४ ॥ गौळी म्हणती गिंजल्या गाई । गोविंद म्हणे दोहा त्यांसी । आजि दुधासी उणेंचि नाहीं । न पुरती पात्रें तैसिचि क्षीरें ॥ ५ ॥ गोकुळ आपुलालिये घरीं । रात्रीं वसती सुखशेजारी । दिवसाजाती वनां-तरीं । वत्सापाठीं हरिसंगें ॥ ६ ॥ निळा म्हणे चतुरानन । आला गो-वत्सें घेऊन । म्हणे नेणतां महिमान । चुकी झाली क्षमा कीजे ॥ ७ ॥

१२१९ गोधनें घेउनी गोपाळ आले । छायेसी बैसले कळंबाचिये ॥ १ ॥ आतां म्हणे मांडा खेळ । गोमटी वेळ सांपडली ॥ २ ॥ तंव कृष्ण म्हणती आधी जेवा । रुचेल बरवा खेळ मग ॥ ३ ॥ पोटांत भुक सुकले मुख । कोणते सुख खेळायाचें ॥ ४ ॥ कोणा कैसा पाहों च्या दिठी । यारे सोडा गाठीं शिदोरियाच्या ॥ ५ ॥ सोडिती सिदोऱ्या दावीती अवघे । तंव एका ऐशी नव्हे एकीपरि ॥ ६ ॥ अरुप एक ते बोलताती बोल । परि अर्थ सखोल विचारतां ॥ ७ ॥ आधीं माझा घास भरी । मग मी श्रीहरी घेईन तुझा ॥ ८ ॥ कान्हा म्हणे ऐकारे बोला । आधीं तुम्ही माझा घांस भरा ॥९॥ गोपाळ म्हणती शेवट गोड । पुरवीं आधीं कोड आमुचा घेई ॥ १० ॥ घाटा घुगऱ्या कोरड्या भाकरी । एकाची शिदोरी सोळीपाकी ॥ ११ ॥ कढण काला कालविले ताक । एकाच्या साजूक दहींभात ॥ १२ ॥ एक ते म्हणती आमुचें अंगीकारी । मुखीं घांस भरी टाकूं नको ॥ १३ ॥ चांगलें कोणाचें आणावें गोपाळा । आमचा हा दुबळा संसार ॥ १४ ॥ तव कान्हा म्हणे आईकारे । तुम-चेंचि आवडे घाला मुखीं ॥ १५ ॥ तुमचीये हातींचें भाजी देठपान । तें आम्हां समान पंचामृता ॥ १६ ॥ आणखी अर्पिती उपाधी जाणिवा । विटली त्याचिया भावा देखोनि मज ॥ १७ ॥ सर्व भावें आम्हां होंचि गोड लागे । दांभिका न लगे भेदकांचें ॥ १८ ॥ मिटक्या देउनियां स्वीकारी श्रीरंग । मग म्हणे विभाग द्यावारे माझा ॥ १९ ॥ अम्ह एक

करि नामाचें सिंचन । सेवारे सज्जन सखे माझे ॥ २० ॥ जेऊनियां घाले गोविंदा पंगती । उद्गार ते देती स्वानुभवें ॥ २१ ॥ धन्य तो सोहळा आनंदांचा खेळ । निळा म्हणे गोपाळ सांगती ज्यां ॥ २२ ॥

१२२० गोपाळ विनोदें बोलती । तिरस्कारिती गोविंदा ॥ १ ॥ लाज ना भये नाहीं कामयासी । मोकळा सकळांसी ठाउका असे ॥ २ ॥ उगाचि बैसे पाहे खेळ । भोवडा सकळ आपणांतुनि ॥ ३ ॥ निळा म्हणे भोगुनी सोळा सहस्त्र नारी । कैसा ब्रम्हचारी म्हणवितसे ॥ ४ ॥

१२२१ गोपाळ म्हणती कान्ह्या आमुची उमाणी । सांगती तरि चरणीं ठेवूं माथा ॥ १ ॥ यावरी श्रीहरि बोले मधुराक्षरीं । पुसारे झडकरी विलंब नका ॥ २ ॥ मीचि मज न देखें । मी माझें नोळखें । कान्हो कोण्या मुखें सांगें आतां ॥ ३ ॥ तंव बोले गोविंदु ऐकारे सावधु । बोधी विराला बोधु म्हणोनियां ॥ ४ ॥ एक म्हणती गोपाळा देखणा माझा डोळा । तरी न देखो मातें आंधळा कैसेनि झाला ॥ ५ ॥ तंव कृष्ण म्हणे द्योतक तूंची प्रकाशक । मृगजळ केंवी अर्क देखेल सांगे ॥ ६ ॥ एक म्हणती गडी रसना रस निवडी । तरि का ने घे गोडी आपुली आपण ॥ ७ ॥ निळा म्हणे कान्हया बोले आमुच्या काजा । सिद्धी गेले गुज पावलेती ॥ ८ ॥

१२२२ गोवळसंगें चोरिया करी । शिंकीं उतरुनीया बाहेरी । आणी फोडी आणि गोवळकरीं । कवळ देत लोणियाचे ॥ १ ॥ दुध तूप साम लोणी । दहीं हुडकुनियां आणी । खाय लवंडी आणि पोरा लागुनी । देउनीयां धणी सुखी करी ॥ २ ॥ देउनी समर्थ हा घेणार । सर्वी सर्वात्मा ईश्वर । म्हणोनियां हा हुडकुनियां घर । आणी बाहेरी लपविले ॥ ३ ॥ कोठेंहि उरो नेदिचि संचित । आणी बाहेरी ते अकस्मात । वाढुनि सैंगडियां देत । आपणहि स्वीकारित त्यांच्या संगें ॥ ४ ॥ देखोनियां ते वृद्ध नारी । बोभाट करिती यशोदे द्वारीं । म्हणती गे कुमारा आवरी । नव्हाडी केली गोरसाची ॥ ५ ॥ नित्य संवकलासे आमुचे घरीं । धांवोनी तो निशीच्या भरीं । निद्रिस्त असतां सिंकीचि उतरी । आणि गोवळां चारी गोरस ॥ ६ ॥ निळा म्हणे न सोसवे आतां नित्य उपद्रव याचा होतां । आणखीही. गुह्य गोष्टी सांगतां । होईल फजित आमुचाची ॥ ७ ॥

१२२३ घरीं आपुलिये मातेपाशीं । देखोनियां मागे शशी । म्हणे देईंवो खेळावयासी । आणुनी तो मज हातीं ॥ १ ॥ येरी म्हणे परिसें ताता । गगनींचा तो नये हाता । नको छळूं रे कृष्णनाथा । नाहीं तेंचि मागों नको ॥ २ ॥ येरु म्हणे पैल दिसे । नाहीं त्यांसी म्हणसी कैसें । येरी म्हणे असाध्य तें असें । नाहींपणाचि सारिखे ॥ ३ ॥ राया घरींची संपदा । दुर्बळा घरीं कैंची सदा । येरु हांसोनियां गदगदा । मुखचंद्रातें दाखवितु ॥ ४ ॥ म्हणे पाहें दसवंतिये । हा गे जवळीच चंद्र आहे । तारे तुटती लवलाहे । षोडशकळीं प्रकाशला ॥ ५ ॥ यशोदा म्हणे न कळे महिमा । तुझा आम्हा पुरुषोत्तमा । दिठावसीलरे मेघःशामा । नको विंदानें करूं ऐसीं ॥ ६ ॥निळा म्हणे ओंवाळून । सांडी वरुनी निंबलोण । मग त्या वोसंगा घेऊन । म्हणे भोजन करी बापा ॥ ७ ॥

१२२४ घरोघरीं हेचि कथा । येरयेरा सांगती वार्ता । म्हणती रायासी पडिली थोर चिंता । पूतनाबाई निमालिया ॥ १ ॥ नवलचि तें ऐकतां परी । कैसी शोषिली निमिषावरी । सांगती दासी त्या परिचारी । ऐका अपूर्व हे कथा ॥ २ ॥ म्हणती स्तना लावितांची वदन । शोषियले जीव प्राण । पूतना रडे आक्रंदोन । म्हणे धांव धांव ओढी यशोदे ॥ ३ ॥ ओढितां न सुटेचि शोषिली । मुक्तिपंथेचि ते लाविली । अवघी देखोनियां तेथ भ्यालीं । सेवकें आली पळोनियां ॥ ४ ॥ येउनी रायातें जाणवले । पूतनाबाईतें बोळविलें । बाळें शोषुनियां घेतलें । परम आश्चर्य हें वाटे ॥ ५ ॥ राया घरीं दुःख थोर । वाढलें झाला चिंतातुर । पुढें काय करील विचार । तें पाहावें नारीनर बोलती ॥ ६ ॥ निळा म्हणे यावरी आतां । अपूर्व आहे पुढील कथा । माभळभटासीं गोकुळा जातां । होईल पूजा पिढीयांची ॥ ७ ॥

१२२५ चित्ताचे चिंतनीं मनाचे मननीं । जीवाचे जीवनीं कृष्ण त्याचे ॥ १ ॥ बुद्धीचे बोधनीं श्रोत्राचे श्रवणीं । आमोद घेतां घ्राणी कृष्णीं मन ॥ २ ॥ देहीं देहभावा नेणती स्वभावा इंद्रियांचा धावा कृष्णरूपीं ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांचा वर्ततां व्यापार । अवघा शार्ङ्गधर होऊनि ठेला ॥ ४ ॥

१२२६ चिरे आणुनियां वेष्टले । गोवळ अवघेचि शृंगारले । येरयेरां म्हणती भले । गौरव भ्यारे मामाचा ॥ १ ॥ चिरे गुंढिती माजेसी । उंच

पटके ते पायासी । मग वेष्टुनियां शिरासी । विमारा टाकिती खांद्यांवरी ॥ २ ॥ ऐसे शृंगारिले गोवळ । पुढें चालिले भार सकळ । तंव ते असुरयांचे वीर प्रबळ । घ्या घ्या म्हणोनी धांविले ॥ ३ ॥ कृष्णें बळरामें देखिलें । अवघ्यापुढें मग ते झाले । धनुर्धारी वेग केले । परि ते न चले बळ त्यांचें ॥४॥ घ्यों घ्या म्हणोनी हाका देती । शंखस्फुरणें ठाईंचि करिती ॥ परी ते गोवळची समर्ती ॥ वेष्टूनियां घेतले ॥ ५ ॥ धनुष्या लाउनियां बाण । विंधावे तो मांजि सिरान ॥ गोवळीं घे तली ते हिरोन । आणि मोडुनी सांडिली ॥ ६ ॥ निळा म्हणे एक एका । नपुरतीची युद्ध तवका ॥ निपातिले फेडिली शंका । आणि पुढें संचरले ॥ ७ ॥

१२२७ जरी तो येईल येथें हरी । तरी मी सहसा विलंब न करी । धोपटुनियां शिळेवरी । तेच क्षणीं टाकीन ॥ १ ॥ काळासम तुल्य माझें बळ । काय तें करील कृष्ण गोवळ । लागों नेदितां एकही पळ । निमिषार्धेचि उपटीन ॥ २ ॥ गोकुळाचिये वाटेवरी । धुणें माझें निरंतरी परि तो आलाचि पाहिजे वैरी । तुझा आणि माझाही ॥ ३ ॥ मागें पाठविले असुर । मायावी ते निशाचर । ते काय बापुडे किंकर । माझिये बळ शक्तीपुढें ॥ ४ ॥ राया येथें एक वेळा । आणवी पां तया गोवळा । मग तूं कौतुक पाहे डोळा । मृत्युपंथें लावीन ॥ ५ ॥ आम्ही तुझे अंगलग । सेवक आणि बळिये चांग । रोखुनिया असों मार्ग । माझें धुणें त्याचि पंथें ॥ ६ ॥ निळा म्हणे ऐशा वचनीं । राजा संतोषविला मर्मी ॥ मग तो उचितातें घेउनी । आला आपुलिया मंदिरां ॥ ७ ॥

१२२८ जन्मोजन्मीं तुमचे दास । न करूं आस आणिकाची ॥ १ ॥ हें तों तुम्ही जाणा देवा । तरि कां ठेवा बोल आम्हां ॥ २ ॥ कान्हो म्हणती पाहिले मन । सखे सज्जन तुम्ही माझे ॥ ३ ॥ निळा म्हणे देइन धणी । ऐसिच चक्रपाणी म्हणे तया ॥ ४ ॥

१२२९ माईजण्या बळें पोरा बालिसी हुंबरी । विचकिसी दांत पुढें पवाडिल फेरी ॥ १ ॥ पाहे हरिकडे । मग हुंबरी घाली कोडें ॥२॥ उडासिलें बळें ज्याच्या वोळखतो आधीं । नाहींतरि वायांजासि न घडे उपाधी ॥ ३ ॥ निळा म्हणे सांगितलें हीत धरी पोटीं । निजभावें शरण रिघे कान्हो जगजेठी ॥ ४ ॥

१२३० जातांचि गोकुळा बाहेरी । कृष्ण पाउलाचिया हारी ॥ उमटल्या देखोनी महीवरी । प्रेमा अंतरीं न संडे ॥ १ ॥ चरणमुद्रांकित चिन्हें । देखोनि घाली लोटांगणें ॥ अंतर्निष्ठेचें हें लेणें । लेउनी निमग्न ते ठायीं ॥ २ ॥ आनंदाश्रु गळती नेत्रीं । स्वेद रोमांच उठती गात्रीं ॥ कंप स्तंभनें विकळ गात्रीं । सद्गदितु मुरकुंडें ॥ ३ ॥ सर्वसाक्षी नारायण । जाणोनियां त्याचें चिन्ह ॥ आला अति त्वेंर धांवोन । तया उचलून आलिंगी ॥ ४ ॥ दोघां हो सरली भेटी । पडिली आनंदाची मिठी ॥ मग अचळ पुसोनियां मुखवटी । परम कृपेनें त्याहाळी ॥ ५ ॥ पुसे अंतरींचें गुज । तयापाशीं अधोक्षज ॥ येरें वंदूनियां चरणरज । मंजुळा उत्तरीं बोलतु ॥ ६ ॥ निळा म्हणे स्तवन करी । मग मी स्तब्ध निमिषवरी ॥ अवलोकुनियां चरणावरी । ठेवीं मस्तक क्षणक्षणा ॥ ७ ॥

१२३१ तंव आली वार्षिक यात्रा । करणें इंद्रपूजा सर्वत्रां । गोरसें काढुनी कावडी भरा । हाकारी तराळ नंदआज्ञा ॥ १ ॥ जाऊनियां पर्वतासी । सुरपती पुजावा प्रतिवरुषीं । जागोनियां त्याची दिवसासी । निद्सुरियां देती आठव ॥ २ ॥ म्हणती उच्छिष्ट न करावें गोरस । दूध दहीं तूप सायस । लोणी भरूनियां कावडीस । रंग लावावा वागरमाळा ॥ ३ ॥ ध्वजा कुंचे सिद्ध करा । विद्या लावूनियां अपारा । जावें परिवारेंसी सत्वरा । प्रातःकाळीं देवपूजे ॥ ४ ॥ गोवर्धनीं सुररावो । पूजा इच्छी देखोनी भावो । यालागीं सकळही समुदावो । जावें आपुल्या कल्याणा ॥ ५ ॥ मेघा तोषोनी यावरी । इच्छिल्या ऐसी वृष्टि करी ॥ तेणें पिकती घुमरी । आणी गोधनेंही दुभती ॥ ६ ॥ निळा म्हणे ऐकोनि श्रवणीं । विस्मय मानी चक्रपाणी । म्हणे मज प्रत्यक्षा सांडुनी । कैचा इंद्र आणियला ॥ ७ ॥

१२३२ तंव कृष्णाभोंवते गोवळ । भासतीं चतुर्मुखचि सकळ । करीत वेदघोष कल्लोळ । पदें क्रमें निरुक्तें ॥ १ ॥ ब्रम्हा म्हणे हें नवल जालें । ते तेथिल येथें हे कोठूनि आले चतुर्मुखहि दिसती भले । न कळे करितवन श्रीहरीचें ॥ २ ॥ मग जोडूनियां पाणितळ । चरणीं ठेवूं इच्छी निढळ । म्हणे म्हणे जी मी केवळ । दास डिंगर कृष्णा तुझा ॥ ३ ॥ ऐसा एक संवत्सर । करीत होता नमस्कार । म्हणे वत्सें आणि कुमर । आण-

वाल तरी आणितों ॥ ४ ॥ इकडे कृष्ण गोवळमेळीं । आपणासवें आपण धुमाळी । खेळत आला पर्वततळीं । आणि वत्समुखें हुंबरला ॥ ५ ॥ चरतां पर्वत मस्तकीं गाई । ऐकोनी हुंकारल्या ते ठायीं । मग उड्या घालूनियां पाहीं । पाजविती पान्हा वत्सांसी ॥ ६ ॥ निळा म्हणे जगत्र-यजीवन । वत्सें झाला असे आपण । यालागीं स्नेहाचें महिमान । अधिकाधिक गायीपोटीं ॥ ७ ॥

१२३३ तंव कृष्ण म्हणे बळिरामदेवा । आमुचाहि वांटा कांहीं ठेवा । ते म्हणती यावरी अवघा । तुमचाचि भाग निश्चितार्थें ॥ १ ॥ कुळवई आणि राजा कंस । अर्थार्थीं हे दिधले तुम्हांस । कृष्णजी म्हणती हें नये चित्तास । यांतहि वाटा पाहिजे ॥ २ ॥ बरें म्हणोनियां बळिराम । यांतहि घ्या हो निमेनिम । मग मिसळले जेंवि निरसावया तम । चंद्रसूर्य पौर्णिमेचे ॥ ३ ॥ तेथें झाला हाहाःकार । घ्या घ्या शब्द उठिला थोर । कृष्ण नेटका झुंजार । आणि बळिरामहि महाबळी ॥ ४ ॥ करूनियां मल्लां महामारी । निर्दाळिले एका निमिषावरी । तंव तो कुळवई लोटिला निशाचरीं । कृष्णें सोंडेसीचि धरियला ॥ ५ ॥ आसडूनियां तो महीवरी । उपटुनी दांत घेतले करीं । ठोकितां तेणेंचि मस्तकारी । ठिकरिया केली गंडस्थळें ॥ ६ ॥ निळाम्हणे बळियाबळि । माजी ब्रम्हांडा एक वनमाळी । यापरी करूनियां रवंदळी । निर्दाळिले असूर ॥ ७ ॥

१२३४ तंव ते आणिले मागिले गोपाळ । सारिखेंचि धैर्य वीर्य प्रताप बळ । हें देखोनियां विस्मित सकळ । म्हणती द्विविध कैसेनि हे झालें । ॥ १ ॥ तैसेचि वत्सें दोनी दोनी । एकएक गाईलागुनी । सुखें पिऊं देती स्तनीं । आणि दुभती घोरसोनी यथेष्ट ॥ २ ॥ तंव ते असमाई गोटी । होतीं अघासुराचे पोटीं । तेचि सांगती वडिला गोठीं । म्हणती नवल वितलें ॥ ३ ॥ आजि आम्हां अवघिया वनीं । घातलें होतें सर्पें वदनीं । मागें होता सारंगपाणी । तेणें तो चिरुनी टाकिला ॥ ४ ॥ मग वत्सें आणि गोवळ । आम्ही बाहेरी पडिलों सकळ । त्याचे पहाहो कर-वाळ । रक्तें पूर वाहाती ॥ ५ ॥ नवल तें ऐकोनि कानीं । लोक चालिले पहावया नयनीं । तंव ते पडिले वाळोनी । गंगाओघा सारिखें ॥ ६ ॥ ये गोष्टीसी झालें वर्ष । गोवळां वाटे एकचि निमिष । निळा म्हणे से-विलें शेष । तेणें सर्वदा समाधी ॥ ७ ॥

१२३५ तंव त्यां म्हणे रे गडिहो ऐका। उतरुनी हाचि आणूं निका। असेल चपळ गडी जो नेटका। तेणें चढावें वृक्षावरी ॥ १ ॥ तंव ते म्हणती नहो बाहेरी। आम्ही बळकट चढावया वरी ॥ वृक्षही उंच गगनोदरीं। डोहो भ्यासुर अक्षोभ हा ॥ २ ॥ म्हणे गडीहो तरी तळींचि रहा। आणितों जाउनी चेंडू पहा। ते म्हणती रे अचपळा रहा। निमित्य आम्हांवरी आणूं नको ॥ ३ ॥ एका दोन कर्मी वांचलासी। तैसेंचि येथेंही पाहतोसी। परी हे बुद्धी नव्हे ऐसी। वेळा सारिखिया नसताती ॥ ४ ॥ पाय निसरोनियां जाईल। अथवा खांची उपटी उपटेल। हांसें इतरांचें होईल। आपणही जिवें घातावें ॥ ५ ॥ ऐसें न करिती शहाणे। विचारुनी पहाती सर्वगुणें। मग हितावह तोचि धरणें। दृढ निश्चयें मानसीं ॥ ६ ॥ निळा म्हणे सांगतां ऐसें। न मानिजे कृष्ण मानसें। मनींचें कार्य जें अनारिसें। तें नेदीचि कळों कोणासी ॥ ७ ॥

१२३६ तंव त्या रिठीयासी निवाळीं वदनें। अति विक्राळ दाढा दशनें। श्रीकृष्ण कंठींचें रुधीरपान। करावया उदितें ॥ १ ॥ कृत्रिमें जाणोनियां ते श्रीहरी। कवळूनि धरिलीं दोहीं करीं। आणि घालूनियां मुखाभीतरीं। चावुनी धरणिये टाकिलीं ॥ २ ॥ त्याचें स्विष्टकृत केलियावरी। आक्रोशें पाळणियांत रुदन करी। तें ऐकोनि यशोदा सुंदरी। धांवली झडकरी काय झालें ॥ ३ ॥ तंव देखे शोणिताचे पूर। मांस मेदाचे संभार। मग म्हणे गे मरमर। बाळ महासर्पे खादलें ॥ ४ ॥ धांविल्या नगरनारी बाळा। घात केला म्हणती सकळ। ऐसी कैशीगे तूं वेल्हाळ। यशोदे मारविलें बाळका ॥ ५ ॥ वाहाती शोणिताचे पुर। इतुकें कैचें गे त्या रुधिर। काढूनियां पहा गे सत्वर। आहे प्राण कीं गेलासा ॥ ६ ॥ निळा म्हणे जाउनी जवळी। काढूनि आणिला जों वनमाळी। तंव हास्यवदन नित्य काळीं। नाहीं कोमाइला ना दचकला ॥ ७ ॥

१२३७ तंव त्या करिती शंखस्फुरण। दीर्घस्वरें आक्रंदन। तें ऐकोनियां नागरीक जन। हाहाभूत वोसरले ॥ १ ॥ तयातें पुसतां त्या म्हणती। दुःखार्णवीं पाडिलें हो भूपती। सांगतां पूतनेची गती। मूर्छित पडती धरणीये ॥ २ ॥ म्हणती जातांचे गोकुळाभीतरीं। प्रवेशता नंदयशोदे घरीं। उभयतां येउनियां सामोरीं। बहुत सन्मानें गौरविलें ॥ ३ ॥

विडे उपचार भोजन । पूतनाबाईतें तोषवून । मग आणिलें राजीवनयन । बाळ तान्हुलें दाखविती ॥ ४ ॥ तंव तें घनःशाम सांवळें । राजीवाक्ष रूप रोखिलें । बाळछेंणें विराजलें । नयनाचि गोंविले देखतां ॥ ५ ॥ मग तें घेऊनियां जवळी । स्तनीं लावितांचि तात्काळीं । सुरासुरा शोषूनियां वेल्हाळी । न सोडी जिवें प्राण जातां ॥ ६ ॥ निळा म्हणे त्या सोडवितां न सुटे पूतना आक्रंदतां । आम्हीही स्वशक्ती ओढितां । हरिलेतत्वता प्राण तिचे ॥ ७ ॥

१२३८ तुमच्या कीर्तनें पावलों पार । भव सिंधूचा लहान थोर ॥ पशुपक्षी दैत्य निशाचर । नारी नर बाळकें ॥ १ ॥ पुण्यपावन तुमची कथा । एकाक्षर श्रवणीं पडतां । झाडा करूनियां दोषां दुरितां । कलिमल तत्त्वता विध्वंसती ॥ २ ॥ हरिनामाच्या घोषगजरीं । ध्वनि रिघतांची कर्णाविवरीं । भितील पातकांचिया हारी । दिशा लंघोनी पळताती ॥ ३ ॥ आनंदासी उणेंचि नाहीं । कोंदेनी ठाके अंतर्बाहीं । नाना चरित्रांची नवाई श्रोते ऐकोनी संतोषती ॥ ४ ॥ गिरी उचलिला गोवर्धन । निज मुखें प्राशिला हुताशन । काळिया आणिला नाथून । मिसें जाऊन चेंडुवाच्या ॥ ॥ ५ ॥ वत्सें गोवळे चतुराननें । नेतां अवघीं आपणचि होणें । स्तनीं लावितां पूतनाशोषण । केलीं विंदानें अघटित ॥ ६ ॥ परता सारुनियां सागर । माजीं रचिलें द्वारकापुर । निद्रा न मोडितां नारीनर । मथुरा नेऊन सांठविली ॥ ७ ॥ काळयवनासी ठकविलें कैसें । मुचकुंदावरी नेला पळत्या मिसें । जाळुनी त्याचे केले कोळसे । आपण निराळा साक्षपणें ॥ ८ ॥ भाजीदेठें तृप्त होणें । पांडवा नेणतां ऋषीभोजनें । परीक्षितीसी गर्भींच रक्षणें । अपूर्व विंदानें श्रीहरीचीं ॥ ९ ॥ यशोदेचें स्तनपान करित । नंदकडिये विराजे तेथ । गोपिकाचे मनोरथ । पूर्ण करित रासक्रीडे ॥ १० ॥ गौळणी रंजवी नानापरी । दहीं दूध लोणी त्यांचें चोरी । उणें पडतां त्यांचिये घरीं । अधिकचि करी वाढूनियां ॥ ११ ॥ गायींमागें धांवे रानीं । चोंगडें काठी पांवा घेउनी । नाना परींचीं खेळे खेळणीं । लीलाविग्रही अवतारी ॥ १२ ॥ ऐशीं अगाध दिव्य चरित्रें । गाती ऐकती त्यांचीं गात्रें । अवघीं होऊनियां पवित्रें । जाती वैकुंठा निळा म्हणे ॥ १३ ॥

१२३९ तेणें दणाणिलें गोकुळ । उतरंडीहि खचल्या सकळ ॥ धांवि-

चले गौळी आणि गोवळ । म्हणती हा रवकल्लोळ कशाचा ॥ १ ॥ तंव ते देखती अवघे नयनीं । वृक्ष पडिले ते उन्मळोनी । आश्चर्य करिती आकुळले मनीं । म्हणती हे कैसेनी उलंडले ॥ २ ॥ यशोदा सांगे तयांप्रती । बांधला होतां म्यां श्रीपती । तेणें येऊनिया अवचिती । उखळ वृक्षाबुडीं अडकविलें ॥ ३ ॥ गौळणी सांगतां गाऱ्हाणें । मीहि संतापलें मनें । तेणें गळा बांधोनियां तान्हें । उखळेंसी म्यां गोंविलें ॥ ४ ॥ गेलें आणिकिया कामासीं । कृष्णें उपडूनियां उखळासी । वृक्ष मोडियेले आवेशीं । माजीं आपणंही पडियेला ॥ ५ ॥ थोर चुकलें हें अरिष्ट । तळीं सांपडतां होतां पिष्ट । ऐसें बोलोनिया अदृष्ट । ताडी आपुलिया निज करें ॥ ६ ॥ निळा म्हणे घेउनी त्यासी । स्फुंदे यशोदा उकसाबुकसी । म्हणे माझिया हृषीकेशी । कोणीहि देखों न शकती ॥ ७ ॥

१२४० ते म्हणतीरे हे सुरपतीची । पूजा आजी देवदेवाची । उच्छिष्ट करूं नये हे कुळींची । आली पद्धती चालत ॥ १ ॥ ऐसें ऐकोनियां गोवळ । धांविले जैसे कृतांतकाळ । कावडी हिरोनियां सकळ । आणिल्या त्या हरिपाशीं ॥ २ ॥ तेणें जाहला हाहाकार । जहाले घाबरे नारी नर । म्हणे केला केला विक्षेप थोर । पूजेमाजीं इंद्राचिये ॥ ३ ॥ अविवेकी हे धांवोनी आले । बळेंचि इंद्रभाग हिरोनी नेले । यावरी आतां नव्हे भलें । क्षोभलिया सुरपती ॥ ४ ॥ कृष्णें उघडूनियां कावडी । गोवळ बैसविले परवडी । म्हणेरे गडिहो सेवा गोडी । अवघियाचीच निवाडे ॥ ५ ॥ आजी आम्हींच इंद्र जाहलों । पूजा घेउनियां तोषलों ॥ वरें उत्तम धणी धालों । तृप्तीवरी स्वीकारा ॥ ६ ॥ निळा म्हणे कृष्ण चंद्रु । आदि इंद्राचाही इंद्रु । यावरी कृपेचा समुद्रु । करील कौतुक आसमाई ॥ ७ ॥

१२४१ तैशींच वत्सें जिचीं जैसीं । होतीं होउनी ठेला तैसीं ॥ कांडी खैरीं मोरीं जांबुळसीं । तांबडीं धवळीं कपिळवर्णें ॥ १ ॥ बुजगीं भिसाकिणें लातिरीं । एके खाविरीं डिंबिरीं ॥ एके अचपळें काविरीं । झाला श्रीहरी सर्व रूपें ॥ २ ॥ देखतां गाईसी फुटे पान्हा । घरींचिया लोभ उपजे मना ॥ ऐशीं स्वरूपें होउनी नाना । खेळे वृंदावना चौपासीं ॥ ३ ॥ येउनी ब्रम्हा पाहे डोळां । तंव पहिलिया ऐसाचि सोहळा ॥

ध्वजा कुंचे धागरमाळा। तोरणें पताका उभविलीया ॥ ४ ॥ शिंगें काहाळा मोहऱ्या पावे। गोवळ नाचतातीं सुहावे ॥ वरी घरूनियां चांदिवे। भोंवतीं छिद्रें वरसांचीं ॥ ५ ॥ ब्रम्हा म्हणे आणिलीं केव्हां। त्यां तो रूपविलीं होतीं एकीसवा ॥ जाउनियां पाहे तंव तो मेळावा। देखिल तेथें तैसाचि ॥ ६ ॥ निळा म्हणे लाविलें पिसें। ब्रम्हया येण्याजाण्याचाचि वळसे ॥ मग लज्जित होउनियां मानसें। करीत स्तवनें श्रीहरीचीं ॥ ७ ॥

१२४२ त्याचिपरि हा मुरारी। पसरला न दिसेचि ऐसा दुरी ॥ चालतू उरगाचिया दरी। पारि तो अहुरीं लक्षित ॥ १ ॥ येतां देखोनिया कृष्णासी। दैत्य हारावला मानसीं ॥ म्हणे साधूनियां निज कार्यासी। जाईन अति त्वरेसी उडोनियां ॥ २ ॥ ऐसें विचारूनियां मानसीं। पक्ष झाडी अति अवेशी। म्हणे कंसाचिया पुण्यराशी। झालिया सन्मुख या काळें ॥ ३ ॥ आतां गिळूनिया नंदकुमरा। खोवीन मस्तकीं यशाचा तुरा ॥ मात जाणवीन राजेश्वरा। मथुरेसी जाऊनी उल्हासें ॥ ४ ॥ म्हणोन आतां राहे सुखी। माझिया बळें तूं इह लोकीं। तोषवीन नृपति पुण्यलोकीं। आम्हा पाळक दैत्यांचा ॥ ५ ॥ परी हा मृत्युचि आला हें नेणतु। वृथाचि मनोरथ वाढवितु। आपआपणासीचि श्लाघवितु। महा मूर्ख तो पापराशी ॥ ६ ॥ मग अति आवेशें धांविला। कृष्णा झगटावया पातला ॥ तंव तो तेणें आसूडिला। तोंडघशीं पाडिला चरणातळीं ॥ ७ ॥ पक्ष धरूनियां दोहीं हातें। उपटूनियां सांडिले परौतें ॥ लीला करूनियां गोपीनाथें। चरणघातें तुडविला ॥ ८ ॥ ऐशियापरी घाबरा केला। चुंचीत धरूनियां घोळसिला ॥ म्हणे मायाविया दाखवीं आला। मायाप्रतापु या काळें ॥ ९ ॥ बहुत दिवस मामाचें अन्न। भक्षिलें झाडा तो घेईन। आजि मृत्युपंथें पाठवीन। गौरव करून ताडनाचा ॥ १० ॥ ऐसें बोलोनियां श्रीहरी। सोडिला तंव तो दीर्घ स्वरीं। गर्जोनियां कृष्णावरी अति तवकें उठिला ॥ ११ ॥ आधीच तंव तो निशाचर। रूप धरूनिया भयंकर ॥ कृष्णा गिळावया सत्वर। मुख पसरुनी धाविला ॥ १२ ॥ हें देखोनि लोक म्हणती। गिळिला गिळिला रे श्रीपती ॥ वेगीं जाऊनियां नंदाप्रती। मात जाणवा वृत्तांताचे ॥ १३ ॥ ऐसा झाला हाहाकार। कृष्णें तीचि

कृष्णरूपेंचि देखतु ॥ २ ॥ जें जें देखे चाखे ऐके । तें तें कृष्णाचिया रूपें एके । ऐसा वधोनियां निष्टंकें । ठेला निजसुखें निजकृष्णीं ॥ ३ ॥ सैन्य. संपदा घरें दारें । स्त्रिया आदि करूनियां लेंकुरें । कृष्णावांचूनियां दुसरें । नाढळेचि जागृतीं निद्रे स्वप्नांत ॥ ४ ॥ कृष्ण देव आले जवळीं । हेंही नेणे तो ते काळीं । कृष्णावलोकनीं हे नव्हाळीं । लाधली भयें आणि द्वेषें ॥ ५ ॥ कृष्णचि या आसनीं शयनीं । कृष्ण भोजनीं त्या प्राशनीं । कृष्णासी देखे जनीं वनीं । घेतला वेष्टुनी कृष्णरूपें ॥ ६ ॥ कृष्णावांचुनी नुरेचि कांहीं । जिवीं मनीं बुद्धी देहीं । कृष्णचि होऊनियां लवलाहीं । कृष्णामाजीं मिसळला ॥ ७ ॥ कृष्णीं कृष्ण तदाकार । होउनियां राजा कंसासुर । पावला विश्रांतीचें घर । योगी साचार न लाहती जें ॥ ८ ॥ निळा म्हणे निजात्मज्योती । कंसाहृदयीं जे बहु काळ होती । ते कृष्णें शोषूनियां निगुती । ठेविली आपुलिये निजहृदयीं ॥ ९ ॥

१३२१ सुकुमार सुंदर । अंगकांति मनोहर ॥ १ ॥ विठो घननीळ सांवळा । लावण्यें मदनाचा पुतळा ॥ २ ॥ कसीयेला पीतांबर । चरणीं ब्रीदाचा तोडर ॥३॥ निळा म्हणे माळा कंठीं । मुगुटीं मोरविसावेटी॥४॥

१३२२ सुरकाडी बैसोनि खोडी चढसी झाडावरी । मोडलिया डाहाळी खांदी पडशील अत्रोरीं ॥ १ ॥ वेंच ऐशावरी । घेऊनि सवें हरि ॥ २ ॥ जगडवाळ झाड वरि खांद्याहि वांकुड्या । उलंडल्या वरूनि हात मोडतील मांड्या ॥ ३ ॥ निळा म्हणे श्रीहरी तें दृष्टी धरूनियां । वेंचे वरी जाई दुरी न पावसी अपाया ॥ ४ ॥

१३२३ सुंदर उटी मलयागरें । वेढिलीं चिरें तेणेंचि ॥ १ ॥ मोरपिसें मुगुटावरी । मुरली अधरी वाजवितु ॥ २ ॥ घनश्याम हा मदनमूर्ती । झळके दीप्ती पदकाची ॥ ३ ॥ निळा म्हणे पांडुरंग । संतसंग आवडता ॥ ४ ॥

१३२४ स्नेह सरतां जसा दीप । सूक्ष्म होतचि हारपे । तयापरी बाईचें स्वरूप । तेणें शोषूनि घेतलें ॥ १ ॥ नाहीं उरविलें शरीर । अवघेंचि केलें निराकार । ऐसें देखोनियां सत्वर । आम्ही निघालों तेथुनी ॥ २ ॥ राया त्यांची भेटी गोष्टी । न व्हावी तुम्हाही शेवटीं । अकस्मात आलिया राहाटी । करील पूतनाबाई सारिखी ॥ ३ ॥ ऐसें ऐकतांचि

श्रवणीं । राजा पडे मूर्छीत धरणीं । म्हणे गेली गेलीरे मायबहिणी । माझी पूतनेसारिखी ॥ ४ ॥ महाबळें अति उत्कंठ । मंत्रियांमाजीं परमश्रेष्ठ । आतां कायसी पाहों वाट । गेली नये त्या निजपंथें ॥ ५ ॥ मग रायातें संबोधून । प्रधान आणि नागरीक जन । म्हणती नव्हे भलें हें महा विघ्न । उदेलें देखत देखत ॥ ६ ॥ निळा म्हणे याहीवरी । श्रीहरिचरित्राची थोरी । अधिकें अधिक ते कुसरी । परिसावी सज्जनीं सादर ॥ ७ ॥

१३२५ संवर्तक वर्षेल जळधारीं । तुवांहि झगटावें तंव त्यावरी । ऐसें सांगोनियां प्रेरिले वरी । पांचाहिजण अति क्रोधें ॥ १ ॥ आज्ञा होतांचि चालिले मेघ । पवन त्याही पुढें सवेग । तेणें अभ्रें दाटलीं अनेग पाडिला अंधकार गोकुळावरी ॥ २ ॥ विजुवा चमकती लक्षवरी । कल्पांत काळींच्या जैशा हारी । देखोनियां हे गजबज भारी । झाली गोकुळीं सर्वे जनां ॥ ३ ॥ म्हणती कालिचि याची इंद्रपुजे । विध्वंसिलें या नंदात्मजें । तेणेंचि क्षोभोनियां सहस्त्रांबुजें । मेघ धाडिले गर्जती ॥ ४ ॥ आतां जावें कोणीकडे । पळोनियां देवक्षाभापुढें । अकस्मात अरिष्ट हें एवढें । आणिलें कृष्णें आम्हांवरी ॥ ५ ॥ मागिल्या अरिष्टांत वांचला । तेणेंचि बहुत वेळ घेतला ॥ घात आमुचा येणें केला । गाईगोवळांसमवेत ॥ ६ ॥ तंव सुटला झुंजात वारा । मेघें घातल्या सरळ धारा ॥ निळा म्हणे नंदकुमरा करणें त्याचा अवमान ॥ ७ ॥

१३२६ हरीच्या पायीं विश्वासले । सवंगडे झाले ह्मणउनी ॥ १ ॥ दिवस राती नव्हतां तुटी । सांगतीं गोठी आलौकिका ॥ २ ॥ ब्रम्हानंदें खेळती खेळ । करिती कल्लोळ गीतवाद्यें ॥ ३ ॥ निळा म्हणे निर्भय चित्तें नाणिती काळातें निजदृष्टीं ॥ ४ ॥

१३२७ हें देखोनियां गोवळ । आले धांवोनियां सकळ । कृष्णासी ह्मणती युद्ध तुंबळ । केलें तुवां वृषभेंसी ॥ १ ॥ आम्हीं देखिलें दुरोनी । होतों डोंगरीं बसोनी । तो बैल आम्हांलागुनी । कृष्णा कोण तो सांग पा ॥ २ ॥ येरु म्हणे तो असुर । तुम्हां भासला होता ढोर । कंसरायाचा तो हेर । जाता वधुनी सकळांतें ॥ ३ ॥ ऐसा जाणोनियां निभ्रांता शांति पाववला तो आतां । तुम्ही भयातें न धरितां । सुखें विचरा मत्संगें ॥ ४ ॥ माझिये भजनीं जे राहाती । त्यांचिया विघ्नांची शांती । करूनिया

सुखविश्रांती । तथा अर्थी सर्व सिद्धी ॥ ५ ॥ ऐसें ऐकोनियां हरिवचन । संतोषले सकळही जन । मग नमस्कारूनियां उभय चरण । गोकुळाप्रती चालिले ॥ ६ ॥ निळा म्हणे सांगती वडिलां । वनीं वर्तमान जो देखिला धेनुकासुर तो निपातिला । आजीं कृष्णें युद्धसंधीं ॥ ७ ॥

१३२८ होते लेऊनियां आर्तीचें अंजन । तेणें देखिलें वो निक्षेपींचें धन । होतें वेदगर्भे ठेविलें जोडून । तेंचि सांपडलें आईतें निधान वो ॥ १ ॥ जनीं जनार्दन प्रत्यक्षचि होता । तोचि मुसावोनी कृष्ण झाला आतां । मंडित चतुर्भुज वेणु वाजविता । मुकुट कुंडलें वो माळाचा मिरवता वो ॥ २ ॥ प्रगट असोनियां न दिसेचि कोणा । आड आलिया वो बुद्धीची कल्पना । जाय हारपोनी अविद्येच्या भावना । तेणेंचि न देखती मूर्ती भगवाना वो ॥ ३ ॥ कैसा माया मोहें भ्रमला गाढा । नेणें जाणीवची धांवें पुढा पुढा । विधी निषेधाचा मारा झगडा । तेणें अंतरल्या न सांपडे मूढा वो ॥ ४ ॥ इंद्रिया विषयाची सदा लगबग । मातले अहंकार काम क्रोध मांग । मदमत्सराचे धांवती निलाग । तेणें हातींच्या हातीं अंतरला श्रीरंग वो ॥ ५ ॥ ऐसे चुकवुनी अवघात अपार । आजीं सांपडलें आईतें भांडार । तेणें झालिये वो निजसुखें निर्भर । निळा म्हणे भोगूं सुखाचे संभार वो ॥ ६ ॥

१३२९ कोटी मदनाचा बाप । प्रभा फांकली तेज अमुप । भुषणें विराजली दिव्य स्वरूप । नंदें पाहिला निज नयनीं ॥ १ ॥ मग यशोदेपाशीं आणिला । म्हणे हा वसुदेवें दिधला । येरी म्हणे हा चोरियेला । कोणाचा तानुला न कळे हें ॥ २ ॥ वसुदेव सदाचा भिकारी । बंदी कंसा चिये चिरकाळ वरी । बालक सुलक्षण हा निर्धारी । असेल सभाग्या समर्थाचा ॥ ३ ॥ येरु म्हणे आहे पोटींचा । आत्मा जिवलगु हा आमुचा । नाहीं वो आणिला लोकांचा । म्हणोनिया देतो तुम्हांप्रती । ॥ ४ ॥ येरी म्हणे आमुचें कन्यारत्न । याच्या पालटा न्या करा यत्न कंसा पुसतांचि तया दाऊन । चुकवा अरिष्ट सकळांचें ॥ ५ ॥ यावरी कृष्णातें निरवून । वसुदेव निघाला माया घेऊन । पुढती बंधनें पावला । बांदिखान । विचित्र विंदान शक्तीचें ॥ ६ ॥ श्रीकृष्णदेवेंसी अंतरावो। संतांचि प्राप्त झाला मोहो । अविद्यायोगें चिंताप्रवाहो । महार्णवीं पडि-

येला ॥ ७ ॥ निळा म्हणे हिताहित । नाठवेचि कांहीं झाला भ्रांत । मायादेवांची हा प्रवात । झाला आप्त वसुदेवा ॥ ८ ॥

१३३० मग बोले मंजुळा उत्तरीं । मज न्या जी गोकुळाभीतरीं । ठेवुनी नंदयशोदेच्या घरीं । तुम्हीं यावें तेच क्षणीं ॥ १ ॥ ऐकोनी तयाचें उत्तर । वसुदेव विस्मित आणि चिंतातुर ॥ म्हणे कैसा करावा विचार । बंधनें गोविलें मजलागीं ॥ २ ॥ ऐशिया मोहें त्या कवळित । तंव तुटलीं बंधनें झाला मुक्त ॥ म्हणे आतां हा कृष्णनाथ । नेईन गोकुळांत ठेवीन ॥ ३ ॥ मग घेऊनियां निज बोधेशीं । आला वसुदेव गोकुळाशीं ॥ देउनिय त्या नंदापाशीं । म्हणे हें स्वीकारा बाळक ॥ ४ ॥ जन्मलें देवकीचिये उदरीं । परि हें ठेवितां नये कीं घरीं ॥ आहे कंसाचें भय भारी । यालागीं तुम्हां हें कृष्णार्पण ॥ ५ ॥ ऐशिया उत्तरीं बोलिला । बाळक त्यापाशीं दिधला ॥ उघडोनि नंदें जो पाहिला । तंव तो देखिली चतुर्भुज ॥ ६ ॥ निळा म्हणे वोळलें भाग्य । घरां आलें पुसत चांग ॥ उद्धरावया सात्विक जग । केला वास तया घरीं ॥ ७ ॥

१३३१ वसुदेव देवकीचिये उदरीं । कृष्ण जन्मले मथुरेभितरीं । कंसाचिये बंदिशाळे माझारीं । श्रावण कृष्णाष्टमी मध्यरात्रीं ॥ १ ॥ अयोनिसंभव चतुर्भुज । शंख चक्र गदांबुज ॥ चहूं करीं आयुधें सुतेज । मुगुट कुंडलें वनमाळा ॥ २ ॥ कासे पीतांबर कासिला । कंठीं कौस्तुभ तेजागळा ॥ श्रीवत्सलांछन शोभला । माजीं मेखळा जडिताची ॥ ३ ॥ मस्तकीं मुगुट रत्नखेवणी । रत्नमय कुंडलें उभय कर्णीं ॥ देखोनियां देवकी नयनीं । म्हणे या कैसेनि आच्छादूं ॥ ४ ॥ देखतां वसुदेवहि विस्मित । म्हणे बाळ नव्हे हा जगन्नाथ । सायुधें भूषणें घवघवित । तेजःपुंज निजात्मा ॥ ५ ॥ देवकी लागोनियां पायांशीं । म्हणे गोकुळां नेऊनि लपवा यासी । विदित झालिया रायासी । नेदी वांचो या बाळका ॥ ६ ॥ निळा म्हणे ऐशी चिंता । आकळुनी ठेला तया उभयतां । हें देखोनिया कृष्णनाथा । कळों सरलें हृद्गत ॥ ७ ॥

काला चेंडु फळि

१३३२ अंतरंग माझे गडी । न गमे तुम्हांवाचुनि घडी ॥ १ ॥ यारे जवळीं फांका नका । झकवल्यासवे कोणा लोका ॥ २ ॥ तुमचीं

गोड वाटे संग । शहाणे उबग मज त्यांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे भाविकां प्रती । येऊनी काकुळती बोलतु ॥ ४ ॥

१३३३ आतां माझ्या सहवासें रहा । होईल पहा कौतुक तें ॥१॥ चला जाऊं मांडू खेळ । म्हणती गोपाळ बहुत बरें ॥ २ ॥ खेळो हुतुतु वांटुनि गडी । पुढेंहि परवडि विटिदांडू ॥ ३ ॥ निळा म्हणे श्रीहरि शहाणा । नागवेचि कोणाडाया तळीं ॥ ४ ॥

१३३४ आतां मी पुसेन तें सांगारे उमाणें । तुम्ही आलेती कोठुनी जाणें कोठें ॥ १ ॥ मग विचारिती गोवळ म्हणती नेणों मूळ । ऐसेचि आम्ही आढळ दास तुझे ॥ २ ॥ म्हणतो नंदाच्या पोसण्या । दार सुण्या दासाच्या ॥ ३ ॥ जेथुनी तुझें येणें तेथुनि आमुचें जीणें । जाशील तेव्हां जाणें तुजचीं संगे ॥ ४ ॥ निळा म्हणे ऐकोनियां संतोषले हरि । म्हणती यारे यावरि खेळ खेळों ॥ ५ ॥

१३३५ आंगा आणुनि वारें पेरा घालिसि हमामा । निघोनियां जाईल पुढें पडसि येउनि दमा ॥ १ ॥ घुमे एक्याभावें । हा गोपाळ घेउनि सर्वे ॥ २ ॥ तोंडा येतो फेंस पुंटेला नाचसिल वारे । पडतां निसतोश जग हांसतिल पोरें ॥ ३ ॥ निळा म्हणे सकळही सोडुनियां तमा । एका हरिविण तया नांव हमामा ॥ ४ ॥

१३३६ कपाळ भेटि मिसे बोट लावितेसी उल्लाटीं । तेंचि नमन अर्पी बाई कान्हो जगजेठी ॥ १ ॥ सहजाचिया खेळा गे जोडि घननीळा । नलगे कांहीं घेणें देणें परि हा तो जवळा ॥ २ ॥ नमन हेंचि निज गे परमार्थाचें बिज । सहज भावें नमुं जातां जोडे अधोक्षज ॥ ३ ॥ निळा म्हणे आतां गे वर्म आले हातां ॥ श्रीहरिच्या संग सुखें गाउ गुण कथा ॥ ४ ॥

१३३७ करितां उसी हतां नये चेंडु गमाविला । धरूनि कानिं पाठिवरी बैसविती मुञ्जा ॥ १ ॥ म्हणती म्हण कीर । नाहींतरी घेई फेरे ॥ २ ॥ आधिकें आधिक वरिसाच्या घेउं येती । गमावितां चेंडु हाल अवघेचि पहाती ॥ ३ ॥ निळा म्हणोनियां लावि लक्षडोळां । देईल हातिं चेंडु हरि कृपेचा कोवळा ॥ ४ ॥

१३३८ खेळ मांडी गडीयांसवें । आपण लपावें लपवी त्या ॥१॥

म्हणे अवघे झाका डोळे । आपण पळे पळवी त्यां ॥ २ ॥ आला डाव घावी पाळी । मागे जवळी गडियांही ॥ ३ ॥ निळा म्हणे पाठीवरी । बैसे हरि बैसवी त्यां ॥ ४ ॥

१३३९ खेळवी चाळवी । हातीं धरुनियां नाचवी ॥ १ ॥ ऐसी कृपेची ओतली । माझी विठाई माउली ॥ २ ॥ जाणे भुक तहान । वारा लागों नेदी ऊन ॥ ३ ॥ निळा म्हणे लाड । पुरवी करूनियां कोड ॥ ४ ॥

१३४० खेळे हेटि मेटी नाचे एकाचि पायावरी । धांवोनियां सिव आतां आत्मया श्रीहरि ॥ १ ॥ तरिच खेळ बरारे । नाहिंतरी चेरा ॥२ ॥ धांवति तो पोरें पळता धारि वेगावत । सारुनिया मागें गिती गाई भगवंत ॥ ३ ॥ निळा म्हणे चपळपणें करि कार्य सिद्धी । नाहीं तरी पोधा होतां नपवसी कधीं ॥ ४ ॥

## कोलकाठी.

१३४१ खेळो कोलकाटि पुढें धांवसील वेगें । वारुनि वरिच्यावीर राखो नेणसी तूं आंगें ॥ १ ॥ आतां खेळ कोलकाटि । रे गोपाळ धरुनि दृष्टी ॥ २ ॥ राखों जातां गाडि दांडे सिवताति आंग । नावरति तुज तरी बाउगेंचि सोंग ॥ ३ ॥ निळा म्हणे वस्ताद करि नंदाचा नंदन । तोचि देईल विद्या तुज करिल प्रवीण ॥ ४ ॥

## खेळाचीं रूपकें.

१३४२ खेळों पंढखडेगे बैसोनि निवाडे आधीं । उचली एक मग दोनि घेईं पुढें ॥ १ ॥ सावधान चालिगे नेमाचेचि झेलि । दोनी तीन पांच सांत सांडियेक उचली ॥ २ ॥ नेंदिला गोढका दुसरि यामि झोका । हळुचि घेईं उचलुनियां तरिच खेळ निका ॥ ३ ॥ निळा म्हणे हरिगे साक्ष निरंतरी । तोचि जाणे सर्व आहे तुज मजही माझारी ॥ ४ ॥

## सुरकांडी.

१३४३ चढोनियां झाडा पोरा खेळसी सुरकाडी । निसरता हात पाय माझा होईल मोडा ॥ १ ॥ धरुनी हरि चित्तेसी खेळे वरिझाडा आभिमानें जासि तरी होईल चुराहाडा ॥ २ ॥ दिसति त्या खांद्या पोरा मोठ्यापरी ठीसरी । मोडती आंगभारें याचा विश्वास न धरीं ॥३॥

निळा म्हणे सांगितलें धरि चित्तें मनें । मग तूं चढेवरी सुखें हिंडेसांग॥ पानें ॥ ४ ॥

१३४४ चाल म्हणसि बाईगे खेळों लपंडाई । जेथें तेथें साक्ष कान्हा लपो कोणे ठाई ॥ १ ॥ झाकुनिया डोळागे सतविली चपळा ! लपों जाति जेथें कलखलिति बाळा ॥ २ ॥ पडसाई नसेगे अवघाचि प्रकाशे वर्ते सर्वठाई । व्यापुनि आत्म वनमाळि बसे ॥ ३ ॥ निळा म्हणे खेळगे अवघाचिहो पळ । जेथें तेथें साक्ष पणें वर्ते हा गोपाळ ॥ ४ ॥

१३४५ झेटि मेटि वाईगे लवे हरिच्या पायीं । वमम गमता हेचि परमार्थाची सोई ॥ १॥ निढळासी बोट लावितेसी वेळोवेळां । नमनाचि होतें सहज खेळतां या खेळा ॥२॥ उत्तमहा खेळगे खेळतां निर्मळ नमनीं नमितां हातां येतो या गोपाळ ॥३॥ निळा म्हणे जग तुज करिल कृपा मग येऊंनिया वास करितां हृदयीं श्रीरंग ॥ ४ ॥

## टिपरिया

१३४६ टिपरियाचे घाई गे नाच सुखें बाई । गिती गाऊनियां हरिचें संगमसुख घेई ॥ १ ॥ नाचोनियां फेरि गे गुण त्याचे उच्चारी । जेणें काग बग रिठा मर्दियले वैरी ॥ २ ॥ ऐसें गाई गाणें गे हरि जोडे जेणें । येर येऊं नेदी वांचें लटकी ते वांयाणे ॥ ३ ॥ निळा म्हणे नामें गे तोडी मरण जन्में । ऐसा हरि गीतीं गातां हरतील कर्मे ॥ ४ ॥

१३४७ तरिच वरवंटा गे लई लखोटा लई लखोटा । फिरोनियां न वज-सी यमपंथें वाटा ॥ १ ॥ लखोट्याच्या भारें गे नव जाये चाचरी । धरूनियां तारा निजवृत्ति हे सावरी ॥ २ ॥ हरिचिया छंदें गे डोल ब्रम्हानंदें । घालूनियां पायांतळीं इंद्रचंद्रपदें ॥ ३ ॥ निळा म्हणे खेळीं गे जोडी वमनाळी । नाहिं तरि मायामोहें पडशील भव जाळीं ॥ ४ ॥

१३४८ तरिच पिंग्या गोडिगे लावोनि आंग मोडी ॥ नाहीं तरि परती सर म्हणतीं जा धांगडी ॥ १ ॥ फिरविसी मान जरि हरीतें लक्षून । तरिच खेळ रुचेल तुझा मानवती जन ॥ २ ॥ राहे उभी नीट गे होऊनिया धीट ॥ नाहीं तरि झोंके खातां म्हणती फटफट ॥ ३ ॥

निळा म्हणे श्रीहरि आठवी गे अंतरीं । तरिच पिंगा मानेल जगा धन्य म्हणती नरनारी ॥ ४ ॥

## हुतुतू

१३४९ धरोनियां श्वास पोटीं सेवो पाहासी हाल । न पवसी स्थळ भोंवतां गडियांचा मेळ ॥ १ ॥ हुतुतु हुतुतु किती करिसी वेळोवेळां । होऊनियां नम्र भजे घननीळ सांवळा ॥ २ ॥ धांवतां अविचारें पोरें धरितील टांगे । चालतां वळ मागें पडशील उगे ॥ ३ ॥ निळा म्हणे सांडूनियां हुतुतूचा बार । आठवी हा ध्यानीं मनीं नंदाचा कुमर ॥ ४ ॥

१३५० पाडूनि लगोऱ्या चेंडुवाच्या एका घायें । सुखी खेळे खेळ साह्य करूनि हरीचे पाय ॥ १ ॥ खेळे ऐसा खेळ । मनीं धरुनि घननीळ ॥ २ ॥ जातां चेंडु न सांभाळे उसी । धांवतांचि मरती पोरें होती कासाविस ॥३॥ निळा म्हणे झेलूनिया हेई वरिच्यावरी । एकविध भावें शरण जाऊनियां हरी ॥ ४ ॥

## पिंगा

१३५१ पिंगा म्हणिजे पिळंगोनि भिरभिरियाचे परी । फिरविसी माज मान तरि तुझी थोरी ॥ १ ॥ चित्त हरिवरी गे ठेवूनि दे भोंवरी । नाहीं तरि सर परती येथूनि जाय दुरी ॥ २ ॥ वाउगाचि ताठा गे नाहीं वळवटा । येथें नाहिं काम तुझें जाई आल्या वाटा ॥ ३ ॥ निळा म्हणे निजानंदें कांपवी शरीर । धरूनियां निज मनीं रुक्मिणीचा-वर ॥ ४ ॥

१३५२ पेहरंब्याचे सोई गे सारविसी भुई । परि येथें तेथें असे अवघाचि हरि पाही ॥ १ ॥ कांपविनां हात जरि सावधान चित्त । तरीच होईल मान न पावतां घातपात ॥ २ ॥ नाचविसी पाय गे घोळ-सूनि भोय । परि नग्न दाखवितां जगीं हांसे होय ॥ ३ निळा म्हणे बरा गे विचार करी धीरा । आठवूनि हृदयांत राहे शारंगधरा ॥ ४ ॥

१३५३ मिळाले गोपाळ बेसले पाळीं । मध्यें वनमाळी विराजला ॥ १ ॥ यारे म्हणती खेळ मांडू । विटीदांडू लगोरीचा ॥ २ ॥ हूंबरी

बारे नाचों फेरे । टिपरी अखरे भोंवतालीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जाउनी बाचें । कान्होबाचे पवाडे ॥ ४ ॥

१३५४ लगोरिया मांडूनि पोरा वांटशील गडी । निर्बळाच्या संगें डाव देतां येसी रडी ॥ १ ॥ न करीं ऐसें आतां । करीं गडी श्रीअनंता ॥ २ ॥ मारितांचि लगोऱ्या आधीं येतो हाता डाव । चुकलिया व्याहाण वांटी हांसतात सर्व ॥ ३ ॥ निळा म्हणे वायांविण नको पावो खेदा । याचिलागीं न विसंबे श्रीहरि गोविंदा ॥ ४ ॥

१३५५ वांटूनियां गडी चेंडु मांडियेली फळी । मेळासी धांवतां कान्हो नाटोपेचि बळी ॥ १ ॥ येईल चेंडु हातारे । हरिसी शरण जातां ॥ २ ॥ पाडिल्या लगोऱ्या जेणें तेणेंचि नेला डावो । वाउगींची शीणति येरें धावतां गेले पावो ॥३॥ म्हणे निळा शरण गोपाळा जाई करीं तातडी । तरीच चेंडु येईल हाता पांगविसी गडी ॥ ४ ॥

१३५६ विटी दांडु भलारे तरीच मारीं टोला । नाहीं तरि डाव घेतां धांवडिसी मुला ॥ १ ॥ सावधान पाहेरे हरीचि चित्तीं ध्याये । न राहोनि निदसुरा खेळाच्या प्रवाहें ॥ २ ॥ होणें नीट दांडुरे नाहीं तरी नाडु वाउगाचि टोला होतां पावसील दंडु ॥ ३ ॥ निळा म्हणे हरिमुखें हाणतांचि सुनीति । न चुके जो त्वरा करी तोचि पावे कीर्ति ॥ ४ ॥

१३५७ विटियादांडू मांडिती खेळा । मेळवूनि मेळा सवंगडियांचा ॥ १ ॥ सूं म्हणोनियां मारिती टोला । हांसती त्याला डाव घेतां ॥ २ ॥ धांवती एक ते उभेचि ठाकती । जिंकोनियां मानिती आपणा धन्य ॥ ३ ॥ निळा म्हणे खेळ मोडारे गडीहो । कान्होबाचे पाहों पाय आतां ॥ ४ ॥

## आरती ज्ञानेश्वराची.

१३५८ होतां कृपा तुझी पशु बोले वेद । निर्जीव चाले भिंती महिमा अगाध । भगवद्गीताटीका ज्ञानेश्वरी शुद्ध । करूनि भाविक लोकां केला निजबोध ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय ज्ञानसिंधू । नामस्मरणें तुमच्या तुटे भवबंधू ॥ ध्रु० ॥ चौदाशें वरुषांचे तपी-तीरवासी । येऊनि चांगदेव लागती चरणांसी । करूनि कृपा देवें अनुग्रहिलें त्यांसी । देउनी आत्मज्ञान केलें सहवासी ॥ २ ॥ समाधिसमयीं सकळ समुदाय । घेउनी सुरवर आले श्रीपंढरिराय । द्वारीं अजानवृक्ष सुवर्णपिंपळ अपुमाय । जाणोनि महिमा विठ्ठल चरणीतळीं राहे ॥ ३ ॥

१३५९ फुंकिसी जगा गडी गे तरि घालीं फुगडी । नाहीं तरी नको करूं फजिती रोकडी ॥ १ ॥ मोडीं आंग बाई गे नाचण्याचे सोयीं । आठवूनि श्रीहरीचा निजानंद देहीं ॥ २ ॥ त्या नांव फुगडी गे बंधनातें तोडी । नाहीं तरि कांपवूनि काय टिन्या मांडी ॥ ३ ॥ निळा म्हणे जोडीं गे देवासवें गडी । आठवूनि ध्यानीं मनीं रूप घडीघडी ॥ ४ ॥

## काला.

१३६० काला करिती संतजन । सर्वे त्यांच्या नारायण ॥ १ ॥ वांटी आपुल्या निजहस्तें । भाग्याचा तो पावे तेथें ॥२॥ लाही सित लागे हातीं । दोष देखोनियां त्या पळती ॥ ३ ॥ निळा म्हणे क्षीराचा बुंद । लागतां पावे ब्रह्मानंद ॥ ४ ॥

१३६१ कावडी भरूनि आणिलीं क्षीरें । दहीं घृत सारें नवनीतें ॥१॥ ओदनाचेही पर्वत आले । माजि ते केले मिश्रित ॥ २ ॥ भोंवते गोपाळ मध्यें हरी । दाविती कुसरी नृत्याची ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मानंदु । लोटला सिंधु क्षीराचा ॥ ४ ॥

१३६२ क्रीडा करी गोपाळपुरीं । आपण श्रीहरि गोवळांसरें ॥ १ ॥ वेणुवादन सप्तस्वरें । वेधी जिव्हारें सकळांचीं ॥ २ ॥ नृत्य करी नाना छंदें । नाचवी विनोदें संवगडियां ॥ ३ ॥ निळा म्हणे दधिओदन । काला कालवून जेवितु ॥ ४ ॥

१३६३ गोवळ देती उष्टावळी । म्हणती गोड हें वनमाळी । चाखुनियां श्रीमुख त्या कमळीं । परम संतोषें स्वीकारी ॥ १ ॥ आवडीचें तेंचि तें गोड । भाव देखे ज्याचा वाड । त्याचेनि घे ये रानीं चाड । दांभिकें अभिमानियांचें वोसंडी ॥ २ ॥ ऐसा करिती गदारोळ । घालिती येरयेरा मुखीं कवळ । ब्रह्मानंदाचा सुकाळ । हास्यविनोदें जेविती ॥ ४ ॥ नाना लावणशाखाच्या परी । नाना पत्रशाखा वाढिल्या वरी । नाना अन्नाअन्नाच्या कुसरी । जेविती मुरारीसमवेत ॥ ४ ॥ म्हणती आजच्या जेवणा । आम्हां श्रीहरी हा पाहुणा । न म्हणे उच्छिष्ट शिळें कोणा । अवघियांचें स्वीकारितु ॥ ५ ॥ ऐसे जेउनियां धाले । तंव गाईंचे कळप देखिले । पाहती तंव नवल वर्तलें । बुजाल्या पळती जीवधाकें ॥ ६ ॥ निळा म्हणे उठिला पाळा । अवलोकिती जो अवघे डोळा ॥ तंव त्या देखियल्या ज्वाळा । वणवा जळत चौफेरीं ॥ ७ ॥

१३६४ चुचकारूनि गोधनें बैसविलीं आखरीं । म्हणती याहो श्रीहरि खेळों आतां ॥ १ ॥ धांवती वेढाळें आवरिलीं सकळें. । झालों तुझिया बळें बळीवंत ॥ २ ॥ नाचवीसी तैसे नाचों सुखें आतां । काळ-यिया माथां ठेवूनि पाय ॥ ३ ॥ निळा म्हणे केलों सांगाती दैवाचे । देउनि सुखाचें भोजन आजी ॥ ४ ॥

१३६५ तंव पातला माध्यान्हकाळ । गोवळां भुकेची झाली वेळ । मग पाहोनियां उत्तम स्थळ । सुरतरु शीतळ छायातळीं ॥ १ ॥ तेथें बै-सविल्या पंगती । घोंगडी घालूनियां खालतीं ॥ कृष्ण म्हणे गडियांप्रती । शिदोऱ्या एकत्र कालवूं ॥ २ ॥ गोवळ म्हणती बहुत बरें । कृष्णा तुझिया निजकरें । होईल अमृताचि तें दुसरें । जेवूं आदरें शेष तुझें ॥ ३ ॥ नारदें तें ऐकिलें कानीं । सांगे सत्यलोकां जाउनी । ब्रह्मयातें म्हणे चक्रपाणी । आजि ब्रह्मरस वांटितो ॥ ४ ॥ देवा जाउनियां तेथें । शेष घ्यावेंजी कृष्णहातें ॥ तरी हें पद राहेल निरुतें । नाहीं तरी अल्पायु ॥ ५ ॥ कृष्णशेषाचा हा महिमा । सांगतां अति निरुपमा ॥ पावोनियां निष्काम कामा । पद अच्युत सुखप्राप्ती ॥ ६ ॥ निळा म्हणे नारदवचनीं । ब्रह्मदेव चालिले तेथुनी । पाहाती तंव वृंदावनीं । गोवळ नाचती चौफेरीं ॥ ७ ॥

१३६६ देतां शिव्या हांसों लागे । निंदा श्लाघे ऐकोनी ॥ १ ॥ करिती त्यांचें अवघेंचि गोड । करुनि कोड स्वीकारी ॥ २ ॥ जेवितां देती उष्टावळी । घाली कवळी मुखींचि त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे धणी-वरि घाले । म्हणे मी पावलों पाहुणेर ॥ ४ ॥

१३६७ यारे गडिहो घेऊं धणी । काला वदनीं श्रीहरीचा ॥ १ ॥ सांडूनियां अभिमान दुरी । नाचों फेरीं गोविंदा ॥ २ ॥ देखोनि भाव अंतरींचा । देईल हातींचा विभाग ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रम्हरस । उरलें शेष हरीचें.तें ॥ ४ ॥

---

## आळंदीची व पंढरीची समतुल्यता.

१३६८ एक भूवैकुंठ एक शिवपीठ । महिमा वरिष्ठ दोहांचा ॥ १ ॥ येथें पेरिलें नुगवे शेतीं । अस्थी विरती तेथें उदकीं ॥ २ ॥ चंद्रभागा च-

[illegible]तीर्थ । भीमा समर्थ इंद्रायणी ॥ ३ ॥ निळा म्हणे तेथें हनुमंत । येथें अश्वत्थ कनकाचा ॥ ४ ॥

१३६९ पंढरपुरीं ज्ञानेश्वरी । मुक्ति कामारी वोळंगती ॥ १ ॥ तेथें देव येथें भक्त । महिमा अद्भुत दोहींचा ॥ २ ॥ तेथें ध्यान येथें ज्ञान । परलोक साधन दो ठायीं ॥ ३ ॥ निळा म्हणे तेथें गरुड । येथें झाड आजानतरु ॥ ४ ॥

## अलंकापुराचें वर्णन.

१३७० यात्रे अलंकापुरा येती । ते ते आवडती विठ्ठला ॥ १ ॥ पांडुरंगें प्रसन्नपणें । केलें देणें हें ज्ञाना ॥ २ ॥ भूवैकुंठ पंढरपुर । त्याहुनी थोर महिमा या ॥३॥ निळा म्हणे जाणोनी संत । येती धांवत प्रतिवर्षी ॥४॥

१३७१ वर्णितां महिमा तो अगाध । जेथें सिद्ध अवतरले ॥ १ ॥ पशुमुखें वदवूनी श्रुती । निर्जीव भिंती चालविली ॥ २ ॥ सन्मुख पुढें अजानवृक्ष । पिंपळ प्रत्यक्ष सोन्याचा ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐकोनी कीर्ती । चांगदेव येती दर्शना ॥ ४ ॥

---

## ज्ञानपर.

१३७२ अमृत गोडिये नाहीं भिन्नपण । प्रभा रविकीर्ण जयापरी ॥ १ ॥ अलंकार सोनें काय तें वेगळें । डोळियां बुबुळें वेगळिक ॥ २ ॥ नभा अवकाशा कोण भिन्न करी । वस्त्रतंतुपरी देवभक्त ॥ ३ ॥ निळा म्हणे प्राण तोचि प्रभंजन । नव्हती ते भिन्न एकएका ॥ ४ ॥

१३७३ अवघियांचे असोनि देहीं । अंतर्बाहीं न दिसेचि ॥ १ ॥ जेवीं साखरेमाजीं गोडी । न दिसे उघडी असतांही ॥ २ ॥ वाद्य दिसती न दिसे नाद । जेवि कां स्वाद भोजनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसा आत्मा । दिसेचि भूतग्रामा कवळुनी ॥ ४ ॥

१३७४ अवघें देखे ब्रह्मरूप । गुण दोष पाप नातळे ॥ १ ॥ त्याची झाली चित्तशुद्धी । कृपानिधी तोषला ॥ २ ॥ हरीच्या भजनीं अत्यादर । पडेल विसर संसारें ॥ ३ ॥ निळा म्हणे विठ्ठल ध्यानीं । चित्तीं मनीं बैसला ॥ ४ ॥

१३७५ अवघें होउनी कांहींचि नव्हे। आपुल्या स्वभावें आपण ॥ १ ॥ तया नांव आत्मतत्व। शुद्ध सत्व मायादी ॥ २ ॥ ध्वनि बीज ओंकार रूप। तेंही स्वरूप ऐलाडी ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणों जातां। जाणोनि नेणता वेद जेथें ॥ ४ ॥

१३७६ असोनी आलिप्त सर्व संगीं। आत्मा भोगानो विरागी ॥१॥ ऐसें जाणती ते ज्ञानी। नित्यमुक्त त्रिभुवनीं ॥ २ ॥ मी हें स्फुरे जेथूनियां। आत्मा पराचि त्याहुनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे मी हें वदती। मूर्ख देहातेंचि कल्पिती ॥ ४ ॥

१३७७ आत्मा नाहींचि देखिजे ऐसा। उजळितां प्रकाशा रविकीर्ण ॥ १ ॥ असोनियां पाठीं पोटीं। न देखेचि दृष्टी देखण्या ॥ २ ॥ लेउनियां सर्वांगभरी। असोनि बाहेरी नाढळे ॥ ३ ॥ निळा म्हणे उगम जैसा। न देखेचि सहसा सागर ॥ ४ ॥

१३७८ आत्मा करी ना करवी। अलिप्तपणें वर्ते जीवीं ॥ १ ॥ साक्ष नव्हे ना असाक्ष। उपेक्षा करीना कैंपक्ष ॥ २ ॥ जैसें गगनीं अभ्र गळे। गगन अलिप्त त्यावेगळें ॥ ३ ॥ निळा म्हणे सन्निधानें। लोह चाले चुंबक नेणे ॥ ४ ॥

१३७९ आपणा दाउनी भुरळे केले। ठकुनि माझें मीपण नेलें ॥ १ ॥ आतां जाऊं कोणीकडे। पळों तरी तो मागें पुढें ॥ २ ॥ धांवा म्हणोनि बोलों जाय। तंव बोलातें गिळुनि आपणचि ठाये ॥ ३ ॥ ऐकों जाय याच्या गोठी। तंव तो शब्दा पाठीं पोटीं ॥ ४ ॥ देखों जातां देखणेंचि होय। दृश्यादृश्य हा नुरवीचि माये ॥ ५ ॥ सुगंध घेतां आपणचि नाक। गंधाचा गंध हाचि एक ॥ ६ ॥ मी माझें मज न दिसेचि कोठें। बहुता जुगांचे हरिलें सांठे ॥ ७ ॥ ठकुनियां निळा अवघाचि नेला। सकळही त्याचें आपणचि झाला ॥ ८ ॥

१३८० आत्मा निचोट निर्मळ। नातळे तो मायामळ ॥ १ ॥ जेवीं मृगजळातें भानु। प्रगटुनियां वेगळा भिन्नु ॥ २ ॥ आत्मबिंब नव्हे छाया। तैसी स्वरूपीं मिथ्या माया ॥ ३ ॥ निळा म्हणे हें स्वानुभवें। विचारितां होईल ठावें ॥ ४ ॥

१३८१ आंतु बाहेरी देखणाचि दिसे। परि तो आभासे दृश्य ऐसा

॥ १ ॥ ज्ञानेंचिविण वांयां गेला । बोध मावळला सत्याचा ॥ २ ॥ त्याविण दिसतें देखतें कोण । परि ये नागवण भ्रांतीची ॥ ४ ॥ निळा म्हणे आठव न धरे । तेणेंचि अंतरे हातोहातीं ॥ ४ ॥

१३८२ ईश्वर नियंता निर्गुण । नाम रूप जया नाहीं वर्ण । विद्या-अविद्यातीत चिद्‌घन । आपणा जो आपण गुरुशिष्य ॥ १॥ नातळोनि महदहंकार मायेसी । सहजचि गुणातीत तो अनायासीं ॥ होणें निम्रणें नाहीं ज्यासी । आपण आपणासी कदा न देखे ॥ २ ॥ नुरउनी एका एकपण । दुजेपणा घालीत शून्य ॥ पूर्णपणें नुरवीच पूर्ण । तत्साक्षी आपण सर्वद्रष्टा ॥ ३ ॥ ऐसिया आदि गुरुमूर्ति । आपणाचि पुरुष आपण शक्ति ॥ उमामहेश ऐशिया ख्याति । वाढउनी त्रिजगतीं विस्तारिली ॥ ४ ॥ मग आपण गुरु आपण शिष्य । आपण दीक्षा आपण उपदेश ॥ दाउनी परंपरेचा मोस । अभेदज्ञानास प्रगटितु ॥ ५ ॥ म्हणोनियां जी आदिनाथा । प्रकृति पुरुष तूंचि तूं आतां ॥ सकळ विश्वीं विश्वजनिता । करिसी तत्वता निजबोध ॥ ६ ॥ शिव शक्ति निमित्य दाऊन । उपदेशिलें निजगुह्य-ज्ञान ॥ तेणें देवोदेवि सुखसंपन्न । पावला मीन तो लाभ ॥ ७ ॥ तेणें गोरक्ष उपदेशिला । निजात्मज्ञानीं प्रबोधिला ॥ त्रैलोक्यामाजीं गौरविला । योग दाविला विशदार्थ ॥ ८ ॥ गुह्यागुह्यज्ञानकथन । तेणें गाहिनीतें उपदेशून ॥ उद्धरावया दीन जन । तेणें निवृत्ति शिक्षापिला ॥ ९ ॥ तेचि हातवटी ज्ञानेश्वरा । दिधली आदिपरंपरा ॥ सोपान मुक्ताई वटेश्वरा । चांगया प्रसाद दीधला ॥ १० ॥ निळा म्हणे ऐसियापरी । नाथसांप्रदायाची थोरी ॥ प्रगट केली ज्ञानेश्वरी । भगवद्गीता उकलूनी ॥ ११ ॥

१३८३ इंद्रियांची पुरली धांव । मनासी ठाव विश्रांति ॥ १ ॥ तया नांव ब्रम्हप्राप्ति । जेथ उपरति चित्ताची ॥ २ ॥ बुद्धीचीही जाणींव विरे । तर्क मतांतरें मुरडलीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कुंठित गती । पांगुळले ठाती पंचप्राण ॥ ४ ॥

१३८४ उपरम झाला सर्वकाळ इंद्रियां । स्वरूपीं विलया मन गेलें ॥ १ ॥ ऐशिया स्वानंदें बुझाविलें चित्त । राहिली अचिंत वदनीं वाचा ॥ २ ॥ अष्ट आविर्भाव डउरले अंगीं । प्राणी प्राणरंगीं निजवासें ॥ ३ ॥ भवबंध ठसा पडिला शरीरा । वृत्ति गेली घरा निजाचिया ॥ ४ ॥ निमो-

नियां गेलें शब्दाचें बोलणें । पवनुचि प्राणें शोषियेला ॥ ५ ॥ निळा सुखासुखीं पावला विश्रांति । पद पिंडा समाप्ति करूनियां ॥ ६ ॥

१३८५ एक्या जिवें एक्या भावें । एकचि एकलें एक्या देवें ॥ १ ॥ एकाएकीं एकचि झालें । एका अंगीं विरोनि गेले ॥ २ ॥ एकचि केलें निजानुभवें । एकचि झालें एक्या नांवें ॥ ३ ॥ निळा म्हणे एकाएकीं । एकाचि झालें तिहीं लोकीं ॥ ४ ॥

१३८६ एकींच नसतां एकपण दुजेपण कैंचें । म्हणउनियां न चले कांहीं तेथें शब्दाचें ॥ १ ॥ पहातें पहाणें जेथें विरमोनि जाय । घेणें देणें कैंचें तेथें सांगावें काय ॥ २ ॥ दृश्याचि नाहीं द्रष्टत्वाचा फिटला पांग । काया वाचा मनाचि नाहीं धारणा योग ॥ ३ ॥ निळा म्हणे जेथें सुख सुखपणा नये । निजानंदीं निजानंद हारपले ठाय ॥ ४ ॥

१३८७ एकापासूनी झाले विश्व । विश्वामाजीं एकचि अंश ॥ १ ॥ जैसे शून्यापासुनी अंक । झाले मांदिलां सुरेचि लेख ॥ २ ॥ शून्या तुटितां शून्यपणें । कैंचें एका एक होणें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्ताचि नाहीं । कैंचा देवही तये ठायीं ॥ ४ ॥

१३८८ एक बैसे सिंहासनीं । कर जोडोनी एक उभा ॥ १ ॥ एक पूजा स्वीकारित । एक करित निजांगें ॥ २ ॥ मुळीं पाहतां दोघे एक । परि कौतुक दाखविलें ॥ ३ ॥ निळा म्हणे सेवक स्वामी । पुरुषोत्तमीं हे मिथ्या ॥ ४ ॥

१३८९ एकीं एकपणा ठाव । नसोनि झाला सर्वी सर्व ॥ १ ॥ जैसें गगन घटीं मठीं । दिसोन आपण आपल्या पोटीं ॥ २ ॥ येणें होणें नाणी मनें । आपींआप संचलेपणें ॥ ३ ॥ निळा म्हणे याची कळा । नेणे हाहि न देखे डोळा ॥ ४ ॥

१३९० अंगकांति प्रकाशली । सूर्या दिधली किंचितसी ॥ १ ॥ तेणेंचि प्रकाशला भानु । झाला तो नयनु त्रैलोक्या ॥ २ ॥ तैसेंची चंद्रा जीवनामृत । दिधलें किंचित श्रीहरी ॥ ३ ॥ निळा म्हणे तेणेंचि जगें । निवावित अंगें मयंकु ॥ ४ ॥

१३९१ कल्पनातीत झालें मन । जैसें गगन निरभ्र ॥ १ ॥ म्हणोनियां ऐक्य आलें । स्वरूपीं ठेलें निश्चळ ॥ २ ॥ नित्यानंदें झाली तृप्ती ।

देखतां भूतीं भगवंत ॥ ३ ॥ निळा म्हणे जडलें पदीं । निरावधी विठ्ठलीं ॥ ४ ॥.

१३९२ काय वर्णूं याचे गुण । ज्याचें त्रिभुवन रूपस ॥ १ ॥ चंद्र सूर्य तारांगणा । दीप्ती हुताशना ज्याचेनी ॥ २ ॥ जेणें वाड केलें गगन । दिधलें आसन वसुंधरे ॥ ३ ॥ निळा म्हणे धारिला मेरु । भरिला सागरु दिव्य क्षीरें ॥ ४ ॥

१३९३ कांहींचि न होनि विस्तारला । बहुरूपी हा एकला ॥ १ ॥ नवल विचित्र हेंचि वाटे । कैसा नटोनि टेला नटें ॥ २ ॥ एका ऐसा न होनि एक । नानाकारें हा अनेक ॥ ३ ॥ निळा म्हणे नट लाघवी । शेखीं वेगळा गोसावी ॥ ४ ॥

१३९४ कैसा याचा वेध जाणती अनुभवी । जयां आहे ठावी कृपा याची ॥ १ ॥ नये तें दावितां सांगतांहि परी । वर्ते जें माझारीं भुलवुनि-यां ॥ २ ॥ नेदीचि बाहेरींउमसों बुद्धि मना । भरुनियां भावना झांकोळिली ॥ ३ निळा म्हणे तोचि साक्ष माझ्या जिवीं । चाळक गोसावी ब्रम्हांडांचा ॥ ४ ॥

१३९५ कैंचि याला बाइल आई । नामरुपें तेंही लटिकेंचि ॥ १ ॥ मूळचि नाहीं डाळ तें कैंचें । लटिकें साचें काय म्हणों ॥ २ ॥ हात पाय नाक ना डोळे । देखणें आंधळे नातळेचि ॥ ३ ॥ निळा म्हणे कांहींचि नव्हे । तोचि हा अवघे श्रुति बोले ॥ ४ ॥

१३९६ कैंचि आतां जिवा उरी । आंत बाहेरी कोंदला ॥ १ ॥ नेदी पडों कोठें उणें । वाचा करणें चाळितु ॥ २ ॥ भोग भोक्ता आपण झाला । वांटुनी घ्याला अभिमाना ॥ ३ ॥ निळा नामें रूपें नाहीं । भासे देहीं विठ्ठल ॥ ४ ॥

१३९७ कोठें झाडाचिवरी । कोठें पोखरी विवरांत ॥ १ ॥ कोठें जळीं वसे स्थळीं । कोठें अंतराळीं अंतरिक्ष ॥ २ ॥ कोठें पर्वतीं दरकुटी आंत । कोठें वनांत झाडखंडीं ॥ ३ ॥ निळा म्हणे चिखलीं शेणीं । वसे पाषाणीं काष्ठांत ॥ ४ ॥

१३९८ कोठें ग्रामीं कोठें पुरीं । कोठें सागरीं दरियांत ॥ १ ॥ कोठें सांदीं कोंदीं बिळीं । कोठें वारुळीं भुळीमाजीं ॥ २ ॥ कोठें बोले बोल-

वर्णी । वसे तळवटीं शिखराकरी ॥ ३ ॥ निळा म्हणे वसे शिरीं । केशा-भीतरीं कोठें वर्मी ॥ ४ ॥

१३९९ कोठेंचि हा नसे कोठेंही न दिसे । कोठेंचि अमुकासे न म्हणे कोणी ॥ १ ॥ कोठें याचें होणें कोठें याचें निमणें । कोठूनि येणें जाणें न तर्केचि ॥ २ ॥ कोठें याची स्थिति कोठें याची प्रीति । कोठें याची वसती न कळे कोणा ॥ ३ ॥ कोठूनि याचें मूळ कोठून याचें कूळ । वर्णाश्रयास आढळ न कळे गोत्र ॥ ४ ॥ निळा म्हणे याती न दिसे रूपा-कृती । नवेचि कोणे व्यक्ती विचार करितां ॥ ५ ॥

१४०० सांबसूत्रीं खेळवी दोरी । नाचती पुतळ्या दिसती वरी ॥ १ ॥ तैसा बोलवी बोलता । न दिसे परि तो मज आंतौता ॥ २ ॥ किन्नरी वाजे नानापरी । वाजवी त्याची ते कुसरी ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसा माझा । वाच्यवाचकु सद्गुरुराजा ॥ ४ ॥

१४०१ गगनीं वसोनियां रवी । प्रकाश भूमंडळा पुरवी ॥ १ ॥ तैसे तुम्ही जेथिल तेथें । असोनियां चाळा भूतें ॥ २ ॥ नभ न सांडुनी आपुला ठावो । पुरवी वावो जगातें ॥ ३ ॥ निळा म्हणे सन्निधानें । चुंबक चाळवी अचेतनें ॥ ४ ॥

१४०२ गंगा पवित्र सर्वांगुणीं । स्पर्शें विटाळे रांजणीं ॥ १ ॥ तोवें चैतन्य अवघें एक । भूतभेदें त्या कळंक ॥ २ ॥ भूमिका नाहीं खंडण केली । उत्तम अधम संगें झाली ॥ ३ ॥ निळा म्हणे धर्माधर्म । वर्णा-नुरूप क्रियाकर्म ॥ ४ ॥

१४०३ घडूं जातां अळंकार । होती अवघेचि शृंगार ॥ १ ॥ न-लगे उजळाही देणें । शोभती अंगींच्या बरवेपणें ॥ २ ॥ आंतु बाहेरी सारिखें । न ये हीनपणा वीकें ॥ ३ ॥ निळा म्हणे सुधा माल । हातीं लागला सुढाळ ॥ ४ ॥

१४०४ छाया मंडपींचीं चित्रें दिसती । तैसी सृष्टी भासतसे ॥ १ ॥ परि त्या आधार दीपज्योती । कातडी नुसती येन्हतीं ते ॥ २ ॥ तेवीं आत्मप्रभा भासे । जग हें विलसे नानाकृती ॥ ३ ॥ निळा म्हणे गगनीं रवि । दावूनी जेवीं अलिप्त ॥ ४ ॥

१४०५ जाणे सकळां अंतरींचा । भाव साचा मिथ्या तो ॥ १ ॥

तया करी तैसाचि मान । जैसें भजन ज्यापाशीं ॥ २ ॥ जेविं एकाचि स्वातीजळ । सर्पी गरळ हिरा भूमीं ॥ ३ ॥ निळा म्हणे एकचि हरी । जैशापरी तैसाचि ॥ ४ ॥

१४०६ जेविं देखोनि सकळां । आपणा न देखे हा डोळा ॥ १ ॥ परि तो न म्हणावा कीं अंध । देखणाचि तो शुद्ध बुद्ध ॥ २ ॥ अवघियातें जाणे । जाणीव जेविं आपणा नेणे ॥३॥ निळा म्हणे आहे तैसा । आत्मा आपआपणा ऐसा ॥ ४ ॥

१४०७ जें जें कांहीं होय जाय । त्या त्या लय अद्वैतीं ॥ १ ॥ तें अद्वैतहि लोपल्या पाठीं । आपणाचि पोटीं आपण ॥ २ ॥ तया नांव स्वरूप म्हणती । जें नित्य एकांतीं एकलें ॥ ३ ॥ निळा म्हणे दावूनियां नामरूपा । नयेचि पडपा विश्वाकृती ॥ ४ ॥

१४०८ जैशिया तैसा मिळोनियां । नेणवे म्हणोनियां कोणासी ॥ १॥ गोडी साखर करितां भिन्न । वेगळी कैसेनि रूप धरी ॥ २ ॥ डोळा देखतां एकचि दिसे ॥ करितां जैसें भिन्न नये ।३॥ निळा म्हणे वाचा वदतां । दिसती ऐक्यता परि भिन्न ॥ ४ ॥

१४०९ तोचि ब्रम्हविद् जाण । परब्रम्हीं वृत्ति लीन ॥ १ ॥ द्वैताद्वैत मावळलें । पूर्णब्रम्ह अनुभविलें ॥ २ ॥ जन वन तें समान । मन झालें पैं उन्मन ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याच्या नांवें । दोष नाशती स्वभावें ॥ ४ ॥

१४१० त्रिवेणीसंगमीं बुडती बहुत । नेघे प्रायश्चित त्यांचें गंगा ॥ ॥ १ ॥ ज्यांचें कर्म जैसें भोगिती ते फळ । गंगा तों निर्मळ जैसी तैसी ॥ २ ॥ बुडती जहाजें वायूचिया संगें । परि दोष नलगे वायूसी तो ॥३॥ निळा म्हणे तैसा परमात्मा श्रीहरी । वर्ते सर्वांतरीं अलिप्तपणें॥४॥

१४११ दोष वसे पात्रांतरीं । आत्मा निर्मळ चराचरीं ॥ १ ॥ सर्पामुखीं वसे विष । मधुमक्षिके सारांश रस ॥ २ ॥ स्वातिजळें मुक्ताफळ । शुक्तीं सर्पी हाळाहळ ॥ ३ ॥ निळा म्हणे उपाधिभेदें । दाविती निवाड शुद्धाशुद्धें ॥ ४ ॥

१४१२ देव प्रगटचि लपाला । आड आपण बैसला ॥ १ ॥ काय नवल सांगों कैसें । सूर्य झांकिला प्रकाशें ॥ २ ॥ निज ज्वाळें वैश्वानर ।

लहऱ्या लोपिला सागर ॥ ३ ॥ निळा म्हणे बुळी । आड ठेली मही तळीं ॥ ४ ॥

१४१३ दृष्टीविण देखणें रसनेविण चाखणें । शब्देंविण बोलणें ऐसें आहे ॥ १ ॥ चरणेंविण चालणें निजकरेंविण घेणें । श्रवणेंविण ऐकणें तेथींचें गुज ॥ २ ॥ चित्तेंविण चिंतणें बुद्धीविण जाणणें । मनेंविण अनुभवणें अनुभव्यातें ॥ ३ ॥ निळा म्हणे गगनें गगना आलिंगन । पवनासवें गमन पवना जेवीं ॥ ४ ॥

१४१४ धन वित्त दारा सुत । गणगोत मृगांबु हें ॥ १ ॥ आपणचि स्वयें दृशत्वा येतां । भासवी तत्त्वतां दृश्यजाता ॥ २ ॥ निजांगें जेवीं विलसे छाया । तेवीं हे माया मिथ्यात्वें ॥ ३ ॥ निळा म्हणे मुख्य बिंबेंवीण । भासविती कोण प्रतिबिंबा ॥ ४ ॥

१४१५ नमियेलीं घरांत घरें । शिवशक्ति वधुवरें ॥ १ ॥ आदिगुरू चराचरा । पासुनी ज्या परंपरा ॥ २ ॥ प्रसवोनियां दृश्यजाता । क्षराक्षरा मातापिता ॥ ३ ॥ निळा म्हणे वरद हस्तें । पावविती जे परमार्थातें ॥ ४ ॥

१४१६ नवल हा प्रकाश प्रकाशावेगळा । झांकिलियाही डोळा पुढें दिसे ॥ १ ॥ नव्हे हा उजळिला सवेंचि मावळला । आत्मतेजें केला उदो नित्य ॥ २ ॥ ढवळा ना काळा पिवळा ना जांभळा । जीवींच्या जीवनकळा प्रकाशितु ॥ ३ ॥ निळा म्हणे आजि आरतीचेनि न्याजें । कृपें पंढरीराजें कळलें मज ॥ ४ ॥

१४१७ नाहींचि मा डाळ मूळ । पहातां यासी जाती कूळ ॥ १ ॥ रूप नाम न दिसे वर्ण । पाय डोळे हात कान ॥ २ ॥ बाळ तरुण वयसा वृद्ध । जिण्यामरणापरता शुद्ध ॥ ३ ॥ निळा म्हणे धरिला चित्तीं । कैसा नेणों पूर्वीं संतीं ॥ ४ ॥

१४१८ नाहींचि उरला रिता । ठावो याविण तत्वतां ॥ १ ॥ अणूरेणू महदाकाश । त्याहीमाजीं याचा वास ॥ २ ॥ होतां जातां सहस्रवरी । ब्रम्हांडांच्या भरोवरी ॥ ३ ॥ निळा म्हणे अखंडता । नव्या जुन्याही हा परता ॥ ४ ॥

१४१९ नाहीं म्हणतां अवघें तेंचि । आहे म्हणतांचि दावितां नये ॥ १ ॥ म्हणोनियां न चले शब्द । राहे वेवाद ऐलाडी तो ॥ २ ॥

देखणा देखे सर्व । न देखे परम आपुली तो ॥ ३ ॥ निळा म्हणे तेवीं जाणों जातां । जाणणेंचि तत्वतां वस्तु होये ॥ ४ ॥

१४२० निर्माणचि नाहीं त्याचें काय वर्णावें । जाणीवचि न रिघे तेथें काय जाणावें ॥ १ ॥ म्हणउनियां येथें अवघा खुंटला वाद । विरोनियां गेला अवघा अभेदीं भेद ॥ २ ॥ जागृति ना निद्रा जेथें नाहीं सुषुप्ती । तुर्या ना उन्मनी कैंची स्वप्नाची भ्रांती ॥ ३ ॥ निळा म्हणे अनुभव तेथें अनुभवितें कैंचें । निमोनियां गेलें ऐक्य उरलें मुळींचें ॥ ४ ॥

१४२१ निर्विकार असोनि आत्मा । अवघ्या भूतग्रामा प्रकाशी ॥१॥ एरवीं करी ना करवी । जेवीं रवि निज व्योमीं ॥ २ ॥ लोह चळे चुंबकयोगें । परि तो अंगें न शिवे त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे आत्मसत्ता । वर्तणें भूतां कर्मतंत्रीं ॥ ४ ॥

१४२२ नेणें मी परिहार । देऊं कोणासी उत्तर ॥ १ ॥ म्हणोनियां हें खरें खोटें ठेवा । बांधोनियां मोटे ॥ २ ॥ नेणोनियां तुमची गती । तया माझ्याचि नांवें कारिती ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रत्युत्तर । मज तों न सुचे उत्तर ॥ ४ ॥

१४२३ पदार्थमात्रीं आठवे जरी । नलगेचि तरी साधन ॥ १ ॥ एरवीं दिसे देखणा तोचि । पाहिजे त्याची परि कृपा ॥ २ ॥ अवघाचि असोनि अवघे ठायीं । दिसे दाखवीही अवघ्यांतें ॥ ३ ॥ निळा म्हणे भोगी त्यागी । तोचि जगीं जगदात्मा ॥ ४ ॥

१४२४ पहा ज्याचें तयाची परी । जीवनभातें याच्या करीं ॥ १ ॥ देऊं जाणे यथाविधी । जैसा भाव तैशी सिद्धी ॥ २ ॥ उंच नीच अधिकारें । पावती आपुलाल्या व्यापारें ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्यापरी रवी । ज्याचे वेवसाय तया दावी ॥ ४ ॥

१४२५ पाहाणें पाहातें । गेलें हारपोनियां तिरुतें ॥ १ ॥ मीही नाहीं तूंही नाहीं । आपींआप अंतरबाहीं ॥ २ ॥ उदो अस्तु सविता नेणे । जेथें तेथें आपुलेपणें ॥ ३ ॥ निळा म्हणे नभीं नभ । जेवीं दावूनियां प्रतिबिंब ॥ ४ ॥

१४२६ पाहों जातां देखणें तेंचि । जाणतां जाणणेंचि होइजे अंगें ॥ १ ॥ आतां कैसें सांगावें वाचरी । बोलतांचि वैखरी गिळूनि जाये ॥ २ ॥ बुद्धीच्या प्रवेशें बुद्धीचि हरपे । मन जेथ संकल्पेंसहित निरे

॥३॥ निळा म्हणे चित्ता नुरे चित्तपण । आनंदा भुवन आनंदें ॥४॥

१४२७ पाहों जातां हा न दिसे । झांकोळिला विश्वाभासें ॥ १ ॥ आतां पाहों कोणीकडे । आड आपणा हा दडे ॥ २ ॥ डहाळीआड आंबा । असोनि न दिसेचि उभा ॥ ३ ॥ साखर दिसे खडा । गोडी पाहों कोणीकडा ॥ ४ ॥ निळा म्हणे सोनें । न दिसे झांकिलें भूषणें ॥५॥

१४२८ पायीं चित्त हें राहिलें । ब्रम्हरूप पैं जाहलें ॥ १ ॥ मन झालें हें उन्मन । स्वरूपीं झालें तें लीन ॥ २ ॥ बुद्धि बोद्धव्या मुकली । एकाकारता पावली ॥ ३ ॥ निळा म्हणे नाहीं देह । तेथें कैंचा गे संदेह ॥ ४ ॥

१२४९ पूर्णापासुनी आले आंख । शेवटीं पूर्णाचि नुरे लेख ॥ १ ॥ पूर्णीं असतां पूर्णपण । नेणे आपणा आपण ॥ २ ॥ दशक वाढवूनी शेवटीं । पूर्णपणें घालीं पोटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कांहींचि नाहीं । तेंचि या बीज विश्वा पाहीं ॥ ४ ॥

१४३० प्रसाद तुमचा लाधला आतां । झालों कृतकृत्यता सनाथ ॥ १ ॥ पुरविला जीवींचा हेत । होतों चिंतीत मानसीं तो ॥ २ ॥ कृपा करूनियां दाविला देवा । आपुला ठेवा उघडुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे सद्गुरुनाथा । गाऊं आतां ओंविया गीतीं ॥ ४ ॥

१४३१ प्राणीं प्राण अर्पे । तेथें अर्पी तें समर्पे ॥ १ ॥ ऐशी आहे प्रेमकळा । परी तो बोधक विरळा ॥ २ दृश्याचिया पाठीं । दृश्य लोपे द्रष्टाचि उठीं ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्ञानें । ज्ञेय राहिजे होऊन ॥ ४ ॥

१४३२ बहुरूपी हा एकला । नानाकारें नटें नटला ॥ १ ॥ पुरुषाकृति स्त्रिया बाळें । होउनी कोणाही नातळे ॥ २ ॥ नामें रूपें वस्त्राभरणें । रसस्वाद नाना खाणें ॥ ३ ॥ निळा म्हणे फळें पुष्पें । पर्णें मूळें भिन्नाचि रूपें ॥ ४ ॥

१४३३ भेदचि याचा नये हाता । जाणिवा जाणतां नानापरी ॥१॥ मतमतांतरें वृथाचि होतीं । याच्या न पवती दारवंटा ॥ २ ॥ पाहों जातां बुद्धीचे डोळे । होताती आंधळे समोर या ॥ ३ ॥ निळा म्हणे नेदीचि कोणा । देखों आपणा लपवितसे ॥ ४ ॥

१४३४ मनींचा माझिये वो संदेह फिटला । देव पाहों जातां जव-

कींच भेटला । अवघा मागें पुढें तोचि वो ठाकला । जनीं जनार्दन भरोनियां दाटला वो ॥ १ ॥ पुरलें जीवींचें आर्त साजणी । पाहें जेथें तेथें दिसे चक्रपाणी । लोकलोकांतरीं त्याचीचि भरणी । भरोनि उरला अवघ्याचि वाणी खाणी वो ॥ २ ॥ झाला सुकाळ हा सुखाचा मानसा । पाडिला त्रिभुवनीं एकरूपठसा । धरा व्यापूनियां अंबर दशादिशा । आतां भोगीन मी सर्वकाळ ऐसा वो ॥ ३ ॥ नाना भूताकृति एकचि आभासे । नाना नामें आळवितां वो देतसे । नाना अळंकार एकचि लेतसे । नागिवा उघडाही बरवाची हा दिसे वो ॥ ४ ॥ नाना वस्त्रें हा नेसला पांघुरला । जेथील तेथेंचि हा बहुरंगें नटला । शस्त्रें अशस्त्रें हा हातें मिरवला । सौम्य क्रूर ऐसा होउनियां राहिला वो ॥ ५ ॥ एका निववी भोगवी नाना भोग । एका खाववी जेववी दावी जग । एका विचरे देऊनि अंगसंग । निळा म्हणे हा एकलाचि अनंग ॥ ६ ॥

१४३५ मन विश्रांति पावलें । गुरुचरणीं स्थिरावलें ॥ १ ॥ ज्ञानयुक्त होतां मन । ब्रम्हभूत झालें जाण ॥ २ ॥ जिकडे जिकडे जाय मन । तिकडे तिकडे अधिष्ठान ॥ ३ ॥ निळा म्हणे मन । होऊनि ठेलें तें उन्मन ॥ ४ ॥

१४३६ माझेंचि मज नवल वाटे । मीचि भेटें मजलागीं ॥ १ ॥ निजात्मबोधें उदो केला । प्रकाश दाटला कोंदोनी ॥ २ ॥ कोठें कांहींचि न दिसे दुजें । निजात्मतेजें जग भासे ॥ ३ ॥ निळा म्हणे अवघे ठायीं । मीचि नाहीं दुजी परी ॥ ४ ॥

१४३७ माया ब्रम्हींचा आभास । नाहीं ते ब्रम्हीं निःशेष ॥ १ ॥ यालागीं दिसे ते टवाळ । रत्नचि तें रत्नकीळ ॥ २ ॥ सूर्यचि सूर्यातें प्रकाशी । न देखोनियां तम तेजासी ॥ ३ ॥ निळा म्हणे स्वसंवेद्या । नातळे विद्या ना अविद्या ॥ ४ ॥

१४३८ माझिये मनीं बसला हरी । नयनामाझारीं कोंदला ॥ १ ॥ भरोनियां मना बुद्धी । राहिला संधीं इंद्रियांच्या ॥ २ ॥ पाहे तेथें आपणचि दिसे । स्वरूप विलसे पदार्थीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जें जें कांहीं भासे तेंही त्याचीं रूपें ॥ ४ ॥

१४३९ मी माझें पाहतां न देखेचि दिठी । आदि मध्य शेवटीं विचारितां ॥ १ ॥ टवाळ हें मिथ्या अविद्येचें भान । चेइलिया स्वप्न जैसें

होय ॥ २ ॥ मृगजळ नदी आभासला पूर । न भिजे उखर कोरडेंचि ॥ ३ ॥ निळा म्हणे कांति दिसे ते वाउगी । वेगळा उरगीं ,पासुनी त्या ॥ ४ ॥

१४४० म्हणसी कडवसां गे मायेचिया बैसा । मायेचि नाहीं मिथ्यापणें निजबोधप्रकाशा ॥ १ ॥ लपों कोणीकडे गे सांग बाई निवाडें । अविद्याहि म्हणसी तरी ते न दिसे निवाडे ॥ २ ॥ कैंचें मी हें माझें गे झांकोळिलें तेजें । अवघी आत्मराजें माझ्या उजळी निजें ॥ ३ ॥ निळा म्हणे नुरे गे लपणेंचि वोसरे । याचिया प्रकाशें उजळले दरे खोरे ॥४॥

१४४१ याचिया ध्यानें हें चराचर । अवघें तदाकार मज भासे ॥ १ ॥ मही अंबु मारुत गगन । भासे हुताशन हाचि झाला ॥ २ ॥ चंद्रसूर्य तारांगणें । सुरासुरागण मनुष्यादी ॥ ३ ॥ निळा म्हणे जनीं वनीं । हाचि भरोनि राहिला ॥ ४ ॥

१४४२ येती जाती वर्षती मेघ ॥ गगन तें अभंग जैसें तैसें ॥ १ ॥ तैसींच ब्रह्मांडें अनेक होती जाती । स्वरूप तें अद्वैतीं अद्वैत ॥ २ ॥ नाना नटिया नटवेष । परि तो आपणास भिन्न नव्हे ॥ ३ ॥ निळा म्हणे नानावस्त्राकार तंत । दाउनी आपणांत आपण ॥ ४ ॥

१४४३ सोडुनी तया न वचे दुरी । त्याचा करी प्रतिपक्ष ॥ १ ॥ म्हणे मी त्यांचा तेही माझे । नव्हती दुजे कल्पांतीं ॥ २ ॥ मी तूं म्हणतां वेगळे न हों । मुळींचे आहों एकाएकीं ॥ ३ ॥ निळा म्हणे देवभक्तां । एकात्मता ठायींची ॥ ४ ॥

१४४४ समोर सदा सर्वांकडे । मागें पुढें वेष्ठित ॥ १ ॥ कां हो नेणा हरि ऐसा । जैसा तैसा परिपूर्ण ॥ २ ॥ उदका अंगीं जैसा रसु । गगनीं अवकाशु घनदाट ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतर्बाह्य । त्याविण आहे कोण दुजें ॥ ४ ॥

१४४५ सगुण निर्गुण कल्पनेचा भास । वस्तु अविनाश व्यापकत्वें ॥ १ ॥ स्वानुभवें पाहीं लटिकें साच नाहीं । परिपूर्ण अवघाही आत्माराम ॥ २ ॥ आपलाचि साउ अंतराळीं जेवीं । दुजेनवीण दावी दुजेंपण ॥ ३ ॥ लटिकें म्हणों जातां साच तया पोटीं । दर्पणींची भेटी आपणासवें ॥ ४ ॥ स्वप्नामाजीं जेवीं नाना परिवार । प्रबोधीं साचार एकलाचि ॥ ५ ॥ निळा म्हणे रज्जु भासे सर्पपणें । झकविलें तेणें नेणतीया ॥ ६ ॥

१४४६ सर्वांमाजीं गगन आहे । परी धरितांचि नये काय ॥ १ ॥ तैसें नाकळेचि तें शब्दातें । जेवीं खद्योतें रवी भेटी ॥ २ ॥ सागरीं पडतांचि लवणकण । निवाडितां भिन्न न निवडे ॥ ३ ॥ निळा म्हणे तैशा परी । बोलतांचि वैखरी लीन तेथें ॥ ४ ॥

१४४७ सोनें असे सोनेपणें । अलंकार लेणें होय जाय ॥ १ ॥ तैसें चराचर होतां जातां । वस्तु अखंडता अखंड ॥ २ ॥ नाना मृगजळ दिसे भासे । भूमिका ते असे कोरडीच ॥ ३ ॥ निळा म्हणे घटमठ मोडी । अवकाश परवाडी नाहीं तया ॥ ४ ॥

१४४८ सोयरा श्रीहरी । आत्मा एक चराचरीं ॥ १ ॥ नाहीं तया आपपर । वसवी सकळांचें अंतर ॥ २ ॥ देवां दानवां मानवां । स्थूळ सूक्ष्मादिकां सर्वां ॥ ३ ॥ निळा म्हणे जीवमात्रीं । व्यापकपणें तोचि धात्री ॥ ४ ॥

१४४९ स्वामी एक म्हणवी दास । आवडीस रूप केलें ॥ १ ॥ मुळींचें दोघां एकपण । परी हें भिन्न दाखविलें ॥ २ ॥ एक म्हणे धावा धांवा । एक कुडावा करी त्याचा ॥ ३ ॥ निळा म्हणे नवल वाटे । साने मोठे नव्हती हे ॥ ४ ॥

---

## संतांपाशीं करुणा भाकणें.

१४५० अंतरींचें मनोगत । तुम्ही तों संत जाणतसां ॥ १ ॥ तरी वियोग नका आतां । तुमच्या भजना भजनासी ॥ २ ॥ आठव कारितां दिवसराती । उल्हास चित्तीं मना द्यावा ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपाघना । विज्ञापना हे माझी ॥ ४ ॥

१४५१ एवढा मनींचा पुरवा हेत । पंढरीनाथ भेटवा ॥ १ ॥ मग मी तुमच्या न सोडीं पायां । करीन काया कुरवंडी ॥ २ ॥ कृपासिंधु तुम्ही संत । पुरवा आर्त हें माझें ॥ ३ ॥ निळा म्हणे झालों दास । नका उदास धरूं आतां ॥ ४ ॥

१४५२ ऐशिया सुखामाजीं राहे न सुखरूप । दुजा वागों नेदी आड येऊं संकल्प । भोगीन याचेंचि वो सर्वदा पडप । करूनि भावना अखंड तद्रूप वो ॥ १ ॥ ऐशी हे निश्चयाची सांगितली मात । तुम्हीही आयकाहो कृपावंत संत । न कळे मज सत्याचा इत्यर्थ । तुम्हींचि ग-